## मुतालिक ह्यांचे रोजनिशी पैकीं.

४५१–( ६ ) परगणे भडोच येथील इंग्रेजाकडील अंमल सरकारांत जप्त करून जप्ती चांगोजी कदम यांस सांगितली असे, तरी मशारनिल्हेसी रुजू होऊन परगणे मजकूरचा इंग्रजाकडील अमलाचा वसूल सुरळीत देणें ह्मणोन, जमीदार परगणे मजकूर यांस.

खमस सबैन मया व अलफ सफर ११

सनद १.

परवानगी रूबरू.

४५२–( २१८ ) बाजी गंगाधर तालुके बेलापूर यांचे नांवें सनद कीं, आनंदराव जिवाजी, भात वीस खंडी मोष्टिनास मुंबईस पाठवीत आहेत, तें जाऊं देणें, सदरहू भात वीस खंडी तुम्हीं यांस देणें, भात नेलियावर ते पैका देऊं लागतील, ते समई त्यांस सांगणें जे तूर्त पैका घेत नाहीं, हुजूर लेहून जाब आणवून आज्ञा येईल तसें करूं, असें सांगणें; आणि पंधरा दिवस पैका घ्यावयाची आज्ञा नाहीं असें सांगोन पैका न घेणें. सदरहू भात वीस खंडी बारीक देणें. त्यांचे नांवें खर्च लिहिणें ह्मणोन.

सीत सबैन मया व अलफ जमादिलाखर २५

सनद १.

परवानगी रूबरू.

४५३–( २२६ ) मुंबईचे बंदरची बंदी सरकारांतून पेशजीं जाली असतां सावकार जिन्नस नेतात व आणतात ह्मणोन हुजूर विदित जालें त्यावरून सदरहूची चौकशी बहिरो रघुनाथ यांस सांगितली असे; तरी तर्फ हाये येथील बंदरीं मशारनिल्हेकडील कारकुनाचे चौकशीनें जिन्नस आढळेल

सीत सबैन मया व अलफ रजब ६

FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( 451 ) The Jamidárs of Parganá Broach were directed to attach the revenues of the Parganá due to the English.

A. D. 1774-75.

( 452 ) Báji Gangádhar of Belápur was directed to hand over 20 Khandies of excellent rice to Monstin of Bombay, and was instructed not to receive the price thereof. If such an offer ( of payment of price ) were made, he was to tell that he ( Báji ) had no instructions to receive the money, that he would refer the matter to Government and act according to the instructions he might receive.

A. D. 1775-76.

( 453 ) Government being informed that notwithstanding the prohibition of trade with Bombay, merchants continued to send and receive goods from that place; Bahiro Raghunáth was appointed to evquire into the matter, and the Mamletdars were ordered to attach goods found by them to have been clandestinely received from or destined for Bombay.

A. D. 1775-76.

त्याची जप्ती करून पुण्यास रवाना करतील येविशीं मामलेदारास वगैरे पत्रें.

५ मामलेदारास पत्रें कीं जिन्नस आढळेल तो जप्त करून व पुण्यास रवाना करितील त्यांस प्यादे तालुक्यापैकीं देऊन पुण्यास पोंहोंचाऊन देणें ह्मणोन. पत्रें.

१ राघो नारायण, व सखाराम बल्लाळ तर्फ नेरळ यांस.
१ राणोजी बलकवडे तर्फ उंदेरी यांस.
१ आनंदराव शिंदे तर्फ रेवदंडा यांस.
१ चिमाजी माणकर प्रांत राजापुरी यांस.
१ आबाजी बल्लाळ, व भास्कर महादेव तर्फ अवचितगड यांस.

५

३ जकाती महालानिहायचे कमाविसदारार पत्रें कीं, सदरहूचे चौकशीस जकातिचे नाक्याचे टिपांचें मशारनिल्हेकडे प्रयोजन लागल्यास दाखल्यास टिपा देणें ह्मणोन. पत्रें.

१ विठ्ठल नारायण प्रांत कल्याण भिंवडी यांस.
१ गणेशराम तर्फ रेवदंडा वगैरे यांस.
१ भिकाजी विश्वनाथ जकात प्रांत पुणें व जुन्नर यांस.

३

१ राघोजी आंग्रे वजारत माहा सरखेल यांस पत्र की, तुह्मांकडील तालुके यांत सदरहू चौकशी मशारनिल्हे करितील, तरी तुम्हीं दिक्कत न करावी.

९

नऊ पत्रें. परवानगी रूबरू.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

४५४–( २४८ ) इंग्रज मुंबईकर याजकडील गाफील सालगुदस्तां सुवर्णदुर्गचे आरमारानें पाडाव करून आणिले, त्याजवर इंग्रजाकडील लोक होते, ते सुवर्णदुर्गास अटकेस आहेत, त्यांस सोडावयाचा करार करून बहुमान वस्त्रें खासा कपितान एक व चार इंग्रज एकूण पांच असामी ।

सीत सबैन मया व अलफ रजब २०

## FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 454 ) One captain and four other Englishmen were in the preceding year captured by the fleet at Suvarnadurga, while off their guard, and were then imprisoned at Suvarndurga. Orders were now issued to Moro Bápuji to set them at

A. D. 1775-76.

कापड आंख ३६० तीनशें साठ आखांचीं सनगें हुजुरून तुम्हांकडे पाठविलीं आहेत, त्याची यादी अलाहिदा पाठविली आहे, तरी त्याप्रमाणें बहुमान वस्त्रें व खर्चाबद्दल तालुके मजकूर पैकीं रुपये २० वीस देविले असेत, तरी देऊन व एक गलबत पोहोंचवावयासी देऊन मुंबईस पोहोंचऊन देणें म्हणोन, मोरो बापूजी यांचे नांवें. छ. २४ साबान. सनद १.

परवानगी रूबरू. राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस.

४५५–( २६७ ) करनेल टामस कीटीण यांस सनद कीं, तुम्हांकडे भाड्याचे बैल ओझ्याबद्दल आहेत. त्याचे हिशेबाचा फडशा आजपर्यंत करून देऊन बैलांची हजिरी तेरीखवार लिहून हुजूर पाठऊन देणें म्हणोन.

सीत सबैन मया व अलफ जिल्हेज २३

सनद १.

परवानगी रूबरू.

४५६–( २७३ ) जमा जामदारखाना.

सीत सबैन मया व अलफ मोहरम

कमाविसभेट बाबत हाय, गुजारत हरजी सेटगा खिजमतगार निजबत कारखाने मजकूर सनगें. एकूण किंमत रुपये.

३४४०॥ बद्दल कर्नेल अपटेन इंग्रज वकील दिंमत संस्थान कलकत्ते.

२९९३ राजश्री राव यांस.

४५५ शेले साधे धुवट बंगाली.

१०५ प्रत बुटेदार ३ दर ३५

३५० प्रत साधे.

३०० प्रत ४ दर ७५

५० प्रत १

३५० ५

४०५ ( ४५५ )

liberty, to honour them by making a present of clothes worth Rs. 360, to give them rupees 20 for expenses and to send them in a Government boat to Bombay.

( 455 ) A Sanad to Colonel Thomas Keating asking him to render an account of the expenses incurred on account of the pack-bullocks in his service.

A. D. 1775-76.

( 456 ) A present of clothes &c to the Peshwa worth Rupees 3440-8 was received from Colonel Upton, Agent of the English at Calcutta.

A. D. 1775-76.

४१७॥ दुसेनरें.

८० प्रत पिवळे गज १६॥ सनंग १ रुपये.
६२॥ थोर बुटीचें गज ८ सनंग ।॥ रुपये.
४५ प्रत छडीदार गज ९ सनंग. ।॥। रुपये.
१५ प्रत गज ३ सनंग ।· रुपये.
६० प्रत छडीदार गज १२ सनंग १ रुपये.
८० प्रत जरी बुटेदार गज ४ सनंग १
७५ प्रत साधे लहान बुटीचें गज ६ सनंग ।·

४१७॥

१९८ मखमल लालडी कडे २ एकूण गज १६॥ दर गजीं रुपये १२ प्रत रुपये.

१९२२॥ सकलाद गज एकूण रुपये.

१६४१ प्रत मुलतानी.

गज.

१७॥ १७ १६॥
१७। १६ १७
१७ १८॥

१३६॥।· ८ तागे. दर गजी रुपये १२ प्रत रुपये.

२८१॥ ( २८१। ) प्रत जमरुदल.

तागे २ एकूण.
१९
गज १८॥

३७॥
दर गजीं रुपये ७॥
प्रत १७४।· ( गज )

१९२२॥·

| २९९३ | सनगें | गज. |
|---|---|---|
| | १३(१२॥।) | १९०॥। (२४६॥) |

* * * *

४५७–( २८१ ) परगणे देहनबरें प्रांत गुजराथ येथील मामलत विठ्ठल नारायण याजकडे होती, त्यास सालगुदस्त इंग्रजाचे दंग्यामुळें महालीं अंमल चालिला नाहीं, हल्लीं सालमजकुरीं इंग्रजाचा तह होऊन महाल सुटला, याजकरितां परगणे मजकूरची मामलत सालगुदस्तांप्रमाणें मशारनिल्हेकडे सांगितली असे, तरी मशारनिल्हेसी रुजू होऊन अमलाचा वसूल सुरळीत देणें म्हणोन, परगणे मजकूरचे जमीदारांस.

सीत सबैन मया व अलफ रबिलावल ३

सनद १.

परवानगी रूबरू.

४५८–( २८३ ) जमा.

सीत सबैन मया व अलफ रबिलाकर

जमा जामदारखाना.

कमाविसभेट सनगें एकूण. रुपये.

७४९.॥ बाबत कर्नेल इपटेन वकील दिंमत इंग्रज संस्थान कलकत्ते छ. २२ जिल्कादीं भेटी बाबत सनगें आलीं ते जमा सनगें एकूण किंमत रुपये.

३८१॥ राजश्री सखाराम भगवंत यांस, गुजारत मल्हारजी कामथा खिजमतगार दिंमत मशारनिल्हे.

१८१ शालफर्द २ दर [ ९०॥ ] एकूण.

१२५ किनखाप ?

७५॥ महमुद्या.

३२॥–३२॥–१०॥

७५॥

३८१॥

( 457 ) Owing to the disturbance of the English in the preceding year, Vithal Náráyan Mámlatdár was unable to exercise jurisdiction in the Parganá of Dehajbare in Pránt Gujerath. A treaty having been concluded with the English in the current year, the Mámlatdár was reappointed and directed to hold charge of the Parganá.

A. D. 1775-76.

( 458 ) Clothes worth Rupees 749–8 were presented by Colonel Upton, Agent of the English of Sansthán Calcutta at the time of the visit paid by him on 22nd of Jilkád.

A. D. 1775-76.

Rs. 381—8 clothes presented to Sakhárám Bhagwant.

368—0—Do—Báláji Janárdan.

158—0—Do—The Peshwá and his mother Lady Gangábái.

३६८ राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांस.

१६९ शालफर्द २ दर ८४॥

१२५ किनखाप १

७४ महमुद्या

३२॥-३१-१०॥

७४

३६८

७४९॥

१५८ वणगोजी नाईक निंबाळकर, राजश्रीराव यांस, गुजारत खंडोजी पणदरा खिजमतगार. छ. १५ मोहरमीं आलीं तीं सनगें एकूण रुपये.

६० खासा राव यांस.

३० तिवई १

३० जाफरखानी.

६०

९८ मातुश्री गंगाबाई यांस.

९५ लुगडें साधें १

३ खण पै ॥ १

९८ २

१५८ ४

९०७॥ १६

४५९-(२९०) कर्णेल इफायन वकील निसबत इंग्रज कलकत्तेकर यांणीं पुण्याहून कापड बैल सर वीस २० कापड भरून मुंबईस पाठविलें, त्यास व तिकडून सदरहू बैल भरून जिन्नस आणितील त्यांस आणूं देणें. जकातीचा आकार होईल तो यांचें नांवें खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें

सीत सबैन मया व अलफ रबिलाकर १५

(459) The duty on clothes sent to Bombay by Colonel Ephael (इफायन), Agent to the English at Calcutta, and on the goods brought by him from Bombay, was remitted.

A. D. 1775-76.

ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमाविसदार प्रांत पुणें व जुन्नर यांचे नांवें. छ. १० रबिलोवल.
सनद १.

रसानगी यादी.

४६०—( २९५ अ ) मुंबईवाले जनरल यांजकडील जाहजें व सिबाडें तुम्हीं धरिलीं आहेत, त्याजवरून हीं पत्रें तुम्हांस सादर केलीं असेत, तरी सदरहू जहाजें पत्रदर्शनीं सोडून देणें ह्मणोन, चिटणिसी छ. १५ मोहरम. पत्रें.

सीत सबैन
मया व अलफ
रबिलाकर १५

१ माधवराव बेमसे यांस कीं, जहाजें मुमार ३ तीन व सिबाड १ एक एकूण चार अटकाविलीं आहेत त्याविशीं.

१ गंगाधर गोविंद तर्फ विजयदुर्ग यांस कीं, दोनशें खंडींचें शिबाड तुम्हीं धरून नेलें आहे तें सोडून देणें ह्मणोन.

२

४६१—( २९८ ) विसाजी केशव यांचें नांवें पत्र कीं, इंग्रजाचा तह जाहला त्यास मुंबईची बंदी छ. २९ रविलावलपासून मोकळी करून पूर्ववत् प्रमाणें चालावें, याप्रमाणें करार जाहला आहे; त्यास कोंकणचे मामलेदारांस सांगोन बंदी मोकळी करून पूर्ववत् प्रमाणें मुंबईची आमदरफ्ती चालों देणें. येविशीं सर्व मामलेदारांस ताकीद आधीं करणें. याविशींचा मुंबईचा बोभाट हुजूर नये ते गोष्ट करणें ह्मणोन.
पत्र १.

सबा सबैन
मया व अलफ
जमादिलावल ३

परवानगी रूबरू.

४६२—( ३२८ ) फत्तेसिंग गायकवाड यांजकडील महाल इंग्रजाकडे दिल्हे, त्या ऐवजीं मूबदला मशारनिल्हेस दीड लक्षाचे महाल द्यावे असा करार आहे, त्यापैकीं प्रांत गुजराथ पैकीं सालमजकूरापासून खेरीज दुमाले गांव करार करून दिल्हे त्याविशीं.
सनदा.

सबा सबैन
मया व अलफ
साबान ८

---

( 460 ) Five ships belonging to the General of Bombay, captured by the officers of Government, were ordered to be restored to the English.

A. D. 1775-76.

( 461 ) A treaty having been concluded with the English, the prohibition of trade with Bombay was removed from 29th of Raviláwal.

A. D. 1775-76.

( 462 ) In view of the territory of Fatesing Gáikwáḍ, given to the English, a province in Gujerath worth Rupees 150,000 was ordered to be made over to him vizt. Parganá Pálanpur, Thánáne. Badá Sinore and Virpur without delay.

A. D. 1775-76.

१ तर्फ अमदाबाद निसबत आपाजी गणेशपैकीं. महाल.

१ परगणे पाळणपूर. १ परगणे वीरपूर.

१ परगणे धामणें. ——

१ परगणे बडा सिनोर. ४

चार महाल ठाण्यासुद्धां देविले असत, तरी मशारनिल्हेचे हवाला करून पावल्याचें कबज घेणें ह्मणोन.

१ परगणे सावली येथील जमीदाराचे नांवें सनद कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन अमल सुरळीत देणें ह्मणोन. सनद.

——

२

सदरहू महालचा अजमास बेरीज रुपये.

५०००० परगणे सावली.

१००००० तर्फ अमदाबादपैकीं महाल. रुपये.

३५००० परगणे पालनपूर.

६५००० कित्ता महाल.

१ परगणे धामणें. १ परगणे वीरपूर.

१ परगणे बडासिनोर. ——

३

अजमासें बेरीज रुपये.

————

१०००००

————

१५००००

दीड लक्षाचे महाल चार सदरहूप्रमाणें बेरीज लाऊन दोन सनदा दिल्या असत.

रसानगी यादी.

फत्तेसिंग गायकवाड यांचे नांवें सनद कीं. तुह्मांकडील महाल इंग्रजाकडे दिल्हे, त्या ऐवजापैकीं मूबदला तुह्मांस दीड लक्षाचे महाल द्यावयाचा करार केला आहे त्यास. महाल.

४ तर्फ अमदाबाद पैकीं.

१ परगणे पालनपूर. १ परगणे वीरपूर.

१ परगणे धामणें. ——

१ परगणे बडासिनोर. ४

१ परगणे सावळी.

——

५

एकूण पांच महाल खेरीज डुमाले करून साल मजकुरापासून तुम्हांकडे करार करून दिल्हे असेत, तरी महाल घेऊन अमल बसवणें. तुमचे महाल इंग्रजाकडे दिल्हे आहेत, ते ज्या बेरजेनें तुम्हीं त्याजकडे लावून द्याल, त्या अन्वयें तुम्हांस दीड लक्षाचे द्यावे, त्यास हल्लीं सदरहू महाल नेमून दिल्हे आहेत. अमल बसवणें. चार रुपये कमी जाले अगर अधीक जाले तरी तुम्हांकडील कारभारी हुजूर आल्यावरी फडशा केला जाईल. या उपरी कोणाविषई संशय न ठेवितां इंग्रजाचे महाल त्याचे पदरीं पडत असें लौकर करणें म्हणोन.

पत्र १.

रसानगी यादी.

४६३–( ३६४ ) नरसिंग राव जनार्दन धायगुडे याजकडे फौजेचे सरंजामास परगणे देहजबेरें दिल्हें होतें, तो महाल त्याजकडून दूर करून इंग्रजास दिल्हा, सबब त्याचे मूबदला परगणे बहादरपुरा प्रांत गुजराथ हा महाल पेशजीचे अमलदाराकडून दूर करून सालमजकुरीं मशारनिल्हे यास फौजेचे सरंजामास दिल्हा येविशीं. सनदा.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २

२ परगणे मजकूरचा अमल ठाणेंसुद्धां मशारनिल्हेचे हवाली करून कबज घेणें म्हणोन. सनदा.

१ चिंतामण हरी यास.

१ गणेश हरी दिंमत चिंतामण हरी यास.

२

१ जमीदार परगणे मजकूर यांस कीं मशारनिल्हेसी रुजू होऊन अमल सुरळीत देणें म्हणोन. सनद.

३

रसानगी यादी.

४६४–( ३८८ ) गणेश हरी दिंमत चिंतामण हरी सरसुभा प्रांत गुजराथ याचे नांवें सनद कीं. प्रांत गुजराथपैकीं कुंपनी इंग्रज यांस तीन लक्षाचे महाल सरकाराकडील कमाल जमेप्रमाणें लाऊन द्यावयाचा करार जाहला आहे, त्यास हल्लीं कर्णेल अपटेन बहादर यांसी बोलोन परगणे हसोट

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २१

(463) The Pargaṇá of Dehájbare was given to the English.
A. D. 1776-77.

(464) In accordance with the agreement entered into with the English for the grant to them of a territory worth Rs. three lacs in Gujerath, it was settled after conferring with Colonel Upton that the Pargaṇas of Hasot, Amod,

A. D. 1776-77.

व परगणे आमोद व परगणे देहजबरें हे महाल लाऊन द्यावयाचे ठरलें, त्याप्रमाणें परगणे मजकूरचे माजी अमलदारांस ठाण्याविशीं व जमीदारांस सनद लेहून काढून अलाहिदा पाठविली आहे, त्याप्रमाणें जमीदारासी व इंग्रजांसी रुजू करून देऊन महाल त्यांचे हवाली करून कबज सरकारचे नांवें लेहून घेऊन पाठवणें. तीन लक्षांहून जाजती बेरीज सदरहू तीन महाल मिळोन होईल त्यास जाजती बेरजेचे गांव परगणे अमोद अगर हसोट पैकीं सरकारांत ठेवणें ह्मणोन. सनद १.

जमीदारांस कीं माजी अमलदाराकडून अमल दूर करून कुंपनी इंग्रज यांजकडे महालें दिले असेत, तरी त्यांसी रुजू होऊन अमल सुरळीत देणें ह्मणोन. सनदा ३.

माजी अंमलदारास कीं परगणे मजकूरचीं ठाणीं गणेश हरी यांचे नांवें विद्यमानें इंग्रजांचे हवाली करून कबज घेणें ह्मणोन. सनदा ३.

१ परगणे हसोट महादाजी निळकंठ याजकडे सरंजामास होता तो दूर करून.
१ परगणे देहजबरें नरसिंगराव जनार्दन धायगुडे यांजकडे सरंजामास होता तो.
१ परगणे आमोद येथील महालांत माधव नागशेट याजकडून दूर करून.

३ ७

एकूण सात सनदा छ. २३ सवाल.

रसानगी यादी.

४६५–( ३९२ ) महादाजी रामचंद्र याचे नांवें सनद कीं, परगणे जंबूसर प्रांत गुजराथ येथील कमावीस सांगोन तुम्हांस पाठविले असेत, तरी इमानें इतबारें वर्तोन अमल चौकशीनें करणें. सदरहू मामलत संमंधें कलमें.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

---

Dehájbare, should be transferred to the English, and orders for the transfer were accordingly issued to Gaṇesh Hari in the service of the Sarsubha Chintámaṇ Hari.

( 465 ) Mahádji Rámchandra was appointed Kamávisdár of Pránt Jambusar in Pránt Gujerath and the following instructions were issued to him.

A. D. 1776-77.

1 The revenue of this Pargaṇá was to be made over to the English. Mahádji should fix the Jamábandi, and should the English agree to be responsible for its collection, the Pargaṇá should be made over to them. Otherwise, the English should transfer the tháṇá of the Pargaṇá to Mahádaji who should remit the collections to the English, as they were received, and take receipts.

परगणे मजकूरचा ऐवज इंग्रजाकडे आवयाचा, त्यास जमाबंदी चौकशीनें तुह्मीं करून, जो आकार होईल त्याचा हवाला इंग्रजांनीं घेतल्यास हवाला देऊन इंग्रजांचे कबज घ्यावें. आकाराचा हवाला इंग्रज न घेत, तरी परगणे मजकूरचें ठाणें इंग्रजांकडे आहे तें त्यांणीं तुमचे हवाली करावें. तुह्मीं वसूल करून ऐवज वरचेवर इंग्रजास देत जाऊन कबज घेत जाणें. येणेंप्रमाणें. कलम १.

शिबंदीची नेमणूक प्यादे. असामी.

१०० ठाण्यांत.
१०० वसुलास.

———

२००

एकूण दोनशें असामींस दरमाहा महालचे शिरस्तेप्रमाणें आकार होईल तो मजुरा पडेल. येणेंप्रमाणें. कलम १.

सरकारचा व इंग्रजाचा तह छ. १० मोहरम सन सीतसंत जाहला त्या तारखेपासून इंग्रजाकडे वसूल परगणे मजकूरचा पडला आहे, तो जमीदाराचे गुजारतीनें रुजुवात करून त्या ऐवजाचें इंग्रजाचें कबज घ्यावें येणेंप्रमाणें. कलम १.

कारकून लिहिण्याचे कामास असामी १ एक, एकूण रुपये दोनशें २०० करार केले असे, मजुरा पडेल. येणेंप्रमाणें. कलम १.

ठाणें व वसूल इंग्रजाकडे लागल्यास तुह्मांबरोबर हुजूरून स्वार वगैरे दिले आहेत, तितकेच ठेवावे, अधिक ठेवूं नये. येणेंप्रमाणें. कलम १.

दुमाले गांव व रोजीनदार वर्षासनें याची सनद हुजुरून येईल, त्याप्रमाणें चालवणें. येणेंप्रमाणें. कलम १.

एकूण सहा कलमें करार करून दिल्हीं असेत. सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन. सनद १.

१ जमीदार परगणे मजकूर यांसी कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन अमल सुरळीत देणें, व सरकारचा व इंग्रजाचा तह छ. १० मोहरम सन सीतांत जाहला त्या तारखेपासून हर सनद पैवस्तगिरी पावेतों इंग्रजाकडील जामीन कमाविसदारांनीं वसूल घेतला आहे, तो त्यांचे गुजारतीनें मशारनिल्हेसी रुजू करून देणें ह्मणोन. चिटणिसी ३.

२ इंग्रजांस पत्रें कीं परगणे मजकूरचें ठाणें जकिरासुद्धां यांचे हवालीं करणें. तहाची तेरीख छ. त्यापासून परगणे मजकूरचा वसूल तुह्मांकडे जाहला असेल तो मशारनिल्हे पैवस्ता होत तोंपावेतों मशारनिल्हेसी रुजू करून देणें, त्या बमोजीब ऐवज पावल्याचें कबज याजवळ द्यावें, व पुढें आपलेकडील मातबर माणूस जंबूसरास

1 A receipt should be taken from the English for any collections made by them.

The purport of this letter was communicated to William Hornby, President and Governor of Bombay, and to the Governor of Surat.

ठेऊन घ्यावयास ठेवावा. जमाबंदीचा ठराव महादाजी रामचंद्र करून ऐवज दे-
तील, त्याप्रमाणें त्यांणीं घेत जावा. जसा जसा ऐवज पावेल, तसें कबज याजवळ
लेहून देत जावें म्हणून. पत्रें.

१ उईल्यम हर्नबी प्रेजीदेंत गोवर्नदोर जनराल बंदर मुंबई यांस.

१ हुनरी बदाम गोवर्नदोर बंदर सुरत यांस.

---

२

---

२

रसानगी यादी. छ. २ जिल्काद.

सबा सबैन मया व अलफ मोहरम ६

४६६–( ४०६ ) कर्नेल इपटेन वकील कलकत्तेकर यांणीं उंट व घोडीं, व बैल सि-
ळोन रास ४३ कसबे पुणें वगैरे जागा खरेदी केली त्याची किंमत
रुपये ४१४३ येकेचाळीसशें त्र्येताळीस रुपयांस खरेदी केली आहे,
त्यास सदरहू रुपयांचे जकातीचा आकार होईल तो मशारनिल्हेचे
नांवें खर्च लिहिणें, मजुरा पडतील ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमाविसदार जकात प्रांत
पुणें, व जुन्नर याचे नांवें. सनद.

रसानगी यादी.

सबा सबैन मया व अलफ मोहरम ९

४६७–( ४०९ ) गणेश हरी यास पत्र कीं, परगणे आमोद व हसोट व देहजबरें
येथील कमाल आकाराची बेरीज जमीदार यांचे मार्फतीनें इंग्रजास
तीन लक्षाचे महाल पदरीं त्याचे घालणें, कमाल बेरजेस कमजाजतीनें
जाबसाल करितील, त्यासी बोलणें, जे करारनाम्यांत कमाल बेरीज
तीन लक्षाची द्यावी, ह्मणोन सरकारचा व इंग्रजाचा करार जाहला आहे, त्याप्रमाणें इंग्रजाचे
दस्तावैज सरकारांत आहेत, व सरकारचे इंग्रजाजवळ आहेत. आज नवीन बोलावें हें उ-

---

A. D. 1776-77.

( 466 ) Colonel Upton, Agent of the English at Calcutta, purchased horses and camels and bullocks for Rs. 4143. The octroi duty leviable on the purchase was remitted.

A. D. 1776-77.

( 467 ) Ganesh Hari was directed to hand over to the English a territory worth three lacs of Kamál revenue ( gross assessment ) in the Parganá of Ámod, Hasot and Dehájbare in Gujerath. In case the English made any additional demand, Ganesh Hari was instructed to represent to them that the figure of three lacs was settled at the treaty entered into with them and that it was improper to urge any new demand. The English had sent General (करन्हाक Carnac) an officer of position recently arrived from

सिद्ध आहे; ऐसें त्याजवळ बोलणें. मुंबईकरांनीं जनरेल करण हक मातबर माणूस विलायतेहून आला, तो व बदाम जनराल सुरतचा व रामजी ऐसे भडोजेस तीन लक्षांचा मुलूख घ्यावयास पाठविले असेत, तरी तुह्मीं त्यांपर्यंत जाऊन त्यांस करारनाम्याचा मजकूर सदरीं लिहिला आहे त्याप्रमाणें तिघांस समजाऊन फडशा करणें. करारनाम्याची नकल त्या तिघांजवळही आहे. गंभीर दुराग्रही आहे यास्तव या तिघाजणांस पाठविले आहेत. फडशा करून टाकणें. या उपरांतीक हा गुत्ता न ठेवणें. असेंही करतां दहा पांच हजार रुपयांची तोडजोड कमजास्त पडली तरी कबूल करून फडशा करणें. ज्या सालची कमाल बेरीज धराल त्या सालांत बाकीपैकीं वसूल आला असेल तो जमेस न धरणें. मुंबईहून पत्रें गंभीरास आणविलीं होतीं, त्यास मुंबईकरांनीं करण हक वगैरे यांस पत्र परभारें पाठविलें आहे, व त्याची नकल हुजूर पाठविली ती तुह्मांकडे पाठविली असे. करण हक वगैरे यास देऊन तीन लक्षाचे मुलुखाचा फडशा करून टाकणें, व जंबूसरचे वसुलाविषयीं या पत्रांत मजकूर असे, तरी जनरल बदाम याचें पत्र जंबूसरांत इंग्रज राहतो त्याचे नांवें घ्यावें कीं, महादाजी रामचंद्र व तुह्मीं एक मतें राहून जमाबंदीचा आकार महादाजी रामचंद्र याचे मार्फतीनें करून हल्लीं सालचें कबज असल सालापासून देणें. पुढेंही येणेंप्रमाणें ऐवज फिटे तों करणें. ह्मणोन पत्र घेऊन महादाजी रामचंद्र याजकडे रवाना करणें. सदरहू तीन महाल पैकीं सालमजकुरीं वसूल आला असेल तो इंग्रजांस द्यावा लागतो, सबब जमीदाराचे मार्फतीनें इंग्रजासी रुजू करून यादी इंग्रजाची घेऊन हुजूर पाठऊन देणें ह्मणोन. पत्र.

परवानगी रूबरू.

४६८–( ४१० ) गणेश हरी यास सनद कीं, परगणे आमोद व परगणे हसोट व परगणे देहजबरें, या तिन्ही परगण्यांचा कमाल आकार जमीदारांचे विद्यमानें पाहून त्यापैकीं सुरत व भडोज येथील मोंगलास साता वर्षांपूर्वीं ऐवज सालाबाद पावत होता त्याप्रमाणें वजा करून बाकी

सबा सबैन मया व अलफ मोहरम २७

---

England, Badham General of Surat, and Ramsay, to Broach, to take possession of the territory above referred to. Ganesh Hari was ordered to repair to them and get the matter settled. Ganesh was informed that these men were sent as गंभीर was an obstinate person. Ganesh was permitted for the settlement of the question to concede an additional sum of Rs. 10,000, if such a concession became necessary. He was further instructed to obtain a letter from General Badham to the English officers residing at Jambusar for fixing the Jamábandi in conjunction with Mahádaji Rámchandra, and for receiving the revenue so fixed.

( 468 ) A similar letter was again addressed to him on the 27th of this very month.

A. D. 1776-77.

तीन लक्षांचा मुलूख इंग्रजास लाऊन देणें ह्मणोन, पेशजीं तुह्मांस सनद सादर जाहलीच आहे. ऐशास करनेल व बदाम व रामजी मातबर मनुष्य मुंबईहून आले आहेत, यांचे मार्फतीनें सदरहूप्रमाणें तीन लक्षांचा मुलूख लाऊन देऊन लौकर विल्हेस लाऊन टाकणें. दुसरे पत्राचा उजूर न करणें ह्मणोन. सनद १.

परवानगी रूबरू.

४६९–( ४११ ) महादाजी रामचंद्र यांस पत्र कीं, मुंबईहून पत्र सुरतकर इंग्रजांस जंबूसरचे मजकुराविशीं आणविलें होतें, तें त्यांणीं परभारें जनरल करण हक व बदाम व रामजी यांस पाठविलें, व त्याची नकल हुजूर पाठविली. ते गणेश हरी याजकडे पाठविली असे, ते जनरल करण हक वगैरे तिघांस देऊन त्यांचें पत्र जंबूसरांत इंग्रज राहतो त्याचें नांवें घेऊन तुह्मांकडे पाठवितील. तुह्मीं जंबूसरास जाणें. जंबूसरचें ठाणें इंग्रजाकडे राहावें असें ठरलें आहे. तुह्मी परगणे मजकूर येथील जमीदार व पाटील गांवगन्नाचे आणून सालमजकूरचे जमाबंदीचा ठराव करून इंग्रजांसी रुजू करून त्याप्रमाणें कबज इंग्रजांचें घेणें. पेशजीं तुम्हांस सनदा दिल्या ते समई सालगुदस्तांचे दाहावे मोहरमापासून अलीकडील ऐवजाचें कबज घ्यावें ऐसा करार जाहला होता. परंतु ती गोष्ट ठरण्यांत आली नाहीं, मजकूर राहिला. सालमजकूर अवल सालापासून कबज घ्यावें ऐसा ठराव जाहला, सबब सालमजकूरची जमाबंदी करून त्याप्रमाणें कबज घेणें. जंबूसरचा इंग्रज व तुह्मीं एक विचारें कारभार करणें. जमाबंदीचा ठराव करून तुह्मीं देत जाणें. वसूल करून इंग्रज घेतील ह्मणोन. पत्र १.

सबा सबैन
मया व अलफ
मोहरम १०

परवानगी रूबरू.

४७०–( ४२२ ) बदल देणें इंग्रजास सरकारांतून कर्नेल आपटीण कलकत्तेकर याचे विद्यमानें ऐवज द्यावयाचा करार जाला आहे, त्यापैकीं रसानगी यादी. रुपये २५००० सदरहू ऐवज गोविंद हरी यास पावेतों, मशारनिल्हेचे रदकर्जी लिहिला, सबब गैर आदा. पंचवीस हजार रुपये शिवजी विठ्ठल याजकडे जातीचे तैनातचा व दहीयला पट्टीचा ऐवज येणें, त्यापैकीं यादवराव रघुनाथ याजकडून उरपाडचे ऐवजीं देविले.

सबा सबैन
मया व अलफ
मोहरम २३

---

( 469 ) A letter was sent to Mahádaji Rámchandra directing him to settle the Jamábandi of Jambusar in concert with the English officer at the place, and to allow the latter to recover the revenue.

A. D. 1776-77.

( 470 ) Rs. 25000 were sent to the English in part payment of the sum agreed to be paid to them.

A. D. 1776-77.

४७१—( ४२८ ) मौजे दासगांव, परगणे महाड; व मौजे कुबले, तर्फ तुंडील हे दोन गांव इंग्रज बाणकोटकर याजकडे होते. ते सन खमस सबैनांत इंग्रजाचे बिघाडामुळें सरकारांत जप्त करून जप्तीची कमावीस तुम्हांस प्रांत राजापुरीकडे सांगितली, ऐशास हे गांव रायगड तालुक्यापैकीं सबब तुह्मांकडून जप्तीची कमावीस दूर करून तालुके मजकूर रघुनाथ सदाशिव याजकडे सांगितला, सबब जप्तीची कमावीस मशारनिल्हेकडे सांगितली असे, तरी हे अंमल करितील ह्मणोन, गोविंदराव माणकर याचे नांवें. सनद १.

सबा सबैन मया व अलफ सफर १३

मोकदम, व रयानी यांस कीं मशारनिल्हेसी रुजू राहून अंमल सुरळीत देणें ह्मणोन २.

३

रसानगी यादी.

४७२—( ४३६ ) कमाविसभेट राजश्री रावसाहेब यांस बाबत मोष्टीन इंग्रज वकील मुंबईकर याच्या भेटी डेऱ्यांत जाहल्या तेथें सनगें आलीं तीं जमा गुजारत रवळोजी मान्या खिजमतगार सनगें एकूण किंमत रुपये.

सबा सबैन मया व अलफ रबिलावल ६

६५० किमखापे.

३५० ३००

———— ————

६५० २

१५० सुजनी अस्तर ताफ्ता. १

४० बोढणी जरी बादली १

१०० चिरा जरी बादली १

१०० मुसेजर ॥

१५० जामेवार जरी बादली २, दर ७५

३०० शाला फर्द ४ दर ७५

२४० मखमल गज १६, दर १५

२० कोरेजरी वजन तोळे.

१३॥ प्रत सोनेरी तोळे ९ दर १॥

६॥ प्रत रुपेरी तोळे ६॥ दर १

———— ————

२० १५॥

————

१७५०

| सनगें | गज | तोळे. |
|---|---|---|
| ११॥ | १६ | १५॥ |

---

( 471 ) The village of Dásgaon in Pránt Mahád and another village which were held by the English at Bankot in A. D. 1774-75 were attached by Government in consequence of hostilities with that Power. The attachment still continued.

A. D. 1776-77.

( 472 ) Mr. Mostin, Agent of the English at Bombay, had an interview with the Peshwá in a tent. The following articles were presented by him:

A. D. 1776-77.

जमा जिनसखाना.

कमाविस भेट राजश्री रावसाहेब यांस बाबत मोष्टीन इंग्रज वकील मुंबईकर याच्या भेटी डेऱ्यांत झाल्या सबब तेथें आली ती जमा गुजारत रवळोजी मान्या खिजमतगार. सुमारे.

१ घोड्यावाघाची लढाई. वरून तावदान, समेत घर लाकडी.

१ बैलवाघाची लढाई, वरून तावदान, घर लाकडी.

१ तसबीर श्रीकृष्णाची.

---

३

जमा कमाविसभेट राजश्री रावसाहेब यांस बाबत इंग्रज मुंबईकर याजकडून मोष्टीन वकील आला त्याणें नजर केले ते जमा गुजारत खंडोजी पणदरा खिजमतगार किंमत.

रुपये १६३८=

१ साखळी एकेरी कडेवजा सोनें वजनी दर तोळा रुपये १४॥ प्रमाणें किंमत रुपये १६३८= एकूण सोनें वजन. तोळे ११।

२ हर जिनसी. दागिने.

१ घड्याळ सिंहावरील समेत किल्ली.

१ रागमालीकेची पेटी लहान समेत किल्ली.

---

२

---

३

४७३–( ४४७ ) बरहुकूम देणें मोष्टीन इंग्रज ममईकर यास मेजवानी ऊर्फा सिध्याबद्दल दररोज नक्त रुपये २० प्रमाणें. इजारत छ. ७ रबिलावल तारीख छ. ७ रबिलाकर एक माही बेगमी बद्दल. रुपये ६००

सबा सबैन मया व अलफ रबिलाकर १

रसानगी यादी.

---

1 Clothes worth Rs. 1750,

1 A portrait of Shri Krishna,

1 A घड्याळ ( either clock or watch ) with its key and other things.

( 473 ) Rupees 600 were paid to Mostin for his boarding expenses at Rs. 20 per day from 7th Rabilával to 7th Rabilákhar.

A. D. 1776-77.

४७४–( ४८३ ) टामस मोष्टीन इंग्रज मुंबईकर यांणीं घोडे रास २ दोन, व तट्टू रास एक एकूण तीन घोडीं एक हजार तीनशें रुपयांस पुण्यांत विकत घेतलीं आहेत, त्याची जकात माफ केली असे, तरी सदरहूचे जकातीचा आकार होईल तो त्यांचे नांवें माफ खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमाविसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर याचे नांवें छ. १३ जमादिलाखर.

सबा सबैन मया व अलफ रजब ३०

सनद १.

रसानगी यादी.

४७५–( ४८५ ) चिंतामण हरी यांचे नांवें सनद कीं, परगणा देहजबेरें प्रांत गुजराथ राजश्री नरसिंगराव जनार्दन याजकडे सरंजामास महाल सालगुदस्त दिला होता, त्याजकडून दूर करून इंग्रजाकडे महाल द्यावयाचा करार करून सनदा तुह्मांकडे पाठविल्या, त्यास इंग्रजास महाल दिला नाहीं, सुभाकडे जप्तीस आहे त्याची कमावीस सालमजकुरापासून राजश्री त्रिंबकराव गोविंद याजकडे सांगितली असे, तरी परगणे मजकूर येथील ठाणें जकीरासुद्धां मशारनिल्हेचे हवाली करून कबज घेणें ह्मणोन.

सबा सबैन मया व अलफ रजब ३०

सनद १.

रसानगी यादी. छ. २५ जमादिलाखर.

४७६–( ५१५ ) टामस मोष्टीन वकील दिंमत इंग्रज मुंबईकर यांणीं पुण्यांत जनावरें एकूण किंमत रुपये.

समान सबैन मया व अलफ सवाल ३०

| | | |
|---|---|---|
| २७० | घोडी रास | ३ |
| २० | बैल सर | १ |
| २९० | | ४ |

एकूण दोनशें नवद रुपयांस चार जनावरें खरेदी केलीं, त्याचे जकातीचा आकार माफ केला असे, तरी आकार होईल तो माफ खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमाविसदार. जकात प्रांत पुणें व जुन्नर यांस छ. ११ रमजान. सनद १.

रसानगी याद.

---

**( 474 )** Thomas Mostin purchased 2 horses and 1 pony at Poona for Rs. 1300. The octroi duty leviable on the transaction was remitted.

**A. D. 1776-77.**

**( 475 )** The Mahál of Dehájbare in Piánt Gujerath, which was previously ordered to be transferred to the English, was not made over to them.

**A. D. 1776-77.**

**( 476 )** Thomas Mostin purchased 3 horses and 1 bullock for Rs. 290; the octroi duty on the purchase was remitted.

**A. D. 1777-78.**

४७७–( ५५३ ) सेवकराम यासी कलकत्त्यास कामगिरीस रवाना पेशजीं केलें आहे. त्याचा लेक गुलाबराय अटकेंत ठेवायाबद्दल तुमचे हवाली केला आहे, त्यास सोडावयाची आज्ञा केली असे, तरी सेवकराम याचे भाऊ चिमणलाल यांचे हवाली गुलाबराय मजकूर यास मोकळें करून करणें ह्मणोन, आनंदराव भाऊ कोतवाल कसबे पुणें याचे [नांवें] चिटणिसी. पत्र १.

समान सबैन मया व अलफ रबिलावल २७

४७८–( ५९१ ) अनंतगीर गोसावी याणें राऊत ठेऊन इंग्रजाकडे जात होता तो वस्तभाव, व घोडीं मुद्धां कैद करून ठेवणें ह्मणोन तुह्मांस पेशजीं सनद सादर जाहली होती. त्याजवरून घोडींसुद्धां कैद करून चादवडास ठेविला आहे, त्यास हुजूर आणावयास खिजमतगार पाठविले आहेत, तरी गोसावी मजकूर याचीं घोडीं, व वस्तभाव जी असेल ती व गोसावी यास बंदोबस्तानें हुजूर पाठवणें ह्मणोन, तुकोजी होळकर यांचे नांवें. सनद १.

तिसा सबैन मया व अलफ रबिलावल ५

४७९–( ५९२ ) पागा दिंमत नागो राम यांणीं इंग्रजाकडे सिलेदार जात होते त्यांचीं घोडीं पाडाव करून पागा मजकुरीं आणिलीं त्यांचे चंदीविशीं कलमें.

तिसा सबैन मया व अलफ रबिलावल ७

किता घोडीं रास ८२ एकूण दररोज चंदी केली.

| | | |
|---|---|---|
| ८१। नर रास | १५ दर ८८१ | |
| ८४८१ मादवाना | ४९ दर ८८१ | |
| ८।।। तट्टं | १८ दर ८८।।। | |
| ।१८१ | ८२ | |

एकूण सहा मण एक पायली गल्ला दररोज इस्तकबिल छ. १७ मोहरमपासून तागाईत छ. ४ सफर पावेतों. महिन्याच्या दोन एकादशा वजा करून देणें. कलम १.

किता घोडीं रास ३२ बत्तीस नेहमीं तेथें राहिलीं आहेत त्यांस रोज चंदी केली.

| | |
|---|---|
| ८।।।१ नररास | १० |
| ८१।।१ मादवाना | १९ |
| ८८२। तट्टं | ३ |
| ८२।।१। | ३२ |

एकूण अडीच मण सवा पायली चंदी इस्तकबिल छ. ५ सफरापासून १४ पर्यंत पागा तळ्यास राहील तोंपर्यंत महिन्याच्या दोन एकादशा वजा करून बाकी दररोज चंदी सदरहू प्रमाणें देत जाणें. कलम १.

---

( 477 ) Sewakrám was sent on some business to Calcutta. His son Ánandrao? who was in prison, was ordered to be released.
A. D. 1777-78.

( 478 ) Anantgir Gosávi enlisted some horsemen and was going over to the English. He was arrested, and kept at Chándwad. Tukoji Holkar was directed to send him to Poona.
A. D. 1778-79.

( 479 ) The cavalry under Nágo Rám captured some horsemen who were going over to the English.
A. D. 1778-79.

एकूण दोन कलमें करार केलीं असत, तरी सदरहू प्रमाणें चंदी प्रांत राजापुरी पैकीं देणें ह्मणोन, गोविंदराव, व चिमाजी माणकर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

४८०—(६०९) ५ पोटखर्च कसबे पुणें येथील बेगारी माळी व महार लष्कराहून जखमी लोक पुण्यास आणावयाबद्दल तळेगांवचे मुक्कामीं रवाना केले. यास दर असामीस रुपये ।• प्रमाणें असामी वीस २० एकूण रसानगी यादी. छ. २८ जिल्हेज. रुपये.

तिसा सबैन मया व अलफ जमादिलावल १८

११ बक्षीस खर्च लष्कराहून इंग्रज पळाल्याची बातमी घेऊन आले, त्यास वगैरे परवानगी रूबरू. छ. २३ जिल्हेज. रुपये.

१० तानाजी मोडकर खास बारदार दिंमत राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस, लष्करांतून आला त्यास.

१ भवानसिंग वलद सीतळसिंग प्यादा दिंमत बू(भू)पसिंग चाकणकर याणें पुण्यांत बातमी पुढें येऊन सांगितली त्यास.

——

११

४८१—(६१० व ६११)

तिसा सबैन मया व अलफ जमादिलावल १८

१४७ भाडें खर्च.

१३८ इंग्रजाचे गडबडीमुळें सरकारचें सामान किल्यास न्यावयासी बैल भाड्याचे केले त्यास. रुपये.

३ छ. २१ जिल्हेज शहर पुणें येथील बेगारीचे बैल सामान भरून न्यावयास आणिले, त्यास एक रोजा वैरणीबद्दल बैल ४५ परवानगी रूबरू.

१३५ छ. १ मोहरम. रसानगी यादी. जामदारखाना व एकबेर्जी दप्तरचे रुमाल वगैरे सिंहीगडास रवाना केले त्याचे

---

(480) Rs. 5 were given as wages to Mális and Mahárs sent from Poona to Talegaon to bring the wounded. Rs. 11 were given as a reward to the messenger bringing information of the flight of the English.

A. D. 1778-79.

(481) The jewellery and the records of Government were sent to fort Singhar owing to the disturbance of the English. Owing to the same cause Lady Párvatibai went to Purandar.

A. D. 1778-79.

वोझ्यास वाण्याचे वगैरे बैल सर ९० दर बैली रुपये १ प्रमाणें.

६ नरसापा आवटी.
३ बिठू माळी.
८ महादू भगप्या.
८ लाडखान.
५ तगापा.
६ संभूसेट.
४ सदाशिव.
३ गणशेट.
१० खेमचंद चारण.
१० येसू बोरसा.
२ काबाडी.
२५ वाणी पेठ पुरंदर.

———

९०

४५ सौभाग्यवती पार्वती बाई यांची स्वारी पुरंदरास गेली त्याजबरोबर वोझ्यास बैल सर ३० दर बैली रुपया १॥ प्रमाणें. रुपये.

२७ गुजारत काबाडी बैल १८ एकूण.
१८ गुजारत रामजी शिवनेरकर बैल १२

———

४५

———

१३५

———

१३८

४८२–( ६१३ ) श्रीदेव देवेश्वर वास्तव्य पर्वती यास दंग्यामुळें किल्ले सिंहीगडास रवाना केलें असे, तरी श्रीस पूजेचे व खटपटेचे ब्राह्मणास एकूण असामी तीन यांस उत्तम प्रतीचा शिधा व दररोज नंदादीपास तेल वजन पक्के पावशेर व तूप पावशेर येणेंप्रमाणें दररोज देत जाणें म्हणोन, नारो महादेव किल्ले मजकूर यांस. छ. २१ जिल्हेज. सनद १.

तिसा सबैन
मया व अलफ
जमादिलावल १८

४८३–( ६४३ ) तालुके रायगड येथें इंग्रजाचे गडबडीमुळें गाडदी असामी १०० यांस शेरा दरमहा दर असामीस रुपये ७॥ साडे सात निवळ बारमाही शिरस्तेप्रमाणें ठेवावयाविशीं तुम्हांस आज्ञा करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहू असामी ठेवून रोजमरा तालुके मजकूर

समानीन
मया व अलफ
जिल्काद ४

---

**( 482 )** The idol Shri Deva Deweshwar of Parwati was owing to the disturbance sent to fort Singhar.

A. D. 1778-79.

**( 483 )** Owing to the disturbance of the English the entertainment of a hundred additional Gárdis at Táluká Ráygaḍ was sanctioned.

A. D. 1779-80.

पैकीं गडबड बारे तोंपर्यंत देणें. गडबड वारल्यावर हे लोक दूर करणें ह्मणोन, रघुनाथ सदाशिव यांस. सनद १.

रसानगी यादी.

४८४–( ६४६ ) कोंडाईबारी येथील बंदोबस्त करावयाविशीं तुह्मांस आज्ञा केली असे, तरी बंदोबस्ताकरितां जदीद असामी १०० शंभर लोक चांगले पाहून तालुके मुल्हेरीकडे ठेवावयाचा करार केला असे, तरी तालुके मजकूरचे लोकांच्या शिरस्तेप्रमाणें तैनात करून ठेवणें, आणि बारीचा बंदोबस्त चांगला करून इंग्रजाचा बंदोबस्त जाहल्यावर सदरहू लोक दूर करणें ह्मणोन, रामचंद्र कृष्ण यास. सनद १.

समानीन मया व अलफ जिल्काद ९

रसानगी यादी.

४८५–( ६६३ ) प्रांत कोंकण येथील मामलेदारांचे नांवें सनदा कीं, तुम्हांकडील तालुक्याहून सावकार भात खरेदी करून मुंबईस व साष्टीस इंग्रजाकडे नेतील त्यास नेऊं न देणें, बंदी करणें, येविशींचा बंदोबस्त चांगला करणें ह्मणोन. सनदा.

समानीन मया व अलफ जिल्हेज २८

१ तालुके नेरळ निसबत लक्ष्मण हरी याचे नांवें.
१ प्रांत बेलापूर निसबत कृष्णाजी नारायण याचे नांवें.
१ प्रांत कल्याण भिंवडी निसबत गोविंद राम याचे नांवें.
१ परगणे साळासे ऊर्फ पेण निसबत भास्कर लक्ष्मण याचे नांवें.

४

चार सनदा दिल्ह्या असेत. परवानगी रूबरू.

४८६–( ६६४ ) सर्वोत्तम शंकर यांस चार असामी इंग्रज विजेदुर्गास सांपडले आहेत ते तुह्मांकडे किल्ले पालगड अगर रसालगड तालुके सुवर्णदुर्ग येथें पाठवितील, त्यास तुह्मीं किल्ले मजकुरीं पक्या बंदोबस्तानें अटकेंत ठेवून त्यांचे पोटाचे बेगमीविशीं मशारनिल्हे तुम्हांस लिहितील त्याप्रमाणें

समानीन मया व अलफ जिल्हेज २८

( 484 ) Rámchandra Krishna was directed to entertain 100 additional men at Táluká Mulher to guard the pass of Kondáibári, owing to the disturbance of the English.

A. D. 1779-80.

( 485 ) The Mámlatdárs of Pránt Konkan were directed to prevent merchants from purchasing rice in the Tálukás for being taken to the English at Bombay and Salsette.

A. D. 1779-80.

( 486 ) Sarvottam Shankar found 4 Englishmen at Vijaydurga. He

तालुके मजकूरपैकीं बेगमी करून देणें ह्मणोन, मोरो बापूजी याचे नांवें. सनद १.
परवानगी रूबरू.

सदरहू चहूं असामींस घाटसरीस किल्ला पाहून किल्ल्याचे पायीं ठेवणें. किल्यावर न ठेवणें; आणि पोटास चांगली बेगमी करून देणें ह्मणोन सनदेंत लिहिलें असे.

४८७–( ६७१ ) ३८ मेस्तर बेल इंग्रज व सालीम आरब सरकारांत अटकेस आहेत, त्यांस पोटास वगैरे रसानगी यादी. रुपये.

समानीन मया व अलफ रबिलावल ५

३३ पोटास बेगमीचे इस्तकबिल छ. २७ सफर तागाईत छ. ३० रबिलावल अखेरपर्यंत.

५ मराठा माणूस असामी एक चाकरीस आहे, त्यास रोजमरा माहे रबिलावलचा. रुपये.

---

३८

४८८–( ६७६ ) ४७ कमाविस गुन्हेगारी परशराम भोसले अमदाबाद येथें हल्ला जाहला ते समई इंग्रजाकडील लोकांनीं लष्करचीं घोडीं लुटून नेलीं, त्यास मशारनिल्हेचीं घोडीं नसतां आपली ह्मणोन दोन घोडीं आणलीं सबब ठरावून घेतले ते जमा नक्त आरकटी.

समानीन मया व अलफ रबिलाकर ११

४८९–( ६७९ ) परगणे बलवाड प्रांत गुजराथ महाल बळवंतराव धोंडदेव याजकडे सरंजामास आहे, त्यास पेशजीं इंग्रजांनीं परगणे मजकुरीं ठाणें बसविलें होतें तें तुह्मीं उठवून सरकारचें ठाणें बसविलें आहे. ह्मणोन हुजूर विदित जाहलें; त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी हल्लीं मशारनिल्हेनीं आपले तर्फेनें कमाविसदार पाठविला आहे त्याचे स्वाधीन परगणे

समानीन मया व अलफ जमादिलावल ४

---

A. D. 1779-80. was asked to send them either to fort Pálgad or to fort Rasálgad. Moro Bápuji was directed to receive them, to keep them at the fort and to make suitable arrangements for their food.

( 487 ) Rs. 33 were debited as spent on account of food expenses from 27th. Safar to 30th Rabilával of Mr. Bell, an Englishman, and Salim, an Arab, who were in prison.

A. D. 1779-80.

( 488 ) This sanad refers to the attack of Ahamadábád by the English who forcibly took away the horses in the camp.

A. D. 1779-80.

( 489 ) The English took the Pargaṇá of Balwád in Pránt Gujeráth which was assigned in Saranjám to Balwantrao Dhondeo. The Pargaṇá was taken back by Ganesh Vishwanáth.

A. D. 1779-80.

मजकूरचें ठाणें करणें, हे अंमल करतील, तुह्मीं महालास कोण्हेविशीं उपद्रव न देणें ह्मणोन, गणेश विश्वनाथ यांचे नांवें. चिटणिसी. पत्र १.

४९०–( ६८२ ) प्रांत बुंदेलखंड वगैरे महाल येथील मामलत संबंधें कलम प्रांत मजकुरीं तेजगडवाला लोधी व गढेमंडल्याचे राज्यानें दंगा केला, व सिवाजारचे गुजराचा दंगा, यामुळें जाजती फौज ठेविली, व हल्लीं इंग्रजाचीं पलटणें बुंदेलखंडांत येणार, म्हणून आवाई आहे. आलीं तरी फौजेवांचून बंदोबस्त राहणार नाहीं, म्हणून तुमची विनंति त्यास इंग्रजाचा प्रसंग पडल्यास तुह्मीं यख्तीयारी आहां. जसा समय पाहाल तसी फौज वगैरे ठेवणें ती ठेवावी. मजुरा पडेल. कलम १.

समानीन मया व अलफ जमादिलावल २९

४९१–( ६९० ) माधवराव बोंकसे यास सनद कीं, जंजिरे अरनाळा येथें इंग्रजाचे गडबडीमुळें नेमणुकीशिवाय भरतीस सालमजकुरीं जदीद लोक ठेविले आहेत ते, व हल्लीं ठेवावयाचे, मिळोन दोनशें असामी करार करून दिल्हे पाहिजेत, ह्मणोन तुह्मीं हुजूर विनंति केली त्याजवरून असामी.

इहिदे समानीन मया व अलफ सवाल १६

१२५ पेशजी अवल सालापासून रजब अखेर पावेतों ठेविले आहेत ते.
७५ हल्लीं ठेवावयाचे.

२००

एकूण जदीद असामी दोनशें पैकीं अवल सालापासून रजब अखेरपर्यंत ठेवले आहेत. सवाशें व हल्लीं ठेवावयाचे पाऊणशें जंजिरे मजकूरचे शिरस्तेप्रमाणें ठेवावयाचा करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी चांगले लोक ठेवून जंजिरे मजकूरचा बंदोबस्त करणें. इंग्रजाची गडबड वारलियावरी सदरहू लोक दूर करणें ह्मणोन. सनद १.

४९२–( ६९१ ) प्रांत राजापुरी येथें शामलाचे दंग्यामुळें जदीद लोक ठेवले आहेत, त्यांपैकीं तालुकेहाय येथें इंग्रजाचे गडबडीमुळें लोक ठेविले असत, तरी लोक रवाना करणें म्हणून, गोविंदराव, व चिमाजी माणकर यांचे नांवें. सनदा.

इहिदे समानीन मया व अलफ सवाल २०

---

( 490 ) Full authority was given to the Mámlatdár of Bundelkhand to retain such forces as he might deem necessary in case the English entered Bundelkhand, as it was rumoured they intended doing.

A. D. 1779-80.

( 491 ) Additional men were ordered to be entertained at fort Arnálá owing to the disturbance of the English.

A. D. 1780-81.

( 492 ) Additional men were sent to Tálukás Underi and Revdanda for assistance in consequence of the disturbance of the English.

A. D. 1780-81.

१ तालुके उंदेरी निसबत गणेश बल्लाळ याजकडे लोक असामी १५० देणें पाठवणें ह्मणोन.

१ तालुके रेवदंडा निसबत आनंदराव शिंदे याजकडे लोक असामी १५० देणें ह्मणोन.

---

२

एकूण दोन सनदा दिल्या असत. रसानगी, सदाशिव केशव दात्ये.

४९३–( ६९२ ) लक्ष्मण हरी याचे नांवें सनद कीं, सालमजकुरीं इंग्रजाची गडबड आहे, यामुळें तो हल्लींचे पिकाचा गल्ला घेऊन जाईल, यास्तव तालुके नेरळ येथील रयतीकडे सरकारचा ऐवज नक्त बाब व महसूल वगैरे येणें, त्या ऐवजीं दरोबस्त ऐन जिन्नस गल्ला वसूल घ्यावयाची आज्ञा केली असे, तरी तर्फ वरेडी, व तर्फ वजे, व तर्फ तळोजें तालुके मजकूर, हे तीन महाल किल्ले विकटगड निसबत आनंदराव राम यास किल्यास लगते आहेत, तेथील गल्ला किल्ले मजकुरीं न्यावयाविशीं मशारनिल्हे यास अलाहिदा सनद सादर केली असे; ते महालांत किल्ल्याचे लोक व कारकून जागा जागा पाठवितील व तुह्मीं आपलेकडील कारकून व महागार पाठवून भात वगैरे जिन्नस कापवून मळून त्यापैकीं किल्ले मलंगगड प्रांत कल्याण भिंवडी निसबत गोविंदराम या किल्ल्यास तर्फ तळोजें पैकीं लगत गांव असतील तेथील गल्ला किल्ले मजकुरावर व बाकी झाडून महालचा गल्ला किल्ले विकटगड येथें रात बेरात करून जलदीनें पावता करणें, मुलकांत दास्तान न करणें, सदरहू लिहिल्याप्रमाणें तर्तूद न जाहली, आणि गल्ला इंग्रजानें नेला तरी परिछिन्न कार्यास येणार नाहीं ह्मणोन. सनद १.

इहिदे समानीन मया व अलफ सवाल १२

रसानगी, सर्वोत्तम शंकर.

४९४–( ६९३ ) शेख अबदूल खिजमतगार दिल्लीचा राहाणवाला दिंमत आपटीन इंग्रज याजकडून बातमीस लष्करांत आला होता तो सांपडला, सबब किल्ले विसापूर येथें अटकेंत ठेवावयास पाठविला असे, तरी पोटास शेर दररोज शिरस्तेप्रमाणें देऊन चौकीपहाऱ्यांत ठेवणें ह्मणोन, भिकाजी

इहिदे समानीन मया व अलफ रबिलाखर १५

---

( 493 ) Owing to the disturbance of the English, Laxuman Hari was directed to hasten on the reaping of the crops in Táluká Neral, to recover the Government revenue in kind and to send it as speedily as possible to the several forts for whose support it was assigned. Laxuman Hari was informed that if the matter was delayed, and the English carried away the crops, he would have to answer for the loss.

A. D. 1780-81.

( 494 ) Sheik Abdullá khijmatgár in the service of Upton who

गोविंद, किल्ले विसापूर याचे नांवें. सनद १.

रसानगी, रामचंद्र गोविंद कारकून.
शिलेदार.

## माधवराव रामचंद्र यांच्या कीर्दीपैकीं.

४९५–( ६९५ ) किल्ले सेवगांव, व किल्ले गंभीरगड तालुके सुधा, व परगणे नगर हावेली हे स्थलें इंग्रजाकडून हल्लीं सरकारांत घेऊन तेथील बंदोबस्त तुम्हांस सांगोन त्याविशीं बीतपसील. कलमें.

इहिदे समानीन मया व अलफ. जमादिलाखर.

किल्ल्याचे व ठाण्याचे बंदोबस्तास शिबंदी प्यादे वगैरे नेमणूक असामी.

१५० किल्ले सेवगा.
५० ठाणें चिंचणी.
५० किल्ले गंभीरगड.
१०० ठाणीं तालुके गंभीरगड.
१०० ठाणीं दोन परगणे नगर हवेली.
१०० जवारीस भरणा असावा सबब.

५५०

तैनात दरमहा रुपये.

८०० आरब व सिंदी असामी १०० यांस दरमहा दर असामीस रुपये आठ प्रमाणें आकारमाही शिरस्तेप्रमाणें.

तालुक्याचे बंदोबस्ताकरितां कोळी असामी २०० जदीद ठेवावे, त्यास दरमहा दर असामीस रुपये तीन प्रमाणें एकमाही तैनात रुपये ६०० सहाशें रुपये दसमाही कबज बारमाही चाकरी शिरस्तेप्रमाणें करार केले असत. कलम १.

कोळी नाईकवाडी, वतनदार, इनामदार, सदरहू तालुकियांत आहेत त्यांचे मुद्दामत पेशजीं सरकारांतून चालत आलें असेल त्याप्रमाणें: येणेंप्रमाणें. कलम १.

दोन्ही किल्ल्यांस चार असामी कारकून त्यास तैनात सालीना दर असामीस रुपये १२५ सवाशें प्रमाणें, व ठाणीं असतील तेथें एकेक कारकून त्यास तैनात सालीना साठ रुपये प्रमाणें करार करून ठेवणें. ऐवज मजुरा पडेल. येणेंप्रमाणें. कलम १.

---

A. D. 1780-81. had come into camp to collect information was arrested and confined in the fort of Visápur.

## FROM MÂDHAVRAO RÂMCHANDRA'S DIARY.

( 495 ) The forts of Shevgaon and Gambhirgad in Táluká Sudhá in Pránt Nagar Haveli were at this time taken by Government from the English, and a Mámlatdár was appointed to the place. He was directed to give pardon to all persons who had joined the English in case they proved useful to Government.

A. D. 1780-81.

२७०० कित्ता असामी ४५० यांस तैनात दरमहा दर असामीस रुपये ६ प्रमाणें दसमाही शिरस्तेप्रमाणें.

| ३५०० | ५५० |
|---|---|

तीन हजार पांचशें रुपये सदरहू साडेपांचशें असामींस दरमहा शिरस्तेप्रमाणें करार करून दिल्हे असेत, यांत कांहीं लोक तुर्मी ठेविले आहेत व हल्लीं ठेवाल त्या तेरखापासून मजुरा पडेल. [कलम १.]

किल्ल्याचे बेगमीस गल्ला वगैरे हरजिन्नस जकीरा खरेदी करावयाबद्दल रुपये.

१५०० किल्ले सेवगा.
५०० गंभीरगड.

२०००

दोन हजार रुपये खरेदीबद्दल नेमणूक करून दिल्ही असे, तरी जप्तीचे ऐवजीं सदरहू रुपये घेऊन जिन्नस खरेदी करून ठेवणें. कलम १.

किल्ले सेवगांव हस्तगत होण्याविशीं यशवंतराव भोसले यांणीं मेहनत चांगली केली, सबब मशारनिल्हेस तैनात दरमहा रुपये वीस प्रमाणें बारमाही चाकरी, अकरमाही कबज. चाकरीची तेरीख अवल साल सन इसन्ने समानीन पासून देत जाणें. कलम १.

स्वारीचे कामाकरतां कारकून नवे ठेवावे त्यांस सालीना.

२५० यशवंतराव.
२०० राघो महादेव.

४५०

कोळी नाईकवाडी आहेत त्यांत सरकारचाकरीस उपयोगी पडतील त्यांजला बक्षीस चाकरी पाहून पावेल. येणेप्रमाणें. कलम १.

महालमजकुरीं खर्च पेशजींचे वहिवाटीचे अन्वयें व स्वारीसंबंधें शिधा व भोजनखर्च कार्याकारण करीत जाणें. मजुरा पडेल. कलम १.

किल्ले सेवगांव, व गंभीरगड ह्या दोहीं किल्ल्यांचे सरंजामाचे महाल, व परगणे नगर, हवेली, सुधा मामलत जकाती मिळोन तुह्मांकडे सांगितली असे, तरी महालाचा ऐवज वसूल होईल तो स्वारीसंबंधानें ऐवज मिळेल तो घेऊन खर्चाविसीं नेमणूक करून दिली आहे त्याप्रमाणें खर्च करणें, मजुरा पडेल. जमेचा ऐवज कमी येईल तो पुढें हिशेब पाहून मजुरा सरकारांतून दिला जाईल. येणेप्रमाणें. कलम १.

( फाटलेलें ) तैनात सालीना शागीर्द पेशा. ५०० रुपये.

पांचशें रुपये तैनात सालीना पेस्तर साल सन इसन्ने समानीन पासून करार केले असत. कलम १.

इंग्रजाकडे मिळाले असतील त्यांपैकीं तुह्मांस भेटतील ते सरकार उपयोगीं पडल्यास त्यांचे अपराध माफ केले जातील. कलम १.

+ + + कलम १.

येणेप्रमाणें बारा कलमें करार करून दिल्हीं असत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, कृष्णाजी महादेव याचे नांवें. रसानगी यादी, छ. ६ जमादिलाखर. सनद १.

४९६–( ६९६ ) किल्ले कर्नाळा येथें इंग्रजाचे गडबडीमुळें कुमकेस लोक हेटकरी दिंमत हाये, निसबत कृष्णाजी नारायण याजकडील पाठविले आहेत, यांस अडशेरी दरमहा भात साडे तीन सेरी मापें केली. खंडी.

इहिदे समानीन मया व अलफ जमादिलाखर ६

५॥।·॥१॥ दिंमत साबाजी नाईक तावडे.

| | | |
|---|---|---|
| ५॥। | ऐन असामी | ९२ दर ८१ प्रमाणें. |
| ८॥१॥ | पोर्गा | १ |
| ५॥।·॥१॥ | | ९३ |

३८३८१॥ दिंमत अपसावंत.

| | | |
|---|---|---|
| ३८२॥ | ऐन असामी | ५० दर ८१। |
| ८॥१॥ | पोर्गा | १ |
| ३८३८१॥ | | ५१ |

२॥।३८१॥ दिंमत गोपाळ सावंत.

| | | |
|---|---|---|
| २॥।२॥ | ऐन असामी | ४६ दर ८१। |
| ८॥१॥ | पोर्गा | १ |
| २॥।३८१॥ | | ४७ |

२८३८१॥ दिंमत गोप सावंत.

| | | |
|---|---|---|
| २८२॥ | ऐन असामी | ३४ दर ८१। |
| ८॥·१॥ | पोर्गा | १ |
| २८३८१॥ | | ३५ |

१।·॥१॥ दिंमत गोप सावंत माणगांवकर.

| | | |
|---|---|---|
| १। | ऐन असामी | २० दर ८१। |
| ८॥१॥ | पोर्गा | १ |
| १।·॥१॥ | | २१ |

| | |
|---|---|
| १५।·॥१॥ | २४७ |

(496) Some Hetkaris were sent for assistance at fort Karnálá A. D. 1780-81. owing to the disturbance of the English.

एकूण दोनशें सत्तेचाळीस असामी पैकीं ऐन असामी दोनशें बेचाळीस व पोरें पांच, यास दरमहा अडिसेरी सवापंधरा खंडी अदमण दीड पायली भात कैली देविले असे, तरी सनद पैवस्तगिरीपासून दरमहाचे दरमहा हाजिरी घेऊन हजिरीप्रमाणें अडिसेरी किल्ले मजकूर पैकीं देत जाणें म्हणोन, अनंदराम(ब)राम याचे किल्लेमजकूरचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

## दादासाहेबांच्या कीर्दीपैकीं.

४९७–( ७०५ ) उत्राजी नरसी व सदाशिव महादेव यांचे नांवें सनद कीं, जकात नाकें मौजे कुंभारी परगणा चवऱ्यासी, येथील अमल पेशजीं इंग्रजाकडे होता, तो हल्लीं सरकारांत घेऊन तेथील कमावीस तुम्हांस सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन कच्चा हिशेब हुजूर पाठवणें म्हणोन, मशारनिल्हेचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ रजब १९

४९८–( ६९७ ) पर्वतसिंग दलपतराव संस्थान पेंठ हे तुम्हांकडे किल्ले कोहज येथें चाकरीस पाठविले आहेत. त्याविशीं. कलमें.

इसन्ने समानीन मया व अलफ जमादिलाखर १२

मशारनिल्हे इंग्रजाकडील कोळी फोडून आणून वगैरे कोळ्यांचा जमाव करून इंग्रजाचे कबजांतील मुलुक मारून सरकार चाकरी करून दाखवणार, त्यास तुमचे रजातलबेंत वर्तणूक करून, कोळ्याचा जमाव करितील, त्याची चौकशीनें हजिरी ठाव ठिकाणवार घेऊन तपशीलवार जाबता लिहून हुजूर पाठवणें. कलम १.

मशारनिल्हे खासा सुद्धां पांच असामीनिशीं तेथें चाकरीस येतील त्यास सनद पेवस्तगिरीपासून किल्ले मजकूरचे शिरस्तेप्रमाणें अडसरी देत जाणें. कलम १.

---

## FROM DÂDÂSAHEB'S DIARY.

( 497 ) Utráji Narasi and Sadáshiv Mahádeo were appointed to take charge of the Kamávis of the Octroi Náká of Kumbhári which was taken from the English.

A. D. 1781-82.

( 498 ) Parwatsing Dalpatrao, Sansthánik of Peint, offered to win over the Kolis in the service of the English and with their assistance to lay waste the territory in the possession of the English. He with his 4 attendants was sent to the officer of the fort Kohaj, and the officer was directed to send a detailed list of the Kolis who might be got together by Parwatsing.

A. D. 1781-82.

एकूण दोन कलमें करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरीलप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, आबाजी यादव याचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

४९९—( ६९९ ) लोक दिंमत हाय तुम्हांकडे इंग्रजाकडील बंदोबस्तास पाठविले आहेत.

इसने समानीन मया व अलफ जमादिलाखर २३

असामी.

२२२ लोक दिंमत हुजूर हशम निसबत अण्णाजीराव बोकसे.
३५ दिंमत कृष्णाजी राणे.
१७ दिंमत लक्ष्मण नाईक जाधव.

२७४

एकूण दोनशें चवऱ्याहत्तर असामी पाठविले आहेत, त्यांचा नांवनिसीवार जाबता अलाहिदा आहे, त्याप्रमाणें हजिरी घेऊन चाकरी घेणें म्हणोन, दुर्गोजी शिंदे नामजाद किल्ले माहुली याचे नांवें. सनद १.

रसानगी याद.

५००—( ७०९ ) भिकाजी गोविंद किल्ले विसापूर यांस सनद कीं, इंग्रजाकडील उद्धव ब्राह्मण मालवी, व सेख अबदल्ला खिजमतगार एकूण दोन असामी, हरी बल्लाळ यांणीं स्वारींतून साल गुदस्तां किल्ले मजकूर येथें अटकेस ठेवावयास पाठविले आहेत, त्यांस सोडून देणें; व तुळाजी आंगरे याची बायको किल्ले मजकुरीं अटकेस आहे, तीस पक्का जामीन निशेचा घेऊन किल्ल्याखालीं उतरून हुजूर पुणियास पाठऊन देणें; व जामीनकतबाही पाठवणें म्हणोन. सनद १.

इसने समानीन मया व अलफ साबान १२

रसानगी यादी.

५०१—( ७१२ ) मुंबईची बंदी जाली असतां हरएक जागाहून माल साहुकार मुंबईस नेतात; व तेथून आणितात, त्याचे बंदोबस्तावें वगैरे कामकाज बाबूराव साळोखे, व हरजी नाईक पाटील यास सांगितलें आहे, सबब यांजकडे गलबतें सुमार.

इसने समानीन मया व अलफ साबान १८

---

(499) 274 men were sent to fort Máhuli for assistance against the English.
A. D. 1781-82.

(500) Udhav, a Málwi Brahmin, and Shek Abdullá khismatgár, both in the employ of the English who were prisoners at fort Visápur, were ordered to be set at liberty.
A. D. 1781-82.

(501) Báburao Sálokhe was deputed to prevent traders from carrying merchandise to and from Bombay and some ships were placed at his disposal for this purpose.
A. D. 1781-82.

६ आरमारी गलबतें स्वारीचे उपयोगीं चांगलीं.

४ महागिऱ्या सिले पोस.

---

१०

एकूण दहा गलबतें देविलीं असेत, तरी आरमारी गलबतांवर नेमणुकेप्रमाणें शिपाई लोक व दर्यावर्दी व लडवाई सामान दारूगोळा वगैरे, याप्रमाणें भरती करून देऊन भाद्रपदे पौर्णिमे आलीकडे सदरील लिहिलेप्रमाणें गलबतें यांचे हवालीं करणें; लोकांनीं यांचे रजातलबेंत राहून चाकरी करावी. याप्रमाणें ताकीद करणें. लोकांस व दर्यावर्दी यांस रोजमरा व अडशेरी नेमणुकेप्रमाणें वरचेवर देत जाणें. हे गलबतें पाडाव करून तालुके मजकूरचे बंदरीं आणितील, त्याजवरील माल सरकारचे कारकून बाजी धोंडदेव याजबद्दल दिल्हे आहेल, त्याचे गुजारतीनें घेऊन जाब देणें. याचा पुस्तपन्हा हरएकविशीं करीत जाणें. तालुके मजकूरचे हरएक बंदरीं हे गलबतें मुद्धां येऊन पाणीलाकूड घेतील त्यास घेऊं देणें. दिक्कत न करणें ह्मणोन. सनदा.

१ तालुके अंजणवेल निसबत त्रिंबक कृष्ण याजकडून गलबतें. सुमार.

३ आरमारी.

२ महागिऱ्या.

---

५

पांच गलबतें देविलीं त्याविशीं.

१ तालुके रत्नागिरी निसबत महिपतराव कृष्ण याजकडून गलबतें. सुमार.

३ आरमारी.

२ महागिऱ्या.

---

५

पांच गलबतें देविलीं त्याविशीं.

---

२

दोन सनदा दिल्या असेत. रसानगी याद.

इसन्ने समानीन मया व अलफ रमजान १९

५०२–( ७१७ ) दिनकर बाबूराव फडणीस परगणे शहाडोरा यांणीं गुदस्तां इंग्रजापासून परगणे मजकूरचें ठाणें घेतलें, त्या बाबत शिबंदीखर्च कार्याकारण वाजवी जाला असेल, तो नारो शिवदेव यांचे विद्यमानें तुह्मीं देऊन ठाणें हवालीं करून घ्यावें, येविशीं पेशजीं नारो शिवदेव यांस

---

A. D. 1781-82. (502) Dinkar Báburao Fadnis of Parganá Shahádorá recovered the Parganá from the English in the preceding year.

पत्र सादर जालें, त्यास तुह्मीं महादजी शिंदे याजकडे साल मजकूरची रसद देऊन कमावीस केलीत, कमाविसीवर तुह्मांकडून लक्ष्मण भिकाजी गेले, त्यांणीं याचा सदरील शिबंदीखर्चाचा ऐवज आपण देऊं म्हणून हवाला घेतला असतां ठाणियांत गेल्यावर, तुमचा ऐवज कांहीं आह्मांकडे नाहीं, असें ह्मणों लागले, व शिंदे याचें पत्र शिबंदीखर्च ज्याचा त्यांणीं समजोन घ्यावा, याप्रमाणें घेतलेंत; व सावकारापासून यांणीं कर्ज घेतलें त्यास व इंग्रजापासून ठाणें घेतलें तेव्हां ठाण्यांत जकीरा नव्हता, सबब जमीदार व रयेत यांजपासून गल्ला वगैरे सामान ठाण्यांत घेऊन बंदोबस्त केला. त्यास सांगोन दिनकर बाबूराव यांस मनस्वी निकड करवितां ह्मणोन हुजूर विदित जालें. ऐशास हें कार्याचें नसे. हल्लीं हें पत्र सादर केलें असे, तरी दिनकर बाबूराव यांस शिबंदीखर्च कार्याकारण वाजबी जाला असेल तो ऐवज व जमीदार व रयेतेपासून ठाण्यांत जकीऱ्याबद्दल जिन्नस घेतला आहे, त्या ऐवजाची व सालगुदस्ताची बाकी यांचे कारकीर्दीची राहिली असेल त्याची रुजुवात करून घेऊन, ऐवजाचा फडशा करून देवणें, सदरहू ऐवजाचा फडशा होय तोंपर्यंत मशारनिल्हेस सावकार व जमीदार वगैरे यांचा उपसर्ग लागों न देणें; व मशारनिल्हेस हुजूर यावयाची आज्ञा केली असे, तरी फडणिसीचे कामावर कारकून ठेऊन चीजवस्त सुद्धां येतील त्यास अडथळा न करणें ह्मणोन, रंगो गोविंद यांस चिटणिसी. पत्र १.

५०३–( ७२१ ) इंग्रजाकडील चाकर काहार भोई तीन, व मोतीराम वाणी गांडापूरकर कल्याणास व मुंबईस जाऊन येऊन उदीम करीत होता, ऐसे चार असामी बोरघाट तळघाट येथें चौकीवर सांपडले ह्मणोन लिहिलेंत व त्याजवळ वस्तभाव व रोख ऐवज सांपडला, त्याची याद चारशें चौऱ्यासी रुपयांची लिहून पाठविलीत ते पावली. सदरील चार असामींस हुजूर रवाना करावें, किंवा सोडून द्यावें ह्मणोन लिहिलेंत. त्यास पुन्हां इंग्रजाकडे जाऊं नये अशी जरब देऊन सोडून देणें; आणि त्याजवळ वस्तभाव सुद्धां चारशें चौऱ्यासी रुपयांचा ऐवज सांपडला, तो तुह्मीं तालुके कावनई येथील हिशेबीं जमा धरणें ह्मणोन, गोपाळ बल्लाळ तालुके मजकूर यांचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ सवाल ५

परवानगी रूबरू.

---

( 503 ) 3 Bhois (carriers) in the service of the English and Motirám Wani were found trading with Bombay. They were arrested at the chouki at Borghát Talghát. The property found with them worth Rs. 484 was confiscated and they were set at liberty with a strict warning not to go to the English again.

A. D. 1781-82.

५०४–( ७२२ ) मदनराव येरूणकर हे तुह्मांजवळ किल्ले कोहाज येथें चाकरीस आहेत त्यास त्यांणीं स्वारी करून इंग्रजाचे लोकांशीं लढाई चांगली केली, व पुढेंही चाकरी करून दाखविणार, सबब मशारनिल्हे यांस साल मजकुरापासून पालखी सरकारांतून करार करून दिल्ही त्याविशीं.

इसन्ने समानीन
मया व अलफ
सवाल ६

कलमें.

पालखीची तैनात सालीना रुपये ५०० एकूण पांचशें रुपये खेरीज शिरस्ता, छ. १५ रमजानापासून करार केले असेत. तरी सदरहूप्रमाणें तैनात पाववीत जाणें.

कलम १.

पालखीचे सामानाबद्दल रुपये १०० एकूण शंभर रुपये देविले असेत, तरी देणें.

कलम १.

एकूण दोन कलमें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरील प्रमाणें मामले कोहाजपैकीं देणें ह्मणोन, आबाजी यादव याचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५०५–( ७२६ ) त्रिंबक कृष्ण मामलेदार तालुके अंजणवेल यांस सनद कीं, तालुके मजकूर येथें बंदरकिनारा इंग्रजाची वगैरे गडबड आहे, त्याचे बंदोबस्तास जदीद शंभर लोक ठेवावयाची आज्ञा केली पाहिजे, ह्मणोन तुह्मीं हुजूर विनंति केली; त्याजवरून तालुके मजकूरचे अजमासाखेरीज जदीद लोक असामी १०० शंभर चांगले बरखंदाज मर्द इतबारी देशचे व कोंकणचे मिळोन ठेवावयाचा करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरीलप्रमाणें शंभर लोक तालुके मजकूरचे शिरस्तेप्रमाणें तैनाता करून जामीन घेऊन ठेवणें; आणि बंदोबस्त चांगला करणें. गडबड वारल्यावर लोक दूर करणें ह्मणोन. सनद १.

इसन्ने समानीन
मया व अलफ
जिल्काद ५

रसानगी यादी.

५०६–( ७३० ) इंग्रजाचे तारूतरांडे धरावयास, व त्याच्या मुलकांत जाळपोळ क-

---

( 504 ) Madanrao Yerunker of fort Kobáj gave the English a good battle. A palanquin पालखी with an allowance of Rs. 500 per annum for its expenses was therefore given to him.

A. D. 1781-82.

( 505 ) There being a disturbance of the English on the sea-side of Táluká Anjanwel, 100 additional men were permitted to be entertained.

A. D. 1781-82.

( 506 ) Trimbak Suryáji was entrusted with the work of capturing

इसने समानीन मया व अलफ जिल्काद २६

रावयास त्रिंबक सूर्याजी यास आज्ञा केली आहे, तरी यांचे तर्फेनें रायाजी नाईक बोरकर, व गणोजी नाईक भाटकर, व विठोजी नाईक पनळेकर, व गोविंदराम यास रवाना केले असेत. इंग्रजाचे तारूतरांडे धरितील, व दाणागल्ला मुंबईस जाईल, त्याचा बंदोबस्त करितील. त्यास तुह्मी मुजाहिम न होणें; व इंग्रजाचे मुलकांतील कमाविसीच्या आसाम्या दस्त करून आणितील, त्यांस तुह्मीं अटकेस ठेवणें, त्यांस अडशेरी वगैरे खर्च पडेल तो मशारनिल्हे देत जातील; अटकेंतील कुळाची खंडणी हे करून ज्यास सोडावयास मागतील त्याप्रमाणें सोडीत जाणें ह्मणोन चिटणिसी. पत्रें.

१ तालुके विजयदुर्ग निसबत गंगाधर गोविंद.

१ तालुके देवगड निसबत चिमणाजी रामचंद्र याचे नांवें पत्र कीं, इंग्रजाकडील आसाम्या आणितील त्यांस किल्ले भगवंतगड येथें ठेवणें. हे आचरे याचे बंदरीं राहतील त्यास राहूं देणें ह्मणोन. पत्र.

१ तालुके रतनागिरी निसबत महिपतराव कृष्ण यास.

---

३

एकूण तीन पत्रें दिल्हीं असेत.

५०७—(७३२) किल्ले अर्जुनगड. व इंद्रगड. तालुके वसई येथें सरकारचीं ठाणीं

इसने समानीन मया व अलफ जिल्हेज ९

होतीं. त्यास सालगुदस्तां इंग्रजानें किल्ले घेऊन आपला अमल बसऊन तुह्मांस किल्यावर ठेविलें आहे. त्यास तुमचे मानस किल्ले सरकारचे सरकारांत द्यावे, येविशींचा मजकूर गोपाळ त्रिंबक यांणीं हुजूर समजाविला; त्याजवरून तुमचें निखालसतेचें बोलणें सरकारांत कळलें, सबब हें अभय पत्र सादर केलें असे, तरी किल्यावर शिलकी गल्ला, व जकीरा, व तोफा वगैरे सर जाला असेल, तो सरकारचे कारकून व लोक व सरदार किल्यावर चढतील त्यांजवळ मोजदाद करून देऊन ठाणीं हवालीं करणें; आणि तुह्मी आपली खासगत वस्तभाव हत्यारें सुद्धां

---

A. D. 1781-82.

English vessels and creating a disturbance in their province; and Ráyáji Naik Borkar, Ganoji Naik Bhátkar and Vithoji Naik Panaleker and Govindrám were deputed by him for the purpose.

(507) Fort Arjungad and Indragad in Tarf Bassein were taken by

A. D. 1781-82.

the English in the preceding year, and officers were appointed by them. The officers intimated through Gopál Trimbak their desire to surrender the forts to Government. They were informed that if they surrendered the forts to-

किल्याखालीं उतरून घरीं सुखरूप जाणें. अभय असे. तुम्हांस सरकारांत चाकर राहावयाचें असल्यास हुजूर येणें. चाकरीस ठेविलें जातील, कोणे गोष्टीचा वसवसा न धरणें म्हणोन, समस्त सरदार व लोक किल्ले मजकूर यांचे नांवें अभय. पत्र १.

रसानगी यादी.

५०८–( ७३७ ) अर्जोजीराव ढमाले हवालदार, व कारकून, किल्ले घनगड यांचे नांवें

इसन्ने समानीन मया व अलफ सफर १

सनद कीं, तांबा इंग्रज याजकडे अन्याय लागला, सबब किल्ले मजकूर येथें अटकेस ठेवावयास पाठविला असे. तरी पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें म्हणोन. सनद १.

रसानगी, राघो विश्वनाथ गडबोले, कारकून शिलेदार.

५०९–( ७४३ ) इंग्रजाचीं ठिकाणें मुंबई, सुरत वगैरे येथील बंदी सरकारांतोन केली

इसन्ने समानीन मया व अलफ सफर २६

आहे, त्यास खानदेश प्रांतांतून सुरतेकडे माल फार जातो, सबब तिकडील कामकाज बंदी संबंधें नारो गणेश दिंमत चिंतामण हरी यांस सांगितलें. यांजकडील कारकून त्या प्रांतीं गेले आहेत, त्यांचा बंदोबस्त चांगला करून देणें. प्रस्तुत साखरीस अजमासें दोहो तिहीं लक्षाचा माल आला, तो तुम्हीं जप्त केला आहे; परंतु त्याजपासून नजर घेऊन माल सुरतेकडे जाऊं देणार, म्हणोन हुजूर विदित जाहलें; त्याजवरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे. तरी माल जप्तींत आला आहे तो जाऊं देणार, हे गोष्ट ठीक नाहीं. जो माल साखरीस अटकाविला आहे, तो तसाच जप्तींत ठेवून सावकारास हुजूर पाठऊन देणें. येविशीं दिक्कत न करणें. जर माल सुरतेकडे गेल्यास, त्याचा जाबसाल तुम्हांस करावा लागेल. हें स्पष्ट समजोन करणें. नारो गणेश यासी कोणी दिक्कत करूं लागेल, त्यास ताकीद करून बंदोबस्त करून देणें. स्वार प्यादे लागतील ते देत जाणें म्हणोन, गणेश विश्वनाथ यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

५१०–( ७४५ ) किल्ले गंभीरगड, व सेवगा येथील बंदोबस्ताविशीं वगैरे. कलमें.

---

gether with the stores therein to Government, they would be allowed to repair to their homes in safety. Should they like to accept service under Government, they were asked to come to Poona.

( 508 ) Tom. an Englishman. being found guilty was sent to be imprisoned at fort Ghangad.

A. D. 1781-82.

( 509 ) Government was informed that considerable traffic passed between Khándesh and Surat. As dealings with Bombay and Surat were stopped, officers were sent to prevent the continuance of the traffic.

A. D. 1781-82.

( 510 ) The fort of Gambhirgad was left unoccupied. It was appre-

इसन्ने समानीन मया व अलफ रबिलावल

किल्ले गंभीरगड वोसाड टाकिला आहे, त्यास जवारकर राणी इंग्रजाकडे मिळाली आहे, ती कोळी मिळऊन गंभीरगड वसवणार, आणि मुलकांत धामधूम करून बखेडा करणार. याजकरितां किल्ले मजकूर वसवावा, ह्मणोन पेशजीं तुह्मांस सांगितलें असतां प्रजन्य काळचा किल्ला उज्याड टाकिलात हें ठीक न केलें. त्यास हलीं किल्ले मजकूरचा व किल्ले सवगा देखील महालसुद्धां बंदोबस्त करून घ्यावयाविशीं आबाजी यादव यास अलाहिदा सनद सादर केली आहे, तरी मशारनिल्हे किल्यास हवालदार व लोक पाठऊन किल्याचा व महालाचा बंदोबस्त करून देतील, त्याप्रमाणें तुह्मीं त्यांचे इतल्यांत राहून किल्याचा व महालचा बंदोबस्त येथास्थित राखीत जाणें. कलम १.

प्रांत वसई येथील डाहाणू वगैरे महालच्या रयतेच्या बायका धरून आणून कुणबिणी करितां, ह्मणोन हुजूर कळलें, त्यास रयत कोळी, इंग्रजाचे गडबडीमुळें रयतेस थारा नाहीं, असें असतां रयतेच्या बायका धरून आणितां, हें ठीक नाहीं. धरून आणिल्या असतील त्या सोडून देणें. गैरराह वर्तणूक न करणें. कलम १.

एकूण दोन कलमें लिहिलीं असेत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, कृष्णाजी महादेव याचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५११-( ७४९ ) आनंदराम. व बाळा, व तुलसीचरण यांचे नांवें कौल कीं, तुह्मीं

इसन्ने समानीन मया व अलफ रबिलाखर २६

हुजूर विदित केलें कीं आपण इंग्रजाचे लष्करांत रस्त पोहचाऊन त्याजसमागमें होतों, त्यास कल्याणचे मुकामाहून त्याचे लष्करांतून इकडे येऊन, हरएक बंदरीं मीठ भरून, हरएक घाटें येऊन, देशांत विकून राहूं. यास्तव साहेबीं मेहरबान होऊन जीवन माफक सरकारांत नजर घेऊन कौल द्यावयाची आज्ञा झाली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून तुह्मांपासून नजरेचा ऐवज सरकारांत

---

A. D. 1781-82.

hended that the Ráṇi of Jowár, who had joined the English, might occupy it and plunder the country around. Krishṇáji Mahádeo was therefore directed last year to occupy the fort. He failed to do so. The forts were now made over to the management of Âbáji Yádav.

( 511 ) Ânandram, Bálá, Tulsicharaṇ, who supplied the English with troops, provisions, while on march came over to the Peshwá, and asked for permits to carry salt from the Konkaṇ into the upcountry. Permits were given and the men were warned not to return to the English,

A. D. 1781-82.

रुपये ५०० पांचशें रुपये घ्यावयाचा करार करून हा कौल सादर केला असे, तरी तुह्मीं बेवसवसा येऊन वरकड चरणांप्रमाणें मीठ कोंकणांतून हरएक बंदरीं खरिदी करून, हरएक घाटें देशांत आणून विकणें; आणि जकात शिरस्तेप्रमाणें देत जाणें, अभय असे. तुह्मीं फिरोन इंग्रजाकडे जाऊं नये, गेल्यास पारिपत्य केलें जाईल ह्मणोन. कौल १.

रसानगी यादी.

५१२–( ७५४ ) किल्ले राजमाची येथील लोकांनीं सालगुदस्त इंग्रजाचे लढाईंत चाकरी चांगली केली, सबब इजाफा वगैरे करार करून दिल्हा त्याविशीं. कलमें.

इसन्ने समानीन मया व अलफ जमादिलाखर १

सरदार व लोक यांस कदीम शिरस्तेप्रमाणें सालीना इजाफा.

रुपये ४०

एकूण चाळीस रुपये सालीना छ. १ रविलाखरापासून करार करून दिल्हे असेत, तरी ज्यांणीं चाकरी केली असेल, त्यांस माणूस पाहून इजाफा करून त्याप्रमाणें पाववीत जाणें. कलम १.

गणेश बल्लाळ फडणीस किल्ले मजकूर यांस अफ्तागिऱ्याची नेमणूक. रुपये.

५० अफ्तागिऱ्या असामी १ एक एकूण सालीना. रुपये.

२० अफ्तागिराचे सामानाबद्दल एक सालाआडचे शिरस्तेप्रमाणें. रुपये.

——

७०

एकूण सत्तर रुपये करार केले असेत, तरी अफ्तागिऱ्याचे पन्नास रुपये छ. १ रबिलाखरापासून पाववीत जाणें, व अफ्तागिराचे सामानाचे वीस रुपये तूर्त सालमजकुरीं देणें. कलम १.

एकूण दोन कलमें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरील प्रमाणें तालुके मजकूर पैकीं देणें ह्मणोन, रामराव नारायण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५१३–( ७६७ ) अर्जोजीराव ढमाले, हवालदार व कारकून, किल्ले घनगड याचे नांवें जाब कीं, लिहिलें विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. तांबा इंग्रज किल्ले मजकुरीं अटकेस होता, त्यास हुजूर पाठवणें ह्मणोन तुह्मांस सनद सादर जाली, त्याजवरून तांबा मजकूर याजबरोबर शिपाई देऊन

सलास समानीन मया व अलफ रजब ८

(512) Rewards were given to officers and men of fort Rájmáchi who did excellent service in a battle fought with the English in the preceding year.
A. D. 1781-82.

(513) Tom, an Englishman, who was a prisoner at fort Ghangad, was brought to the Huzur.
A. D. 1781-82.

हुजूर पाठविला तो येऊन पोहचला. शिपाई माघारे पाठविले असेत ह्मणोन. जाब १.

५१४–( ७८८ ) संगन नाईक मोऱ्या कोळ्याचे मलईत मिळोन मुलकांत दंगा करित होता. उपरांत इंग्रजाकडे बेलापुरास राहोन तेथून सरकार तालुक्यांत येऊन चोऱ्या करून रयतेस उपद्रव देत होता. तो हल्लीं तेथून निघोन कोळवणांत जात असतां हरी लक्ष्मण यांणीं पत्ता लावून, धरून आणून, तुह्मांकडे पाठविला, तो तुह्मीं किले विलासगड येथें अटकेस ठेविला आहे. त्यास मोऱ्या मजकूर लबाड कोळ्याकडे मिळोन सरकारचे प्रांतांत उपद्रव करित होता, सबब त्यास तोफेचे तोंडीं द्यावयाचा करून, हे सनद सादर केली असे, तरी मोऱ्यामजकूर यास तोफेचे तोंडीं देणें ह्मणोन, आनंदराव राम यांचे नांवें. सनद १.

सलास समानीन मया व अलफ रबिलाखर १९

रसानगी याद.

५१५–( ७९४ ) आनंदराव धुलप, सुभा अरमार विजयदुर्ग, याचे नांवें सनद कीं, साल मजकुरीं इंग्रजी बोट एक. व बतेले, व शिबडीं मिळोन पांच दागिने. जंगी सामान मुद्धां, मेककेर कपितान मुंबईहून घेऊन हेट जात असतां. तुमची व त्याची गाठ पडोन. लडाई होऊन, सदरील तरांडीं कपितान सुद्धां तुह्मीं पाडाव करून आणिलीं आहेत, त्यास हल्लीं सदरील पांच दागिने सामान सरंजाम व तरांड्यावरील कपितान वगैरे लोक सुद्धां सोडून द्यावयाची आज्ञा केली असे, तरी जराबजरा मालमुद्धां तरांडीं कपितानाचे स्वाधीन करून पोंच घेऊन कपितान वगैरे लोक सुद्धां तरांडीं सोडून देणें ह्मणोन. सनद १.

सलास समानीन मया व अलफ जमादिलाखर ७

रसानगी. सदाशिव केशव दात्ये.

५१६–( ८०४ ) बतेला सावकारी रूपोरल इंग्रज मुंबईकर याजकडील सालगुदस्तां तालुके रत्नागिरी येथील आरमारी गलबतांनीं जंजिरे मजकूर येथें धरून आणिला आहे, तो हल्लीं सोडून द्यावयाची आज्ञा तुह्मांस केली असे, तरी सदरील बतेला सरंजामसुद्धां, व त्यावर माल असेल तो दे-

अर्बा समानीन मया व अलफ रजब १४

(514) Sangan Naik Moryá, a Koli resident under the protection of the English at Belápur, created disturbance and committed thefts in the country. He was arrested and sentenced to be shot.

A. D. 1782-83.

(515) 5 boats belonging to the English under the command of an English Captain were captured by Ánandrao Dhuḷap. These with the Captain and merchandise were ordered to be set at liberty.

A. D. 1782-83.

(516) A trading vessel under the command of रुपोरल (Ruporal) belonging to the English of Bombay which was seized at Ratnágiri, was ordered to be restored to the English with its cargo.

A. D. 1783-84.

थील इंग्रजाकडील माणसें येतील त्यांचे स्वाधीन करून पावलियाची पौंच घेऊन हुजूर पा-ठवणें ह्मणून, महिपतराव कृष्ण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५१७–( ८०७ ) तालुके चोण प्रांत कल्याण हा महाल तालुके राजमाचीकडे आहे, त्यास इंग्रजाचे दंग्यामुळें रयत परागंदा जाहाली. घरेंदारें जळालीं. या-जकरितां रयतेस तगाई दिल्ह्यास महालची लावणी होईल, ह्मणोन तुह्मीं विनंति केली, त्याजवरून माहालची लावणी जाहाली पाहिजे, याज-करितां रयतेस तगाई गल्ला, व नक्त चौकशीनें देऊन हंगामी उगवणी करून घेणें ह्मणोन, रामराव नारायण यांचे नांवें. सनद १.

अर्बा समानीन
मया व अलफ
रजब २९

रसानगी यादी.

५१८–( ८०८ ) कसबे कल्याण, व कसबे भिवंडी, व किल्ले दुर्गाडी येथें व कांहीं म-हालीं इंग्रजाचे गडबडीमुळें सरकारचा अमल नव्हता, त्यास हल्लीं किल्ले, व ठाणीं, व मुलुख सरकारांत घ्यावयाचा करार जहाला, सबब किल्ले व ठाणीं सुद्धां मामलत सालमजकुरीं तुह्मांस सांगितली असे, तरी सरकारांत ठिकाणें व मुलुख आहे, त्याचा व इंग्रजाकडे ठिकाणें होतीं, तेथील वगैरे अमल चालत नव्हता त्याचा बंदोबस्त पेशजींप्रमाणें तुह्मी करणें ह्मणोन, गोविंद राम कमा-विसदार, प्रांत कल्याण भिवंडी यांचे नांवें. सनद १.

अर्बा समानीन
मया व अलफ
साबान २

रसानगी यादी.

५१९–( ८०९ ) प्रांत वसई येथील जंजिरे, व किल्ले, व कोट, व मुलुक इंग्रजानें घेतला होता, तो सरकारांत माघारा घ्यावयाचा करार जाहला. तेथील बंदोबस्त सालमजकुरीं तुह्मांस सांगितला असे, तरी जंजिरे, वसई, व अर्नाळा वगैरे किल्ले, कोट, व मुलुख तुह्मीं आपले हवालीं करून घे-

अर्बा समानीन
मया व अलफ
साबान ११

---

( 517 ) The Tarf of Choṇ in Pránt Kalyan was owing to the disturbance of the English depopulated and the houses were burnt down. Tagái in grain and in cash was sanctioned to be given to induce the rayats to take up cultivation.

A. D. 1783-84.

( 518 ) During the disturbance of the English, Government lost their control over the villages of Kalyan, Bhiwaṇḍi and the fort of Durgádi and some Maháls. Their surrenders to Government being now agreed upon, the Kamávis-dár of Pránt Kalyan was directed to take charge of them.

A. D. 1783-84.

( 519 ) Similar orders were issued in regard to the fort of Bassein and Arnáḷa and other places in Prant Bassein, which were lost by Government. during the war with the English.

A. D. 1783-84.

ऊन, हुमाने इतबारें बसोन, तुम्हांबरोबर नामजाद केला. तीन हजार देविले आहेत. त्यापैकीं ज्या ठिकाणीं जसें असावें तसें ठेवून तूर्त बंदोबस्त यथास्थित करणें. किल्याचे हवालदार, व दरकदार, व सरदार हुजुरून करार होऊन सनदा सादर होतील. त्याप्रमाणें त्यांचे हातून कामकाज घेणें. प्रांत मजकूर येथील जमाखर्चाचा बेहेडा अलाहिदा करून दिल्हा जाईल. त्याप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, आनंदराव राम यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५२०–( ८२१ ) तालुके वसई पैकीं किल्ले इंद्रगड, व अर्जुनगड हे दोन्ही किल्ले, व परगणे खलोड पवाडी, व परगणे नगर हवेली हे दोन्ही महाल सुरतकर इंग्रज याजकडे होते, त्यास प्रांत गुजराथ वगैरे येथील किल्ले व ठाणीं, व महाल त्यांणीं सरकारांत दिल्हे; त्यास ते सदरील दोन्ही किल्ले, व महाल चिंतामण हरी यांजकडील कारकुनाचे हवालीं केले, ते त्यांणीं आनंदराव भिकाजी, व त्रिंबक भिकाजी यांचे हवालीं केले आहेत, ते पेशजींप्रमाणें तालुके मजकुराकडे ध्यावयाचा करार करून सदरील दोन्ही किल्ले, व महाल तुह्मांकडे द्यावयाविशीं अलाहिदा मशारनिल्हे यास सनद सादर केली आहे, त्याप्रमाणें महाल, व किल्ले तुमचे हवालीं करितील. तेथील बंदोबस्त तुह्मीं करणें ह्मणोन, आनंदराव राम यांचे नांवें. सनद १.

अर्बा समानीन
मया व अलफ
सवाल १

आनंदराव भिकाजी, व त्रिंबक भिकाजी यांस सदरील अन्वयें कीं, दोन्ही महाल व किल्ले जकीरासुद्धां मशारनिल्हे यांचे हवालीं करून कबज घेणें ह्मणोन. सनद १.

---

२

रसानगी, बाळाजी महादेव तालुके शिवनेर.

५२१–( ८२६ ) कर्नेल चार्लीस इंग्रज सुरतकर याजकडून कासीबजोडी पत्रें घेऊन आली, त्यास निरोप समई इनाम, रसानगी यादी. रुपये.

अर्बा समानीन
मया व अलफ
सवाल १९

२ महासिंग.
२ गंगाराम.

---

४

---

(520) The English of Surat agreed to make over to the Peshwá the forts, Tháṇás, and Mahâls in Gujerath, &c. The forts of Indragaḍ and Arjungaḍ and Parganás of Khalode Pawáḍi and Nagar Haveli were accordingly surrendered by them to a karkoon of Chintáman Hari.

A. D. 1783-84.

(521) Two messengers came from Surat with letters from Colonel Charles.

A. D. 1783-84.

५२२–( ८३० ) सरकारचे व इंग्रजाचे बिघाडामुळें इंग्रजाकडील मुंबई वगैरे येथील बंदी सरकारांतून केली होती, त्यास सांप्रत सरकारचा व त्यांचा सलूक होऊन बंदी मोकळी करून, हें पत्र सादर केलें असे, तरी नाके बंदीस कारकून व प्यादे तुह्मीं ठेविले असतील ते उठऊन नेणें. या उपर सावकार उदमी वगैरे यांस आमदरफ्तीचा अडथळा न करणें ह्मणून, मामलेदार तालुके हाय यांचे नांवें चिटणिसी. पत्रें.

अर्बा समानीन
मया व अलफ
जिल्हेज २२

१ आनंदराव शिंदे तालुके रेवदंडा यास कीं, जंजिरे मजकूर येथील बंदरचे नाकेबंदीस ठेविले असतील त्याविशीं.

१ गंगाधर गोविंद तालुके विजयदुर्ग यास कीं, तालुके मजकूर येथील बंदर हायचे नाकेबंदीस ठेविले असतील त्याविशीं.

---

२

५२३–( ८६० ) गंजी मूसा तालचिरीकर याची कादरी गुराब सरकारचे आरमारांनीं दस्त करून आणली, त्याविषयीं मुंबईकर जनराल यांणीं तुह्मांस लेहून पाठविलें, त्यास गुराब जफ्त केली ते समई गुराबीवर इंग्रेजी कौल व निशाण नव्हतें, या अन्वयें त्याचे पत्राचें उत्तर तुह्मीं लिहिलें, त्याजवरून त्यांणीं तालचिरीस लिहून चौकशी करविली आहे. तरी तेथें चौकशी होऊन त्याचें लिहिलें सरकारांत येऊन तुम्हांस आज्ञा होय तोंपर्यंत गुराब मालसुद्धां अमानत ठेवणें ह्मणोन, आनंदराव धुळप आरमार विजयेदुर्ग याचे नांवें चिटणिसी. पत्र १.

खमस समानीन
मया व अलफ
जिल्काद ४

---

( 522 ) Owing to hostilities with the English all trade with Bombay and other places ( belonging to the English ) was prohibited. Peace having been established, the prohibition was removed.

A. D. 1783-84.

( 523 ) Ánandrao Dhuḷap of the navy captured a ship belonging to Ganji Musá Talchiriker ( गंजी मुसा तालचिरीकर ). The General of Bombay wrote to Dhulap on the subject. He informed the General that the ship was captured as it did not bear the English flag. The General made inquires of the authorities at Tálchiri तालचिरी on the subject. Dhuḷap was directed to keep the ship under attachment till receipts of orders which were to be issued on receiving a reply by Government from the General.

A. D. 1783-84.

५२४—( ८८० ) सरकारचा, व इंग्रज, व फिरंगी यांचा तह जाला, त्यास तहनाम्यांत दर्यांतील जहाजांचे आमदरफ्तीविशीं कलमें करारांत आलीं ते.

खमस समानीन
[illegible] अलफ
जमादिलावल १६

बीतपशील.

४ इंग्रजाचे तहनाम्यांतील. कलमें.

३ महादजी शिंदे यांचे विद्यमानें तह जाला त्यांतील.

१ कंपणी इंग्रज, व पेशवे साहेब हरदू सरकारांतून करारांत येतें कीं, तर्फेनचे जहाजांस दर्यांतून येण्याजाण्याविशीं परस्परें खलष न पोहोंचावा. तर्फेनचीं जहाजें तर्फेनच्या बंदरीं सुखें येतजात जातील; व त्यास हिमायत परस्परें बंदरीं दिल्ही जाईल.

१ पेशवे साहेब व मराठ्याचे सरकारचे तमाम सरदार कबूल करतात कीं, इंग्रजांनीं पेशजींप्रमाणें मराठ्यांचे मुलकांत सवदागिरीचा कारभार करावा. कोणेविशीं त्यांस मुजाहिम होणार नाहीं. याचप्रमाणें इंग्रज कबूल करतात कीं, पेशवे साहेब यांच्या लोकांनीं इंग्रजांचे मुलकांत सवदागिरीचा कारभार बेदिक्कत करावा.

१ मागाहून कलम करार होऊन आलें कीं, दोस्तीच्या करारनाम्याचे अकरावे कलमांत तर्फेनच्या जहाजांचे येण्याजाण्याविशीं मजकूर बदस्तूर साबीक लिहिणेंत न आला, सबब हल्लीं लिहिण्यांत येतें कीं, हरदू सरकारचे जहाजांची आमदरफ्ती बदस्तूर साबीक होईल.

---

३

१ इपटेन किल्ले पुरंदरास येऊन सनसीत सबैनांत सरकारासी तह करून तहनामा जहाला, त्यांतील कलम कीं, परस्परें मराठ्यांसी व इंग्रजांसी करार जाला कीं, अगर जहाज, गुराब वगैरे बाबत इंग्रजीया जहाज सौदागरी, जीं इंग्रजाच्या पन्हाईत असतील ते जहाज व गुराब वगैरे मराठ्यांच्या तालु-

---

( 524 ) The following agreement was entered into by the Government with the English:—

A. D. 1784-85.

1 No obstruction should be offered by one Power to the ships of the other Power moving into the sea.

1 There should be no restrictions in regard to trade in the territories of the two Powers.

1 Ships of any Power overtaken by a storm and stranded within the jurisdiction of the other Power should be assisted by the other Power.

कियांत कोण्याहि किनाऱ्यावर फुटेल तरी, हरएक विषयीं कुमक व मदत जहाजाचा माल व सरंजामाच्या निगेबानीसाठीं मराठ्यांकडून, अथवा त्या स्थलचे राहणाराकडून जें जरूर पडेल तें करावें, व मालाची निगेबानी करून जहाजाचे धन्यास सांगावें, जो पैका ज्या कामाबद्दल खर्च होईल तो जहाजाचा धनी पावता करील. अंग्रेजाची कंपनी कौल करार करीत आहे, सदरील प्रमाणें जहाज वगैरे मराठ्यांच्या सरकारचें, कंपनीचे तालुक्याचे किनाऱ्यावर फुटलें तरी सदरील लिहिल्याप्रमाणें कुमक व मदत अमलांत आणितील.

---

४

७ फिरंगी गोवेकर याचा तह सन समानीनांत जाहला त्यांतील. कलमें.

१ सरकारचे आरमारासी व फिरंगी याचे आरमारासी अगर एकाही तरांड्यासीं, अथवा एकही तर्फेचें एकच तरांडें व दुसरे तर्फेचे आरमारासी दर्यांत गांठ पडली तर सलुखानें वर्तावें.

१ सरकारचे आरमारासी व फिरंगी याचे आरमारासी मार्गीं गांठ पडोन, एक तर्फेस पाणी व फाटीं नसल्यास दुसरे तर्फेनें पाणी व फाटीं अधिक शिल्लक असेल तर द्यावें, व गल्ला एकाच्या आरमारावर शिल्लक नसोन, दुसरे आरमारावर अधिक शिल्लक असेल तर नक्त रुपये घेऊन गल्ला द्यावा. येणेंप्रमाणें दुतर्फा चालावें.

१ चीनच्या प्रांतांतील फिरंगी याचे बंदरचीं जहाजें माल भरून उदमास हर एकाचे बंदरीं खरेदी फरोक्तास समुद्रांत फिरतात, त्यास सरकार तर्फेच्या आरमारानें मुजाहिम होऊं नये, व चीनच्या बंदरीं सरकार तर्फेचे बंदरचीं

---

The following agreement was entered into by Government with the Portugese.

1 Ships of both the Powers, meeting each other in the sea, should act in a friendly manner towards each other.

1 In case a ship of one Power while moving in the sea be in want of water, fuel, or other provisions and meet a ship of the other Power, the latter shall, if it can spare, supply the former with the article of which it is in want. Price shall be paid for any provision thus supplied.

1 Ships of both the Powers shall not obstruct each other in their trade with China.

जहाजें उदमास जाण्याकरितां समुद्रांत फिरतील त्यास फिरंगी यांणीं मुजाहिम होऊं नये.

१ सरकारच्या राज्यांत फिरंगी याजकडील मुलकांतील सावकारी तरांडीं, पडाम्या अगर बतेले माल घेऊन येतील. उदमी व्यवसाव करणार. त्यांणीं सालाबादप्रमाणें जकात सरकारांत देऊन करावा व कोणापासून तोसीस होऊं नये. सावकार(रानें) आपला जिन्नस विकून दाणा वगैरे जिन्नस खरेदी करून सुखरूप न्यावा. याप्रमाणें सरकारचे राज्यांतील सावकारांनीं बतेले व पडाम्या फिरंग्याचे मुलखांत दाणा वगैरे जिन्नस विकून तेथील जिन्नस मुबदला वगैरे खरेदी करून घेणार, तो घ्यावा. सालाबादप्रमाणें जकात देतात ती देऊन सुखरूप जावें; कोणापासून उपसर्ग होऊं नये. दुतर्फा करार असे.

१ सरकारचे राज्यांतील, व फिरंगी याचे मुलकांतील सावकारी तरांडीं हरएक राज्यांत जाण्याकरितां समुद्रांत फिरतात, तीं दुतर्फाचे आरमारास अगर हर कोणी युद्धाचे जहाजास किंवा सिबडास सांपडलीं तर, कौल नाहीं म्हणून धरूं नये, सुखरूप जाऊं द्यावीं. दुतर्फा राज्यांतील सावकारी तरांडे समुद्रांत गनीम नेत असेल आणि दुतर्फामधील कोणाचेही आरमार किंवा एकाही तरांड्यासी गांठ पडली तर मदत करून जोर पोहोंचल्यास सोडऊन जवळ-सार खाडीपावेतों पोहोंचवावें. याप्रमाणें जो सरदार करील त्याचा खावंदानें बहुमान करावा.

१ सरकारचे आरमारास, व गनीमासी गांठ पडोन युद्ध होत असतां त्या समयीं फिरंगीयाचें आरमार, व फरगत येऊं नये. पावले तर गनीम फिरंगी याचा स्नेही नसल्यास होईल तें साहित्य व कुमक करावी. याप्रमाणें दुतर्फाचे आरमारानें करावें.

---

1 Ships of one Power shall be at liberty to trade with the territory of the other Power on payment of the usual duty.

1 Ships of merchants in the territories of the two Powers shall not be detained by any Power on the ground of their sailing without their permit. In case if such a ship of one Power, while being taken away by the enemy, meets a ship of the other Power, the latter shall exert to the utmost to rescue the former & to escort it to the shore.

1 In case a Portugese ship, while sailing through the sea, meets the Government navy engaged in action with another power ( which is not on friendly terms with the Portugese ), the Portugese ship shall render assistance to the Government navy against the other Power.

१ सरकारच्या राज्यांतील साहुकारी तरांडीं सिकस्त व फुटोन फिरंगी याचे बंदरीं लागेल तर तरांडें मालसुधां माघारें द्यावें. अगर गनीमाच्या भयास्तव बंदरीं आलें तर त्यास मुजाहिम होऊं नये. याप्रमाणें दुतर्फा चालावें.

७

११

एकूण अकरा कलमें परस्परें करारांत आलीं आहेत, त्याप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, सदरील कलमबंदीप्रमाणें जाबते लिहून तालुकदारांकडे पाठविले ते. जाबते.

१ सुभा आरमार विजेदुर्ग निसबत आनंदराव धुळप.
१ तालुके विजयदुर्ग निसबत गंगाधर गोविंद याजकडे.
१ तालुके रेवदंडा निसबत आनंदराव शिंदे.
१ प्रांत वसई निसबत जिवाजी गोपाळ.
१ तालुके सुवर्णदुर्ग निसबत मोरो बापूजी.
१ तालुके अंजणवेल निसबत त्रिंबक कृष्ण.
१ तालुके रत्नागिरी निसबत महिपतराव कृष्ण.

७

सात जाबते पाठविले असेत. परवानगी रूबरू.

५२५–( ९१८ ) मेस्त मालीट वकील इंग्रजाकडील मुंबईहून पुण्यास येतात, त्यांस वोझ्यास बेगारी, व येतांना मुक्कामास राहतील तेथें राहावयास जागा, व शाखभाजी, पानपत्रावळ, व लाकडें वैरण वगैरे, महादाजी त्रिंबक कारकून निसबत नारो महादेव गद्रे यास पाठविले आहेत. हे कार्याकारण पाहोन सांगतील त्याप्रमाणें साहित्य करीत जाणें ह्मणोन. सनदा.

सीत समानीन मया व अलफ रविलाखर ४

१ बळवंत राव दादाजी, प्रांत कल्याण यास कीं, बैल सर ५० पन्नास बेगारीचे प्रांत मजकूर पैकीं भुसारी वगैरे यांजकडून पुणेंपर्यंत देणें ह्मणोन.

1 The Portugese shall also render assistance to any Government ship which may be stranded on the Portugese shore, or which may repair to such shore for shelter against an enemy.

( 525 ) Mr. Mallet, Vakil of the English, being about to proceed to Poona, orders were issued to the various officers on the way to supply him with the necessary provisions.

A. D. 1785-86.

१ रामराव अनंत, प्रांत कर्नोळा यास कीं, वोड्यास बेगारी असामी १०० एकशें प्रांत मजकूर पैकीं पुर्णेपर्यंत देणें ह्मणोन.

२ पांडुरंग रामचंद्र, व रामचंद्र सदाशिव, तालुके बेलापूर यांस कीं, बेगारी नेहेमीं पुर्णेपर्यंत.

१ बैल सर ५० पन्नास बेगारीचे तर्फ मजकूरचे भुसारी यांजकडून वगैरे देणें ह्मणोन.

१ बेगारी असामी १०० एकशें नेहमीं पुर्णेपर्यंत, व तर्फ मजकुरीं मुक्कामास राहतील तेथें जागा वगैरे साहित्य करणें ह्मणोन.

---

२

२ गोविंद कृष्ण, तालुके नेरळ यांस कीं, बेगारी नेहेमीं पुर्णेपर्यंत देणें ह्मणोन.

१ बैल सर ५० पन्नास तालुके मजकूर येथील भुसारी यांजकडील वगैरे देणें ह्मणोन.

१ बेगारी असामी १०० एकशें व तालुके मजकूरचे गांवीं मुकामास राहतील तेथें राहावयास जागा वगैरे साहित्य करणें ह्मणोन.

---

२

१ बाळाजी जनार्दन, किल्ले लोहगड यास कीं, तर्फ मजकूरचे गांवीं मुक्कामास राहतील तेथें राहावयास जागा वगैरे साहित्याविशीं.

१ भिकाजी गोविंद, किल्ले विसापूर यास कीं, तालुके मजकूरचे गांवीं मुक्कामास राहतील तेथें जागा रहावयास वगैरे साहित्याविशीं.

१ रामचंद्र नारायण, प्रांत पुणें यांस कीं प्रांत मजकूरचे गांवीं मुक्कामास राहतील तेथें रहावयास जागा वगैरे साहित्याविशीं.

---

९

एकूण नऊ सनदा दिल्ह्या असेत.

रसानगी यादी.

'५२६-( ९२० ) जमा जामदारखाना.

सीत समानीन मया व अलफ जमादिलावल ६

कमाविसभेट राजश्री राव यांसी बावत इंग्रज कलकत्तेकर याजकडून मेस्तर चारलिस वरली मेस्तर मालीट वकील आले, त्यांणीं दिल्ही, ती गुजारत जानोजी जावक खिजमतगार सनगें एकूण किंमत. रुपये.

---

( 526 ) Clothes worth Rs. 515 were received as a present from Mr. Mallet who had come as Agent of the English of Calcutta.

A. D. 1785-86.

१५० शाला थिर्के २
२८५ किमखाप २
९० शेले साधे धुवट २

५१५ ( ५२५ ) ६

५२७–( ९२६ ) मेस्त मालीट इंग्रज वकील कलकत्तेकर यांणीं पुणियांत सवदागरापासून घोडीं व उंट वगैरे खरेदी केले, त्याची किंमत. रुपये.

सीत समानीन मया व अलफ रजब २७

३९५ घोडीं रास ३ एकूण.
७९५ उंट नफर ६ एकूण.
१५ बैल सर १ एकूण.
६५ कुणबीण कस १ एकूण.

१२७०

एकूण बाराशें सत्तर रुपयांस खरेदी केले, त्याचे जकातीचा आकार होईल तो त्यांस माफ केला असे, तरी यांचे नांवें माफ खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमाविसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर यांचे नांवें. सनद १.

रसानगी याद.

५२८–( ९४७ ) बद्दल देणें मेस्त मालीट वकील इंग्रज कलकत्तेकर यास रहावयास नारायण पेठेंत खेलोजी गोंधळी याची जागा दिल्ही. त्यास तेथील दरवाज्यावरील बंगल्याची दागदोजी करावयास घासीराम सावळदास यांस सांगितली होती, त्याजवरून त्यांणीं दागदोजी करून जागा नीट करून दिल्ही, त्यास खर्च जाहला तो इस्तकबिल छ. २० सावान तागाइत छ. १९ रमजान मुक्काम रोज ३० एकूण रसानगी यादी. रुपये.

सबा समानीन मया व अलफ जमादिलाखर ८

६२॥≈ खरेदी लोखंड व लाकडें वगैरे लाग व डांस लागले ते. रुपये.

---

( 527 ) Mr. Mallet purchased some horses and other animals and 1 female slave in Poona. The octroi duty on the purchase was remitted.
A. D. 1785-86.

( 528 ) The house of Kheloji Gondhli, in Náráyan Peth was given to Mr. Mallet for his residence. The front portion of it was repaired by Government at a cost of Rs. 195.
A. D. 1786-87.

१३२।- मजुरी सुतार, गंवड्ये, व माणसें मिळोन रुपये १३२॥≈ पैकीं वजा मखमालीचे यादीस सूट घातली ते रुपये ॥- बाकी रुपये.

---

१९५

एकशें पंचाण्णव रुपये कोतवाली शहर पुणें निसबत घासीराम सावळदास याजकडून देविले.

५२९-( ९५६ ) रत्नशाळे पैकीं.

समान समानीन मया व अलफ सावान २१

देणें रेंट अर्नबाल (आनरेबल) जनराल कलकत्तेकर इंग्रेज यांस मुबारक बादीचीं वस्त्रें पाठविलीं त्याजबरावर जडाव दागिने राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांणीं रूबरू पाहून लाला गुलाबराव बिन लाला शेवकराम वकील यांजबरोबर पाठविले. किंमत. रुपये.

१०९० ऐन किंमत.
२७२॥ सवाई.

---

१३६२॥

दागिने.

१ शिरपेच घाट मिनगोर बद्दल रेणुराव धोंडाजी दिंमत नवाब निजाम अलीखान याजकडील भेट राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांस छ. २४ जमादिलाकर सन सीत समानीनांत आला तो किंमत. रुपये.

७०० ऐन.
१७५ सवाई.

---

८७५

शहत.

३ पुष्कराग मोत्येंसुद्धां.
४२ हिरे हिरकण्या.
१ लालडी लोलक.

---

४६

१ जेगाघाट साधा बरहुकूम रास कर्दन छ. २९ सफर सन सबा समानीन किंमत रुपये.

---

( 529 ) Clothes and jewellery were sent as a present with Lálá Gulábrao bin Lálá Shewakrám to the Right Honourable the English General of Calcutta.

A. D. 1787-88.

३९० ऐन.
 ९७॥ सवाई.
———
४८७॥

शहत.

 ३३ हिरे हिरकण्या मदनाईकसुद्धां.
 १६ माणकें चुणी.
 १० पाच किर्डे.
  १ लालडी लोलक.
———
 ६०

———
२

५३०—( ९५९ )          जमा जामदारखाना.

समान समानीन मया व अलफ जिल्हेज १६ — कमाविस भेट राजश्री राव यांसी, बरहुकूम जनरेल चार्लीस, अर्ल कार्नवालीस इंग्रज कलकत्तेकर यांजकडून लाला चिमणलाल सेवकराम कारकून शिलेदार याचा भाऊ यांणीं आणिली, ते गुजारत जिवाजी कोटकर खिजमतगार सनगें जरी बादली, कारचोबी, सोनेरी एकूण किंमत.          रुपये.

६२।= चिरे बादली २
१२। कानलपेटी १
४७। पटके २
२२३८≡ जामेवारे बादली ४
———
३४५८– ९

५३१—( १००८ )          जमा जामदारखाना.

तिसेन मया व अलफ जमादिलावल २६ — कमाविस भेट बाबत हाय सनगें एकूण किंमत.          रुपये.

१०८० राजश्री रावसाहेब यांस बाबत मेस्तर मालीट इंग्रज कलकत्तेकर वकील याच्या डेऱ्यास खासा स्वारी गेली तेथें पोशाख दिल्हा, तो गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार सनगें एकूण.          रुपये.

---

( 530 ) Presents were received from Earl Cornawalis of Calcutta.
A. D. 1787-88.

( 531 ) Presents of clothes were made to the Peshwá by Mr. Mallet
A. D. 1789-90. on the occasion of the former's visit to the latter's tent.

३७॥ तिवट धुवट जनाबादी १

७० जाफरखानी, धरणगावी, कोरा.

४० प्रत छडीदार ·॥·

३० प्रत चौकडीदार ·॥·

७० १

२३० शाल फर्द.

१६० प्रत लाखी २ दर ८०

७० प्रत सफेद २ दर ३५

२३० ४

२०० जामेवार दफ्ती सफेत बुटेदार २ दर १००

६३ शेले साधे धुवट जैनाबादी.

१६ १६ १६ १५

६३ ४

१६० किमखापे लाल लहरीदार २ दर ८०

७६०॥ १४

३१०॥ मखमल लाल गंजे २ गज ३५॥ दर गजी रुपये ९ प्रमाणें रुपये.

सनगें गज

१४ ३५॥

१०८०

२७॥ सौभाग्यवती रमाबाई यांस, बाबत सौभाग्यवती अन्नपूर्णाबाई रामचंद्र नाईक परांजपे यांची स्त्री वाड्यांत भेटीस आली ते समयीं दिली, ती गुजारत केदारजी येवला खिजमतगार

सनगें. रुपये.

२५ छीट जसोऊ बऱ्हाणपुरी १

२॥ चोळखण पैठणी. १

२७॥ २

गज

११०७॥ १६ ३५॥

खासगी राजश्री राव पैकीं आंगरखे धुवट उभारी २ दर ८॥ प्रमाणें रुपये १७

५३२–( १०१८ ) इंग्रजाकडील पलटणें दोन कर्नाटकांत परशराम रामचंद्र याजकडे पाठवावयास आणविलीं आहेत, त्यांस जलमार्गें जयगडचे खाडींतून संगमेश्वरास उतरोन आंब्या घाटानें जातील; त्यास बंदराहून घाटमाथा-पर्यंत त्यांचे वोझ्यास बेगारी दर्यावर्दी व बैल लागतील ते देऊन दर माणसीं दोन आणे व दर बैली माणूससुद्धां चार आणे प्रमाणें दररोज देऊन घाटमाथा पोहोंचाऊन देणें ह्मणोन, रसानगी याद. सनदा.

इह्दिे तिसैन मया व अलफ रबिलावल ४

१ महिपतराव कृष्ण, तालुके रत्नागिरी यांस.

१ त्रिंबक कृष्ण, तालुके अंजनवेल यांस.

१ हरी विष्णु, दिंमत परशराम रामचंद्र, तालुके महिपतगड यांस.

३

५३३–( १०२४ ) दिंमत इंग्रेज कलकत्तेकर याजकडील दोन पलटणें तुह्मांबरोबर चाकरीस आहेत, त्यास मोघम खर्चास रुपये ३५००० पस्तीस हजार देविले असत, तरी पावते करणें ह्मणोन, परशराम रामचंद्र याचे नांवें. सनद १.

इह्दिे तिसैन मया व अलफ रबिलावल १६

रसानगी यादी.

५३४–( १०२७ ) दिंमत इंग्रज कलकत्तेकर याजकडील पलटणें २ दोन तुह्मांकडे कर्नाटकांत चाकरीस आहेत, त्यास दरमहाचे ऐवजीं रुपये ५०००० पन्नास हजार देविले असत. तरी पावते करणें ह्मणोन, परशराम राम-चंद्र यांचे नांवें. सनद १.

इह्दिे तिसैन मया व अलफ जमादिलाखर १२

५३५–( १०३३ ) परदरबारखर्चे देणें मेस्तर मालीट इंग्रज वकील दिंमत इंग्रज कल-

---

( 532 ) Two Battalions of the English were obtained for service in Karnátic and were sent to Parashrám Rámchandra via Jaygad and Sangameshwar by sea and then via Âmbyá Ghat by land. Orders were issued to supply coolies and bullocks to carry their baggage at the rate of 2 annas per cooli and 4 annas per bullock per day.

A. D. 1790-91.

( 533 ) Parashrám Rámchandra was directed to give the 2 English battalions an advance of Rs. 35,000 for their expenses.

A. D. 1790-91.

( 534 ) Parashrám Rámchandra was directed to pay the 2 battalions of the English at Calcutta, serving under him in Karnátic, Rs. 50,000 every month.

A. D. 1790-91.

( 535 ) Mr. Mallet gave detailed information of the capture of the

इहिदे तिसैन मया व अलफ साबान १० — करेकर यांस इंग्रजांनीं टिपूकडील बेंगलूरचा किल्ला घेतल्याचें वर्तमान सविस्तर विदित केलें, सबब बहुमान विद्यमान राजश्री राव सदरेस रूबरू पाहून दिल्हा, जडाव तुरा, पाच मण्याचा द्राक्षघडवजा सोन्याचे सुतांत बांधीव दांडी मिनेगार बाबत जवाब पोलादजंग पैकीं किंमत. रुपये. ११०६

शहत.

२५ पाच मणी.
१ दांडी सोनें मिनेगार.

२६ — दागिना १.

५३६–( १०४३ ) जमा जामदारखाना.

इसन्ने तिसैन मया व अलफ जमादिलावल ६ — कमाविस भेट राजश्री राव यांसी, बाबद मेस्र मालीट वकील इंग्रज कलकत्तेकर याजकडे ईद जाली सब[ब] पोशाख पाठविला, तो गुजारत जानोजी जावक खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| २० | तिवट | १ |
| १०० | शाला फर्द | २ दर ५० |
| २० | शेले साधे धुवट | २ दर १० |
| ७५ | किमखाप | १ |
| २१५ | | ६ |

५३७–( १०६० ) सर चारलीस वार मालीट इंग्रज वकील कलकत्तेकर यांणीं मुंबईहून

सलास तिसैन मया व अलफ रविलावल १५ — पुण्यास भुसार व किराणा आणिला, व पुण्याहून मुंबईस नेला. त्याचे बैल सर ३०७३ तीन हजार त्र्याहत्तर याचे जकातीचा आकार शिरस्तेप्रमाणें होईल तो मशारनिल्हेचे नांवें खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें म्हणून, विसाजी भिकाजी कमाविसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर यांचे नांवें.

सनद १.
रसानगी यादी.

---

A. D. 1790-91. fort of Banglore by the English from Tipoo. He was therefore presented with some jewellery.

( 536 ) Mr. Mallet sent presents on the occasion of the celebration of Id ( इद ) at his house. ( This corresponds with the first day of January 1792 ).
A. D. 1791-92.

( 537 ) Sir Charles Mallet brought from Bombay to Poona, and took from Poona to Bombay, 3,073 bullock-loads of groceries. The octri due from him was remitted.
A. D. 1792-93.

५३८–( १०६१ ) मेस्त बुरूस मुंबईकर इंग्रजाकडील सावकार याचे कापसाचे ओझ्याचें गलबत मुंबईस जात होतें, त्यास दर्यात तुफान जाहलें, ते समयीं कांहीं ओझीं समुद्रांत टाकिलीं. आमोदचे बंदरीं लागलीं ह्मणोन हुजूर विदित जाहलें. त्यास सावकार मजकूर याचीं ओझीं सुमार ७८ अठ्याहत्तर बंदरीं लागलीं, त्यास दर्यांतून काढावयाबद्दल मजुरी वगैरे खर्च जाहला असेल तो बाजवी घेऊन, ओझीं सावकाराचीं माघारीं देऊन कबज घेणें ह्मणोन, नारायणराव यादव कमाविसदार, परगणे आमोद प्रांत गुजराथ याचे नांवें.

सलास तिसैन मया व अलफ राबिलावल १७

सनद १.

रसानगी यादी.

---

# १. राजकीय.
## ( ब ) इतर माहिती.
## २४ युरोपांतील राष्ट्रें.
### ( ब ) इतर.

५३९–( ३३ ) तुम्हांकडील महंमद अरफ वकील यानें हुजूर कजवे पुणें येथील मुकामीं येऊन अर्ज केला कीं, आपलीं जहाजें. सुमार.

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

१० थोर जहाजें.
३ गुराब.
२ बोटी.

---
१५

( 538 ) A ship carrying bales of cotton, belonging to Mr. Bruce, an English merchant of Bombay, was overtaken by a storm. The bales were then thrown into the sea out of which 78 drifted into the harbour of Âmod. These were ordered to be restored to the owner.

A. D. 1792-93.

# [ 1 ] POLITICAL MATTERS.
## ( B ) Matters relating to
## 24 European Powers
### ( b ) Others.

( 539 ) A Dutch merchant of port Surat represented through his agent Mohamed Araf that his 10 vessels and 5 small boats carrying merchandize between Surat and Cape Comorin were harassed by the government navy and

A. D. 1773-74.

एकूण पंधरा जहाजें अहद बंदर सुरत तहद ताल व काफ( केप )कुमारी पासून दर्यामध्यें आमदरफ्ती करतील, त्यास सरकारचे आरमाराचा उपद्रव लागेल, सबब साहेबीं मेहेरबान होऊन सरकारचें अभयपत्र दिल्हें पाहिजे ह्मणोन; त्याजवरून तुह्मीं सरकारांत एकनिष्ठ आहां हें जाणोन अर्ज खातरेस आणून सरकारचा नजराणा करार करून हें अभयपत्र सादर केलें असे, तरी सरकार तालुक्याचे बंदराशिवाय आमदरफ्ती करीत जाणें, इस्तकबिल सन अर्बा सबैन तागाइत सन खमस सबैन अखेरसालपर्यंत दुसालांत सरकाराचे आरमाराचा उपसर्ग लागणार नाहीं, अभय असे; ह्मणोन, मार्तीनस ज्वान बेस्तान दिंमत वलंदेज साकीन बंदर सुरत याचे नांवें सदरहू पंधरा जाहाजांस छ. १ जिल्काद १५ कौल.

सदरहू कौलाचे अन्वयें सनदा पत्रें २

१ वलंदेज मजकूर याचे नांवें सनद कीं. सदरहू कौल समंधें तुह्मांकडे सरासरी नजर सालमजकुरापासून दरसाल रुपये ६००० सहा हजार रुपये करार केले असेत, तरी करार बमोजीब ऐवज बहिरो रघुनाथ कमाविसदार सरकार शहर सुरत याजकडे सहा हजार रुपये दरसाल देत जाऊन जाब घेत जाणें ह्मणोन. सनद.

१ आनंदराव धुळप सुभा आरमार यास पत्र कीं दुसाला कौलाप्रमाणें पंधरा जहाजांस उपद्रव लागों न देणें ह्मणोन, चिटणिसी. पत्र १

२ १७

इस्तकबिल सनद लष्कर, व रसानगी यादी, जहाजाचें नांव, व तांडेलाचें नांव व जहाजावरील वजन लावून कौल घ्यावयाचा शिरस्ता वसई वगैरे जागा आहे, त्यास साल मजकुरीं येथें वलंदेजाकडील वकील वगैरे कोणी नाहीं, लष्करांतून याद करार होऊन आली, त्याप्रमाणें कौल बहिरो रघुनाथ कमाविसदार प्रांत सुरत यांचे हवालीं करावयाचे, यास्तव सालमजकुरास सदरहूप्रमाणें कौल दिले आहेत.

५४०—( १२६ ) फरासीसाकडील राजकारणाविशीं जानराव धुळप यास आज्ञा केली

खमस सबैन
मया व अलफ
मोहरम १२

असे, तरी तुह्मीं तालुके देवगडाकडून ज्या समयीं जें साहित्य धुळप मागतील तें, व तिकडील रवानगीस माणसें माहितगार लागतील तीं देणें, माणसें माहितगार चाकर नसल्यास दहा असामी शिपाई व दोन कारकून माहितगार ठेऊन माणूस पाहून सरंजाम करून तुह्मीं व धुळप एका विचारें

---

asked for a permit in consideration of his loyalty to Government, a passport tenable for two years was issued to him on condition of his paying Rs. 6,000 a year to the Kamávisdar of Surat as Nazar and promising not to visit the post under Government. Ânandarao Dhuḷap of the navy was instructed accordingly.

(540) Jánrao Dhuḷap was deputed on some political plan in

ह्या राजकारणास सदरहू लिहिल्याप्रमाणें साहित्य देऊन रवाना करणें. तुह्मांस मजुरा पडेल. साहित्याविशीं वारंवार सनदेचा उजूर न करणें ह्मणोन, बाळाजी गणेश यांचे नांवें सनद.

रसानगी यादी.

५४१–( १२७ ) जानराव धुळप याजकडे जरूरीच्या कामाकरितां तालुके रेवदंडा पैकीं चांगल्या महागिऱ्या निघाल्कतिच्या (?) चलाक ऐशा सुमार ४ चार देविल्या असेत, तरी देणें. सदरहू पैकीं जरा चांगल्या असतील त्या देणें. बाकी शिलकेस नसतील त्या भरतच्या एक दोन लागतील तरी खरेदी करून देणें ह्मणोन, आनंदराव शिंदे तालुके रेवदंडा यांचे नांवें. सनद.

खमस सबैन मया व अलफ. मोहरम १२

परवानगी रूबरू.

५४२–( २२९ ) फिरंगी गोवेकर याची सरई सरकारांत पाडाव आली आहे, ती माघारीं द्यावयाचा करार करून हुजुरून येशवंतराव सदाशिव कारकून पाठविले आहेत, यांचे गुजारतीनें सरई बंदरांत तरती करून सरईचें सामान जुनें सिडें व कुवें, दोर, नांगर, सुकाणूं, जें असेल तें देणें. जुन्या सामानापैकीं आरमाराकडे सामान खर्च जालें असेल, त्यापैकीं किरकोळ सामान सरई तरती करावयापुरतें देऊन, गोंव्याहून सरई न्यावयास येतील त्यांचे स्वाधीन करून बरोबर आपलीं चार गलबतें देऊन गोंव्याचे बाऱ्यावर सरई पोहचवून फिरंगियाचा जाब आणविणें, आणि हुजूर पाठविणें ह्मणोन, आनंदराव धुळप, सुभा आरमार विजयदुर्ग यांस.

सीत सबैन मया व अलफ. रजब २०

पत्र १.

रसानगी यादी.

५४३–( २७९ ) नारायण विठ्ठल वकील दिंमत फिरंगी गोवेकर यांणीं हुजूर विदित

---

A. D. 1774-75. connection with the French and Báláji Ganesh was directed to supply him from Táluká Devgaḍ such assistance as might be required by him.

( 541 ) Ânandrao Sinde of Táluká Rewadaṇḍá was directed to place at the disposal of Jánrao Dhuḷap 4 swift ships for the purpose above specified.

A. D. 1774-75.

( 542 ) A Portugese ship, which was captured, was ordered to be restored to the Portugese of Goa.

A. D. 1775-76.

( 543 ) A ship belonging to Páṇḍurang Sheṇwi of Dawaṇ while

सीत सबैन
मया व अलफ
सफर १८

केलें कीं, पांडुरंग सेणवी दवणकर यांचा बतेला बनामा नारायण प्रसाद साकीन बंदर दवण निसबत फिरंगी गोव्याहून बतेल्यावर नारळ वगैरे जिन्नस भरून सन अर्बा सबैनांत फिरंगी याचे काफल्याबरोबर दवणेस जात असतां दर्यांत सरकारचे आरमाराची गांठ पडली, तेव्हां बतेला मालसुद्धां धरून जंजिरे विजयदुर्ग येथें धुळपांनीं आणून, खालीसा करून, मालसुद्धां बतेला फरोक्त केला आहे, तो देविला पाहिजे ह्मणोन; त्याजवरून सरकारचा व फिरंगी याचा स्नेह जाणोन सदरहू बतेला हांकारणीसुद्धां खेरीज माल माघारा द्यावयाचा करून हे सनद सादर केली असे; तरी बतेला तुह्मी फरोक्त हांकारणीसुद्धां करून त्याची किंमत सरकार हिसेबीं जमा धरली आहे. ते बरहुकूम झडती सन अर्बा सबैन. रुपये.

४०० बतेला हांकारणीसुद्धां.
४० पावड्या नांगर लहान २ एकूण.
१० जंबुरा लहान एक शेराचा.

———

४५०

एकूण साडे चारशें रुपये बतेल्यापैकीं तुह्मीं जमा धरले आहेत, ते ज्या सावकारास बतेला फरोक्त दिला आहे, त्यास आरमाराकडून सदरहू रुपये माघारे देऊन त्यापासून हांकारणीसुद्धां बतेला आणून सरकारची जासूद जोडी पाठविली आहे, त्याचे गुजारतीनें त्यांजकडून माणूस येईल त्याचे स्वाधीन करून, पावलियाचें कबज घेणें. दवणेस बतेला न्यावयाची सोय नाहीं, सबब गोंव्याच्या बंदरीं पावता होय तो करणें ह्मणोन, आनंदराव धुळप यांस. सनद १.

रसानगी यादी.

५४४–( — ) फरासीकडील मातबर माणूस हुजूर येत आहे, तो रेवदंड्याचे बंदिरीहून येणार, त्यास तेथून यावयाकरतां भाड्याचे बैल व बिगारी देऊन पुण्यास रवाना करणें. बैलाच्या भाड्याचा ऐवज तालुके मजकूरचे हिशेबीं खर्च लिहिणें, मजुरा पडेल ह्मणोन. सनदा.

सबा सबैन
मया व अलफ
सफर १२

---

A. D. 1775-76.

sailing for Goa with goods under the protection of the Portugese fleet was captured by Dhuḷap and brought to Vijaydurga. In consideration of the friendly relations of the Government with the Portugese, the ship was ordered to be restored to the owner.

(544) An influential person in the service of the French was coming to Poona from Revdanḍá. Orders were issued to provide him with bullocks, horses, and coolies during his journey from Revdanḍá to Poona.

A. D. 1776-77.

१ आनंदराव शिंदे यास तालुके रेवदंडा पैकीं बैल सर ५० भाड्यानें बिगारी असामी २५ पन्नास बैल. व पंचवीस बिगारी द्यावयाविशीं.

१ आबाजी बल्लाळ, व भास्कर महादेव यांस कीं. तालुके अवचितगड पैकीं बैल भाड्याचे सर ५०, बिगारी असामी २५, पन्नास बैल व पंचवीस बिगारी द्यावयाविशीं.

---

२ दोन पत्रें.

परवानगी रूबरू.

५४५-( — ) तीनशें सवा बासष्ट ३६२। रुपये सखाराम भगवंत यांस, बाबद मुसियार सिवलीयाद सातलूब वकील दिंमत फरासीस याजपैकीं, गुजारत बाळकृष्ण रामचंद्र कारकून दिंमत पागा हुजूर सकलाद गज किंमत. रुपये.

सबा सबैन मया व अलफ रबिलाखर.

१८९ प्रत कलनी रुंद गज सुमार ६३ दर ३ प्रमाणें.

१७३। प्रत दिस्ताई गज १९। दर ९ प्रमाणें.

---

३६२।

५४६-( ५३२ ) फरासीसाकडील वकील हुजूर आले आहेत. त्यांनीं कसबे पुणें येथें माळ्यापासून कुणबिण एक एकूण किंमत रुपये शंभरास खरेदी केली, तिचे जकातीचा आकार माफ केला असे. तरी सदरहूचे जकातीचा आकार होईल तो याचे नांवें माफ खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमाविसदार. जकात प्रांत पुणें व जुन्नर यांचे नांवें छ. ३ जिल्काद. सनद १.

समान सबैन मया व अलफ सफर २६

रसानगी यादी.

५४७-( ५७७ ) बाजी रामचंद्र याचे नांवें सनद कीं, फरासीसाचे वकील पुणियाहून कल्याणास गेले आहेत, त्यांस पुढें दवणेस पोहोंचवावयाकरतां हुजुरून जगन्नाथ चिंतामण कारकून शिलेदार पाठविले आहेत, त्यांस वकीलाचे वोझ्यास भाड्याचे बैल सर २५ पंचवीस देविले असेत, तरी कल्या-

तिसा सबैन मया व अलफ रजब १४

---

(545) Clothes worth Rs. 362-4 were presented to Sakhárám Bhagwant by an agent of the Portugese.
A. D. 1776-77.

(546) The Agent of the French, who had come to the Huzur at Poona, purchased a female slave for Rs. 100. The octroi duty leviable on the transaction was remitted.
A. D. 1777-78.

(547) The Agents of the French went from Poona on their way to Dawaṇ. The officer of Kalyan was directed to provide them with 25 bullocks for carrying their furniture. The hire was ordered to be paid out of the revenues of the province.
A. D. 1778-79.

... पावेतों पंचवीस बैल माखाचे करून देणें, सदरहूचें भाडें होईल तें प्रांत ... येथील ऐवजी मजुरा पडेल ह्मणोन. सनद १.

परवानगी रूबरू.

(५४८)—(—) फिरंगी गोंवेकर, सरकारचा स्नेह राखोन आहे, सबब दवणें लगते

समानीन
मया व अलफ
जमादिलाखर २९

बारा हजार रुपयांचे गांव सरकार अमलास वगैरे पेंच नाहीं, असें पाहून प्रांत वसईपैकीं कमाल आकाराचे नेमून द्यावे; त्यांत इमारत करूं नये, याप्रमाणें करार करून पेशजीं तुह्मांस सनद सादर जाहली आहे, परंतु गांव नेमून दिले नाहीं, त्यास हल्लीं परगणे पवाडी प्रांत मजकूरपैकीं गांव सन सलास सबैनचे कमाल आकाराप्रमाणें देशमुखी, व देशपांडेपण, व गांवकुळकर्ण, व सरपाटिलकी सरकारी वतनें व जकाती खेरीजकरून बाकी. रुपये.

१५१९। मौजे पंचकई.
१८८६।· मौजे परवसें.
१३००॥॥ मौजे असंदें.
२०७०८-। मौजे सुढलवाडें.
७५६॥ मौजे कचवहाल.
१९४५॥ मौजे निमरवल.
५६९ मौजे बोरकई.
१००६।= मौजे वगसिंदें बुदरुक.
६६१।- मौजे वगसिंदें खुर्द.

१२०१५[८॥]

एकूण बारा हजार पंधरा रुपयांचे कमाल आकाराचे नऊ गांव सालमजकुरापासून द्यावयाचे करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहू गांवांपैकीं सरकारी वतनें व जकाती खेरीज करून, बाकी अमल फिरंगी याचे दुमाले करून आकार प्रांत मजकूरचे हिशेबी खर्च लिहीत जाणें. गांवांत इमारत करूं न देणें ह्मणोन, विसाजी केशव यांस. सनद १.

---

(548) Orders were formerly issued for granting to the Portugese of Goa villages, worth Rs. 12,000 a year, near Dawan in consideration of their friendly relations towards Government. The villages were not however yet assigned. The assignment was now made, and nine villages in Parganá Pawádi in Prânt Bassein were ordered to be made over to the Portugese. They were not permitted to erect any building in the villages in question.

A.D. 1779-80.

मोकदम नऊ गांवचे यांस सनद कीं, यासी रुजू होऊन गांवचा अमल सरकारी वतनें व जकात खेरीज करून सुरळीत देणें. गांवांत इमारत करूं नये. याप्रमाणें करार केला असे, तरी इमारत करूं न देणें ह्मणोन. सनद १.

२

रसानगी यादी.

५४९-( ६८४ ) नारायण विठ्ठल धुमे वकील निसबत फिरंगी गोंवेकर यांस फिरंगी सरकारलक्षानें चालत आहे, व पुढेंही चालेल येविशीं खातरजमा केली, याकरितां प्रांत वसईपैकीं तीन हजार रुपयांचे गांव सरकार अमलास वगैरे पेंच न पडे असें पांहून कमाल आंकाराचे नेमून द्यावे; त्यांत इमारत करूं नये. याप्रमाणें करार करून पेशजीं तुह्मांस सनद सादर जाहली आहे, परंतु गांव नेमून दिले नाहीं, सबब हल्लीं परगणे पवाडी प्रांत मजकूर पैकीं गांव देशमुखी व देशपांडेपण, व गांवकुळकर्ण, व सरपाटिलकी, सरकारी वतनें, व जकात खेरीज करून, बाकी. रुपये.

समानीन
मया व अलफ
जमादिलाबल २९

१२५३८≡।। मौजे कुंभारीयें.
१७४६।।।·।। मौजे सुकलाव.

३०००

एकूण तीन हजार रुपयांचे कमाल आकाराचे दोन गांव सालमजकुरापासून द्यावयाचा करार करून, हे सनद सादर केली असे, तरी सदरहू गांवांपैकीं सरकारी वतनें, व जकात खेरीज करून, बाकी अमल मशारनिल्हे यांचे दुमाला करोन प्रांत मजकूरचे हिशेबीं आकार खर्च लिहित जाणें. गांवांत इमारत करूं न देणें ह्मणोन, विसाजी केशव यांस. सनद १.

मोकदम हरदू गांवचे यांस सनद कीं, यांसी रुजू होऊन गांवचा अमल सरकार वतनें, व जकात खेरीज करून सुरळीत देणें. गावांत इमारत करूं नये, याप्रमाणें करार केला असे, तरी इमारत करूं न देणें ह्मणोन. १

२

रसानगी यादी.

(549) Villages worth Rs. 3000 were given to Náráyan Vithal Dhume, Agent of the Portugese, in consideration of the assurance given by him that the Portugese would continue to entertain friendly relations to-wards Government.

A. D. 1779-80.

५५०—( ८१७ ) जमा जामदारखाना.

अर्बा समानीन मया व अलफ रमजान १

कमाविसभेट राजश्री राव यांसी बद्दल मुसामुतिनी व. मुसामनवे वकील दिंमत फरासीस, गुजारत ज्विाजी काटकर खिजमतगार सनगें एकूण किंमत. रुपये.

४२३॥ मुसेजर वेलदार सनंग गज १०८ दर ४२ प्रमाणें. रुपये.

४५७॥ मूज वार गज एकूण. रुपये.

२८३॥ मखमल गज २७ सुमार. दर १०॥ प्रमाणें. रुपये.

१७४ सकलाद दराबी गज १४॥ सुमार. दर १२ प्रमाणें. रुपये.

| | | |
|---|---|---|
| ४५७॥ | | ४१॥ |
| | सनंग | गज |
| ८८१ | ॥ | ४१॥ |

५५१—( ८२७ ) लग्नखर्च वकील दिंमत फरासीस यास फेर आहेराचीं वस्त्रें सदरेस विद्यमान राजश्री रावसाहेब सनगें एकूण. आंख.

अर्बा समानीन मया व अलफ सवाल १९

५३० मुसामुतिनीयास सनगें. आंख.

| | | |
|---|---|---|
| २७६ | शालफर्द | २ दर १३८ |
| १६४ | किमखाप | १ |
| ९० | शेले साधे धुवट | |
| | ४४ ४६ | |
| | ९० | २ |
| ५३० | | ५ |

४५८ मुसामनवे यास सनगें एकूण. आंख.

| | | |
|---|---|---|
| २४२ | शालफर्द. | २ दर १२१ |
| १३४ | किमखाप | १ |

---

(550) Presents of clothes were received from ( मुसामुतिनी ) and ( मुसामनवे ), agents of the Portugese.
A. D. 1783-84.

(551) Presents of clothes were returned to the agents of ( मुसामुतिनी ) and ( मुसामनवे ) and Rastom Parsee.
A. D. 1783-84.

८२ झेले सांचे घुवट

४२ ४०

८२ २

४५८ ५

१२४॥। रुस्तुम पारसी यास सनगें एकूण. आंख.

१४। तिवट १

११०॥ शालफर्द १

१२४॥। २

१११२॥। १२

५५२-( ८७० ) फिरंगी गोंवेकर याचा व सरकारचा तह सन समानीनांत जाहला, ते समई फिरंगी यास बारा हजार रुपयांचे कमाल बेरजेचे गांव दवण लगते सरकारांतून द्यावे, याप्रमाणें करार जाहला, परंतु गांव दुमाला जाहले नाहीं, सबब सदरहू बारा हजाराचे कमाल बेरजेचे गांव नेमून देऊन गांव घाल त्याची याद तपसीलवार हुजूर पाठवणें ह्मणोन, आनंदराव भिकाजी, व त्रिंबक भिकाजी मामलेदार तालुके वसई यांस, सन सलास समानीनांत सनद सादर जाहली, त्याजवरून त्यांनीं सन अर्बा समानीनांत परगणे नगर हवेली, प्रांत रामनगर, तर्फ मजकूर, या महालपैकीं सहा गांव, व जकात दरोबस्त सरकारांत ठेऊन बाकी गांव वसाहती व वोस सुद्धां बारा हजार रुपयांचे ऐवजीं नेमून दिले, त्याची याद हुजूर पाठविली, त्याप्रमाणें परगणे मजकूरपैकीं सहा गांव, व जकात सरकारांत ठेविली त्याची जमा बजा करून बाकी गांव, व सेत, व उज्याड सुद्धां बारा हजार रुपयांची बेरीज भरून, अजमासाप्रमाणें जमा धरून, नेमून दिल्ही असे, त्यास बारा हजारांत सुटीचा व उज्याड गांवचा वगैरे आकार जमा धरिला आहे, परंतु त्याप्रमाणें आकार होणार नाहीं, तोटा बहुत आहे, याजकरतां कमाल वसुली बारा हजार रुपयांचा आकार लाऊन द्यावा, ह्मणोन, नारायण विठ्ठल

खमस समानीन मया व अलफ सफर २४

(552) In the treaty concluded with the Portugese of Goa in A. D. 1779-80 Government had promised to grant villages near Dawan worth Rs. 12,000. The grant had not been made. The Officer of Bassein was directed to assign the whole Parganá of Nagar Haveli in Prânt Rámnagar to the Portugese. They were not to be allowed according to the treaty to construct any new buildings in the Parganá granted to them.

A. D. 1784-85.

वकील दिंमत फिरंगी गोंवेकर यांणीं विनंति केली, त्याजवरून सालमजकूर सन खमस समानीनांत करार जाला कीं, बारा हजार रुपयांचे गांव द्यावयाचे, त्यास परगणे मजकूर हा महाल सरकार अंमले दरोबस्त, देखील जकात लाऊन द्यावा, त्यापैकीं पेशजीं गांव कापून दिल्हे आहेत, ते वजा करून बाकी राहिले गांव व जकात याप्रमाणें देविले असे, तरी बारा हजारांत परगणे मजकूर दरोबस्त महाल जकातसुद्धां सालमजकुरापासून फिरंगी याचे दुमाला करून पावलियाचें कबज घेणें. परगणे मजकूरचे सत्तेचाळीस गांव सन अर्बात फिरंगी याचे हवालीं जाहले, त्या खेरीज परगणे मजकूरचे गांव व जकातीचा सालगुदस्त सरकारांत वसूल आला असेल, तो माघारा देविला असे, तरी हिशेबीं जमा आला असेल तो पाहून त्याप्रमाणें माघारा देऊन कबज घेणें; व परगणे मजकुरीं फिरंगी यांणीं नवी इमारत कांहीं करूं नये. याप्रमाणें करार जाहला आहे, त्यास नवी इमारत करूं लागल्यास करूं देऊं नये ह्मणोन, जिवाजी गोपाळ तर्फ वसई यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

खमस समानीन मयां व अलफ रबिलावल ५

५५३–( ८७२ ) नारायण विठ्ठल धुमे वकील दिंमत फिरंगी गोंवेकर यांसी सरकारचा व फिरंगी याचा तह मशारनिल्हेचे मार्फतीनें जाला, ते समईं गांव द्यावयाचा करार जाला, त्याप्रमाणें पेशजीं प्रांत वसईपैकीं तीन हजार रुपयांचे कमाल आकाराचे गांव सरकारचीं वतनें, व जकात खेरीज करून, द्यावयाविशीं सन समानीनांत विसाजी केशव याचे नांवें सनद सादर जाहली; परंतु गांव मशारनिल्हेचे दुमाला जाले नाहींत, सबब सन सलास समानीनांत आनंदराव भिकाजी, व त्रिंबक भिकाजी माजी मामलेदार प्रांत मजकूर यांजकडून सदरहू तीन हजार रुपये कमाल आकाराचे परगणे पवाडी प्रांत मजकूरपैकीं दोन गांव देविले होते, तेही याचे दुमाला जाले नाहींत, त्यास हल्लीं परगणे पवाडी प्रांत मजकूरपैकीं गांव देशमुखी, व देशपांडेपण, व गांवकुळकर्ण, व सरपाटिलकी, सरकारी वतन, व जकात खेरीज करून, बाकीचा आकार रुपये

१२५३८=।। मौजे कुंभारीये.
१७४६।।।-।। मौजे सुकलाव.

३०००

---

A. D. 1784-85.

(553) It was agreed at the time of the treaty entered into with the Portugese of Goa that villages worth Rs. 3000 should be given to their Agent, Náráyan Vithal Dhume. The villages of Kumbháriyen and Sukaáva in Parganá Pawádi were given to the Agent, and orders were issued to hand over the villages to him.

एकूण तीन हजार रुपयांचे, कमाल आकाराचे, दोन गांव साल मजकुरापासून चावयाचा करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहू दोन गांवचीं सरकारचीं वतनें व जकात खेरीज करून बाकी अंमल मशारनिल्हे यांचे दुमाला करून प्रांत मजकूरचे हिशेबीं आकार खर्च लिहित जाणें. सालमजकूरचा वसूल घेतला असेल तो हिशेबीं पाहून माघारा देऊन पावलियाचें कबज घेणें. गांवांत इमारत कांहीं करूं न देणें ह्मणोन, जिवाजी गोपाळ यांचे नांवें. सनद १.

येविशीं मोकदम हरदू गांवचे यांस कीं, तुह्मीं मशारनिल्हेसीं रुजू होऊन सदरहू गांवचीं सरकारी वतनें, व जकात खेरीज करून, बाकी अमल याजकडे सुरळीत देत जाणें ह्मणोन. सनद १.

२

दोन सनदा दिल्या असत. रसानगी यादी.

५५४–( १०२५ ) जमा जामदारखाना.

इहिदे तिसैन मयांव अलफ जमादिलाखर ५

कमाविस भेट राजश्री राव यांसी, बाबत फिरंगी गोंवेकर यांजकडील विठ्ठलराव गोरक्ष वकील यांणीं आणून दिल्ही, ती गुजारत रायाजी वागमारा खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

११०। मुसे जिरे लाल २ दर ५५८= प्रमाणें. रुपये.

३७८= गजवार एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| २३८= | सकलाद मुलतानी लाल गज ३८२ दर गजी रु. ७॥ | |
| १४ | मखमल लाल, गज | २।२ दर गजी रुपये ६ |
| ३७८= | | ५।४ |

| | सनगें | गज |
|---|---|---|
| १४७।= | २ | ५।४ |

५५५–( १०६२ ) मेजार जमा फरासिसीण बायको, सरकारची अपराधी, सबब कैद

सलास तिसैन मया व अलफ रबिलाखर ५

करून किल्ले लिंगणा, तालुके रायगड येथें अटकेंत ठेवावयास बरोबर गाडदी राघोबा विश्वनाथ याजकडील देऊन पाठविली असे, तरी किल्ले मजकुरीं बंदोबस्तानें अटकेस ठेवून पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, सदाशिव रघुनाथ याचे नांवें. सनद १.

रसानगी; राघो विश्वनाथ गोडबोले.

---

( 554 ) Presents were received from the Portugese of Goa through their agent Vithalrao Goraksha.
A. D. 1790-91.

( 555 ) A Portugese woman being guilty of an offence was arrested and sent to fort Linganá, Táluká Raygad, for imprisonment.
A. D. 1792-93.

# १. राजकीय.

## (ब) इतर माहिती.

## २५ लहान लहान संस्थानें.

५५६—(१९) वेंकटपा नाईक पामनाईक बहिरी संस्थान सुरापूर याचे नांवें कौल लिहून दिल्हा कीं, खासा स्वारी त्या प्रांतें आली, यास्तव सत्याधिराज नरसी यास तुह्मीं हुजूर पाठविलें, त्यांणीं तुमचे एकनिष्ठतेचा प्रकार सर्व विदित केला, त्याजवरून संस्थानचे आबादीवरी नजर देऊन सालमजकुरीं तुह्मांस संस्थानचा अधिकार जाहला, सबब सरकारची नजर रुपये ४०,००१ चाळीस हजार एक रुपया करार केली असे, तर सदरील ऐवजाचा भरणा सरकारांत करून जाब घेणें ह्मणोन.

अर्बा सबैन मया व अलफ सवाल ६

कौल १.

रसानगी यादी.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

५५७—(७७) संस्थान जवार येथील कारभारी यांणीं हुजूर विदित केलें कीं, संस्थान मजकूर येथील तह पेशजीं श्रीमंत कैलासवासी रावसाहेब यांणीं करून देऊन संस्थानावरी दरसाल नजर रुपये एक हजार करार केले, त्याप्रमाणें किल्ले त्रिंबकाकडे नेमणूक केली आहे, त्याबरहुकूम सालगुदस्तांपावेतों चाललें, सालमजकुरीं किल्याहून हरएक बाबेस संस्थानास उपद्रव करतात; येविशीं ताकीद जाहली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी एक हजार रुपये संस्थानाकडे नजरेचे सालदरसाल ध्यावयाचे करून, किल्यांकडे हसेबंदीनें नेमून दिले आहेत, त्याप्रमाणें हसेबंदीबद्दल ऐवज येणें, जाजती उपद्रव एकंदर न देणें,

खमस सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

## 1 POLITICAL MATTERS

## (b) Matters relating to

## (25) Minor states (continued)

(556) Venkatappá Naik Pân Naik of Sansthán Surâpur having succeeded to the Sansthán during the current year, a nazar of Rupees 40,001 was imposed upon him.

A. D. 1773-74.

(557) A treaty was entered during the time of the late Peshwá with the Sausthán of Jowâr by which the latter promised to pay a nazar of Rs. 1000 and to remit it to the officer of fort Trimbak. The Kárbhári of the Sansthán represented that though the nazar was regularly paid, the fort officers gave the Sansthán considerable annoyance. Strict orders were issued to the fort-officer to abstain from giving any trouble in future.

A. D. 1774-75.

येविशीं फिरोन बोभाट येऊं न देणें ह्मणोन, छ. १ जमादिलाखर रामचंद्र कृष्ण यांचे नांवें चिटणिसी. पत्र २.

५५८—( ८० ) संस्थान नरगुंद पेशजीं योगीराव राम तुह्मांकडे, व भास्करराव दादाजी यांजकडे होते, त्यास भास्करराव दादाजी सालगुदस्तां मृत्यु पावले, सबब तुह्मां उभयतांकडे संस्थान मजकूर, देखील किल्ले व आम्ही मुद्धां पूर्ववत्प्रमाणें सालगुदस्तां बहाल करून देऊन, कलमें करार केलीं, त्याप्रमाणें हल्लीं करार करून दिल्हीं, कलमें; बीतपशील.

खमस सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

नजर एक साला ४,५०,००१ रुपये. एकूण चार लक्ष पन्नास हजार एक रुपया नक्त घ्यावयाचा करार केला असे, तरी गुदस्ताचे कराराप्रमाणें भरणा करून पावलियाचा जाब घेणें. कलम १.

बलवंतराव याची रदबदली ऐकूं नये ह्मणोन तुह्मीं विनंति केली, त्यास संस्थान पैकीं बलवंतराव याजकडे बारा हजार रुपये याचे गांव चालतात. त्याप्रमाणें चालवणें, याशिवाय त्यांणीं रदबदल केल्यास ऐकणार नाहीं, जाजती उपसर्ग त्यांस व त्यांजकडील माणसांस न करणें पेशजींप्रमाणें वर्तणूक करणें. कलम १.

किल्ले नरगुंद येथील आह्मी हवालदार ठेविला होता. तो तिगस्तां मृत्यु पावला, त्या पोटीं संतान नाहीं; किल्ल्याचा एकतियार आह्मांकडेच आहे, त्याचे मालम वेशीचे वगैरे कोणीही सरकारांत समजावतील, तर ऐकूं नये, ह्मणोन तुह्मीं विनंति केली, त्यास नजरेचा ऐवज तुह्मांकडे मातबर करार केला, त्यांत हवालदाराचा देखील जाबसाल उगवला, याजउपरी कोणी हवालदाराचा मजकूर सरकारांत समजाविल्यास ऐकणार नाहीं. तुह्मी त्याचे माणसांस उपद्रव करूं नये. कलम १.

नजरेचा ऐवज तुह्मांकडे भारी करार

(558) The Sansthán of Nargund was in the possession of Yogirao Rám and Bháskarrao Dádáji. Bháskarrao having died in the preceding year, an agreement was entered into with Government as follows:—

A. D. 1774-75.

1 The Sansthán should be continued to Bháskarrao [Son Venkatrao.] and Yadavrao Rám.
1 A nazar of Rs. 4,50,001 should be paid.
1 The appointment of Havaldar of the fort should be made by the holder of the Sansthán.
1 Villages worth Rs. 12,000 should be continued to Balwantrao. No further intercession would be made on his behalf.
1 Sowars should be furnished for service by the holder of the Sansthán from the year A. D. 1775-76.

हल्लीं तुमचा करार करून दिला आहे, त्याप्रमाणें निभाविलें जाईल, तुमचे घालमेलीविशीं कोणीं रदबदली केली तरी न ऐकतां तुमचें तुह्मांकडे कराराप्रमाणें चालविलें जाईल. तुह्मीं कोणेविशीं संशय न धरतां सरकारांत एकनिष्ठतेनें असणें. कलम १.

केला, सबब संस्थान मजकूरचे स्वार सालाबाद चाकरी करतात, त्यांची चाकरी सालगुदस्तांची, व सालमजकूरची, सन खमसची माफ केली असे, व तिगस्तां सलासांत चाकरी स्वारांची जाहली नाहीं, त्यास नजरेचा ऐवज तुह्मांकडे करार जाहला, त्यांत तिगस्ताचे चाकरीचा ऐवज आला असेल, पुढें पेस्तर साल सन सीत सबैनापासून पेशजींचे कराराप्रमाणें स्वारांनिशीं चाकरी करीत जाणें. कलम १.

एकूण पांच कलमें सदरहूप्रमाणें करार करून दिलीं असत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, योगीराव रामराव, व व्यंकटराव भास्कर यांचे नांवें. छ. ११ जमादिलाखर.

सनद १.

रसानगी यादी.

५५९–( २७७ ) संस्थान पेठ येथील राज्यावर रामनगरकर कोळ्यांनीं चढाई करून संवस्थान त्याणें घेतलें, ह्मणोन पेठकर नासिकास पळोन येऊन आपली संस्थान मजकुरीं स्थापना करावी, त्यास खर्च लागेल त्या ऐवजीं संवस्थान मजकूरचे किल्ले वगैरे आहेत, ते गहाणवट देतों, व्याजसुद्धां ऐवज फिटेतोंपर्यंत घालमेल करणार नाहीं, येणेंप्रमाणें संस्थानिक ह्मणतो. ऐशास सदरीलचा बंदोबस्त सरकारांतून करावयाचा असल्यास करावा, अगर आह्मांस आज्ञा जाली तरी आह्मी बंदोबस्ती करूं, आणि किल्ले वगैरे आमचे स्वाधीन जाल्यास सरकारांत मागूं नये. येविशींचें अभय असावें, ह्मणोन तुह्मीं बाळाजी माणकेश्वर यांस लिहिलें, त्यावरून मशारनिल्हे यांणीं सरकारांत विनंति केली, त्यास तुह्मीं आपल्याकडील स्वार व प्यादे पाठवून पेठकराची कुमक करून त्यांच्या संस्थानचा बंदोबस्त करून देणें. स्वार व प्यादे यांस शिबंदी खर्च होईल तो पेठकरांनीं तुह्मांस द्यावा. तूर्त ऐवज थांस द्यावयासी नाहीं. याकरितां पेठकर संवस्थान मजकूरपैकीं किल्ले व मुलुख गहाण तुम्हांस लेहून देतील. तो घेऊन, हस्त-

सीत सबैन मया व अलफ सफर २

(559) The Kolis of Rámnagar attacked and took the Sansthán of Peth, and compelled the Rájá to fly to Násik. He applied to Raghupatrao Náráyaṇ Ráje Bahádar for aid; and promised, as he had no money, to pledge with him his forts &c. till the expenses of the expedition were paid. Permission was given to Ráje Bahádar to accept the arrangement.

A. D. 1775-76.

गत करून बंदोबस्त करणें. तुमचा ऐवज व्याजसुद्धां फिटे तों सरकारांतून घालमेल होणार नाहीं ह्मणोन, रघुपतराव नारायण राजे बहाद्दर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५६०–( ३२६ ) राजे भारतशाहा हटियाराय संस्थान कालीभींत ममडाई यांचे नांवें सनद कीं, तुह्मांकडे दहकाचा ऐवज, व पाटील कुळकर्णी यांचे हकाचा ऐवज एकसाल सरकारांत घ्यावयाचा करार करून वसुलाची आज्ञा नारो बल्लाळ कमाविसदार सरकार हांडे यास केली असे, तरी दहला-पट्टीचा पाटीलकुळकर्णीसुद्धां ऐवज ठरावाप्रमाणें रुपये २५०० अडीच हजार येणें, त्याचा भरणा मशारनिल्हेकडे करून पावलियाचें कबज घेणें ह्मणोन. सनद १.

सबा सबैन मया व अलफ साबान ७

परवानगी रूबरू.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

५६१–( ४५८ ) गुमानसिंग संस्थान मांडवी यांचे नांवें सनद कीं, भगवंतसिंग बिन दुर्जनसिंग याजकडे संस्थानचा अधिकार होता, त्यास ते मृत्यु पावले, सबब दुर्जनसिंग यांची स्त्री रतनकुवर यांणीं तुह्मांस दत्तपुत्र घेतलें येविशीं सरकारचें अभय असावें, ह्मणोन तुह्मांकडील भाईदास बिन किशोरदास यांणीं हुजूर विनंति केली, त्यावरून संस्थानावर नजर देऊन, तुह्मांवर कृपाळु होऊन, संस्थानचा अधिकार तुमचे नांवें करार करून दिल्हा असे, तरी तुह्मीं सरकारांत रुजू राहून, संस्थानचा बंदोबस्त करून, सेवा एकानिष्ठेनें करीत जाणें, अभय असे ह्मणोन. छ २० राबिलाखर–यादी पुरंधर. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रबिलाखर २६

५६२–( ४६१ ) जमा जामदारखाना.

कमाविस भेटबद्दल फैज महमदखान रोहिले, संस्थान भूपाल यांजकडून हरदयाळ वकील वस्त्रें घेऊन आले, तीं गुजारत जानोजी जांबळा खिजमतगार, सनगें एकूण किंमत. रुपये.

समान सबैन मया व अलफ जमादिलावल २

---

( 560 ) Ráje Bhárat Shábá Hatiyáráy of Sansthán Kálibhint Mamdai was informed that a levy of Rs. 2500 on account of Dahak and the Haks of Patils and Kulkarṇis was imposed on him and that he should pay the amount to Náro Ballál Kumávisdár of Sirkár Hánḍe.

A. D. 1776-77.

( 561 ) After the death of Bhagwantsing bin Durjansing, Rájá of Sansthán Mánḍwi, Durjansing's widow Ratankuwar adopted Gumánsing as her son. On the representation of Gumánsing's agent the continuance of the Sansthán to him was guaranteed. A nazar of Rs. 30,000 was imposed.

A. D. 1776-77.

( 562 ) A present consisting of clothes worth Rs. 819 was received from Faiz Mahomedkhán Rohile of Sansthán Bhopál.

A. D. 1777-78.

| | | |
|---|---|---|
| ५५५ राजश्री राव यांस सनगें एकूण | | रुपये. |
| ५५ चिरा बादली | १ | |
| २५० जामेवार जरीबादली | २ दर १२५ प्रमाणें. | |
| १५० शालफर्द | २ दर ७५ प्रमाणें. | |
| १०० किमखाप | १ | |
| ५५५ | ६ | |
| २६४ मातुश्री गंगाबाई यांस. | | |
| १५० पातळ जरीबादली | १ एकूण. | |
| १४ खण जरीबादली | १ एकूण. | |
| १०० किमखाप | १ एकूण. | |
| २६४ | | |
| ८१९ | ९ | |

५६३–( ४९१ ) संस्थान वासदें येथील उदेसिंग संस्थानिक मृत्यु पावला, त्याचे पोटीं संतान नाहीं, सबब त्याचे स्त्रीनें वीरसिंग यास दत्तपुत्र घेतलें, त्याप्रमाणें सरकारांतून करार करून येविशीं. सनदा.

समान सबैन मया व अलफ साबान १६

१ गणेश विश्वनाथ यास कीं, संस्थान वीरसिंग याचे स्वाधीन करणें, ह्मणोन पेशजीं राजाराम खंडेराव याजबरोबर पत्र तुह्मांस सादर केलें आहे, त्याप्रमाणें वीरसिंगाची स्थापना करणें. राजाराम खंडेराव याचे विद्यमानें भगवान दयाळजीस दिवाणगिरी सांगोन, नजरेचा ऐवज ठराऊन, सालाबादचा संस्थान मजकूर येथील चौथाईचा ऐवज यावयाचा, त्याचा पक्का बंदोबस्त करून घेणें. सालमजकूर वसूल तुह्मांकडे पडला असेल, तो महाल मजकूर वजा करून, चौथाईत मजुरा देऊन बाकी राहील तो व नजरेचा ऐवज वसूल घेणें ह्मणोन.

---

( 563 ) Udesing of Sansthán Wásade ( Bansda ) died childless. His widow adopted Virsing. The adoption was recognised by Government and Gaṇesh Vishvanáth was directed to instal Virsing on the throne, to hand over the territory to him, and to appoint Bhagwán Dayálji as his Dewán.

A. D. 1777-78.

१ वीरसिंग याचे नांवें कीं, तुह्मीं संस्थानचा बंदोबस्त करून, सरकारचा सालाबादचा ऐवज देत जाऊन सुखरूप राहणें, ह्मणोन.

२

दोन पत्रें.

रसानगी यादी.

५६४-( ४९४ ) बाळाजी गोविंद यास सनद कीं, हिंदूपंत बुंदेले यांचे पुत्र राजे सरजेतसिंग यांच्या राज्याचे बंदोबस्तास सरकारांतून गणेश संभाजी यांस पाठविले आहेत, यांस राहावयास ठिकाण पाहिजे, सबब प्रांत बुंदेलखंडपैकीं मोहाब श्रीनगर तपेसुद्धां याजकडे देविले असेत, तरी मशारनिल्हेचे हवाला करून कबज घेणें. सरजेतसिंग यांचे राज्याचा बंदोबस्त जाला ह्मणजे ठाणें तुमचे हवाला केलें जाईल. या महालची रसद सालमजकुरीं तुह्मीं घेतली असल्यास त्यांत तुह्मांकडील कमाविसदाराकडे वसूल पडला असेल, त्याची रुजुवात मशारनिल्हेचे नांवें गुजारतीनें करून, वसुलांत शिबंदी हिसेरसीद वजा घालून, बाकी ऐवज राहील, तो रसीदेंत वजा करणें; आणि सदरील महालचे जमाबंदीपैकीं बाकी ऐवज राहील, तो मशारनिल्हे वसूल करून तुह्मांकडील कमाविसदाराकडे देतील ह्मणोन. सनद १.

समान सबैन मया व अलफ रमजान ४

रसानगी यादी.

५६५-( ५३८ ) विठ्ठलराम याचे नांवें सनद कीं, तुह्मांस संस्थान सुरापूर येथील मसलत सांगितली येविशीं कलमें.

समान सबैन मया व अलफ सफर २६

सुरापूर तालुक्यांत फौज घेऊन लौकर जावें. फौज गेल्यावर संस्थानचा वकील खंडणीस हुजूर येईल, त्यास खंडणीचा जाबसाल सालाबादप्रमाणें तुमचे विद्यमानें होईल, जाजती ऐवज साधल्यास तुह्मांस फौजेचे खर्चास देविला जाईल येणेंप्रमाणें. कलम १.

सरकारचे तालुक्यास व नवाबांकडील तालुक्यास उपद्रव लागों नये, बोभाट येऊं नये. येणेंप्रमाणें. कलम १.

सुरापूरचे तालुक्यांत जाऊन बंदोबस्त करणें, या कामास शिबंदी खर्च होईल तो सरकारचा तालुका, व नवाबाकडील तालुका खेरीज करून सुरापूरवाल्याचे तालुक्यांत ऐवज साधून घेणें. येणेंप्रमाणें. कलम १.

---

(564) Gaṇesh Sambháji was sent to manage the kingdom of Sarjetsing, son of Hindupant Bundele. A. D. 1777-78.

(565) Vithal Rám was ordered to proceed immediately with an army to Surápoor. This, it was expected, would lead the head of the Sansthán to send an agent to Poona to make an offer of tribute. Vithal Rám was informed that in A. D. 1777-78.

एकूण तीन कलमें करार केलीं असत, सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन. सनद १.

रसानगी याद, छ. १९ जिल्काद–पुरंधर.

५६६–( ५६८ ) कमाविस नजर बद्दल सरजेतसिंग राजे बुंदेले हिंदूपत यांचे पुत्र, हिंदूपत राजे मृत्यू पावले, सबब त्यांचे वडील पुत्रास संस्थानावर स्थापना करावी, ऐसा करार करून त्याजकडे सरकारचे नजरेचा ऐवज गणेश संभाजी याचे विद्यमानें घ्यावयाचा करार केला, त्यापैकीं अबाजी नाईक वानवळे साहुकार यांणीं हवाला घेतला आहे, त्यापैकीं कापड रोकडीचे खरेदीनें घ्यावयाचें त्यापैकीं जमा, गुजारत अबाजी वानवळे. रुपये.

तिसा सबैन मया व अलफ जमादिलावल २९

२८८३॥≈ तिवटें साधीं.

| | | |
|---|---|---|
| २७५६।= पैठणी | २०० | |
| १२७। धुवट जैनाबादी | १४ | |
| २८८३॥≈ | | २१४ |

५०९५॥।- जाफरखानी.

| | | |
|---|---|---|
| ५०१८८- पैठणी | १३१ | |
| ७७॥। जैनाबादी धुवट | २ | |
| ५०९५॥।- | | १३३ |

| | |
|---|---|
| ३९५५। पासोड्या | ४२ |
| २९५४८≈ गजन्या | १७९। |

२३५॥ शेले साधे.

| | |
|---|---|
| ३१॥ चंदेरी | १ |
| २०४८- जैनाबादी धुवट | ६ |
| २३५॥- | ७ |

that case the amount of the tribute would be fixed through him. He was directed to abstain from molesting the territories of Government and of the Nizám, and to levy the expenses of the army from the villages of the Sansthán.

(566) Hindupant, Rájá of Bundele, having died, orders were issued to establish on the throne his son Surjetsing Ráje and to levy the Nazar imposed.

A. D. 1778-79.

| | | |
|---|---|---|
| ३१८ | ताफ्ते कद | २२ |
| १८५॥। | सुशा | ३० |
| ८८॥। | किमखाप | १ |
| १९३७।‸ | तिवट, छिटी बऱ्हाणपुरी | ३४ |
| ४९८≡ | दुपटे छिटी बऱ्हाणपुरी | ५ |
| १०३ | तिवटें चुनडी | ३ |
| ११६५।= | जामेवार छिटी बऱ्हाणपुरी | २५॥ |
| १५२८≡ | पातळें छिटी बऱ्हाणपुरी | ४ |
| २३ | खाद्या पासोड्या | २३ दर १ |
| २११०६॥≈(१९१४६॥।=) | | ८२९॥। (७२२॥।) |

५६७—( ५७० ) सोमदेव राणा संस्थान रामनगर यांचे नांवें सनद कीं, नारायण देव राणा पेशजीं संस्थान मजकुरीं अधिकारी होते, ते मृत्यु पावले त्यांचे पोटीं संतान नाहीं, याजकरतां त्यांचे स्त्रीनें तुह्मांस दत्तपुत्र सन सबा सबैनांत गणेश विश्वनाथ याचे विद्यमानें घेऊन सरकारची नजर रुपये १५००० पंधरा हजार मशारनिल्हे यांणीं तुह्मांकडे करार केली, त्याप्रमाणें सरकारांतून करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी तुह्मीं संस्थान मजकूर येथील अधिकार करून सुखरूप राहणें. सदरहू नजरेचे ऐवजापैकीं बाकी राहिली असेल त्याचा वसूल गणेश विश्वनाथ याजकडे देणें; आणि संस्थानाकडे सालाबाद सरकारचीं कलमें असतील त्यांचा फडशा हुजूर करीत जाणें ह्मणोन, मशारनिल्हेचे नांवें. सनद १.

तिसा सबैन मया व अलफ जमादिलाखर १२

रसानगी यादी.

## माधवराव रामचंद्र यांच्या कीर्दीपैकीं.

५६८—( ९९४ ) तालुके गंभीरगड सरकारांत हस्तगत जाहला, त्यास तालुके मजकूरच्या जकाती जोतपूर येथें सरकारचा अंमल अलिकडे चालत नाहीं, त्यास सुदामत जकातीचा अंमल चालत आला, त्याप्रमाणें कृष्णाजी महादेव याजकडे चालवणें ह्मणोन, सोमदेव राणा संस्थान रामनगर

इहिदे समानीन मया व अलफ जमादिलाखर

( 567 ) Náráyaṇdev, Ráṇá of Sansthán Rámnagar, died without issue. His widow therefore adopted, with the consent of Gaṇesh Vishwanáth, Somdeva Ráṇá as her son in Sabá Sabain, and agreed to pay a nazar of Rs. 15,000. The adoption was ratified by Government, and Somdeva Râṇá was allowed to succeed to the throne of his adoptive father.

A. D. 1778-79.

( 568 ) Somdeo Ráṇá of Sansthán Rámnagar was asked to continue to Krishṇáji Náráyáṇ the right to levy octroi in Táluká Gambhirgaḍ which had fallen into the hands of Government.

A. D. 1780-81.

याचे नांवें चिटणिसी. पत्र १. छ. ६ जमादिलाखर.

५६९–( ७४८ ) महादजी शिंदे याचे नांवें पत्र कीं, संस्थान करोली मंडरायेल ये-

इसन्ने समानीन
मया व अलफ
रबिलाकर २२

थील राजा माणिकपाल याजकडे संस्थानचा अंमल सरकारचा येणें, त्याचा फडशा सन सबैन पावेतों विसाजी कृष्ण, व रामचंद्र गणेश यांणीं स्वारींत करून, ऐवज ठराविला, त्यापैकीं कांहीं सरकारांत दिल्हा, बाकी ऐवज येणें, त्याजवर वराता जाहल्या, त्यास वरातेप्रमाणें ऐवज पावता जाला नाहीं; व अलीकडील सन इहिदे सबैन तागाईत इसन्ने समानीन पावेतों अंमलाचा फडशा होणें; व सालमजकुरीं महिपतराव कृष्ण याजकडील कमाविसदार आनंदराव गोपाळ होते, त्यांचे कर्जाचा ऐवज राज्याकडे येणें तो सुरळीत वसूल देत नाहीं, ह्मणोन हुजूर विदित जालें, त्याजवरून हें पत्र लिहिलें असे, तरी तुह्मीं संस्थानास ताकीद करून, पेशजींच्या करा[रा]प्रमाणें ऐवज बाकी येणें, तो महिपतराव कृष्ण याजकडील कारकून सांगतील त्याजप्रमाणें ऐवज वसूल येई तें करून, महिपतराव कृष्ण याजकडील कमाविसदाराकडे देवणें. पुढें अंमल सुरळीत चालते करणें; आणि हुजूर लिहून पाठवणें; व आनंदराव गोपाळ याचें कर्ज संस्थानाकडे येणें आहे, त्याविशीं ताकीद करून आनंदराव याचे पुत्र गोपाळ आनंदराव याजकडे वसूल देत असें करणें ह्मणोन, चिटणिसी. पत्र १.

५७०–( ५६३ ) मौजे ठाकेर तलावपैकीं नंदुरबार हा गांव तालुके कुकरमुंढें याजकडे

इसन्ने समानीन
मया व अलफ
जमादिलावल २९

आहे, तो पेस्तर साल सन सलास समानीनापासून राणा हिमतसिंग संस्थान आखराणी यांणी सरकार चाकरी एकनिष्ठपणें केली, सबब जातीस सरंजामास द्यावयाचा करार केला, त्यास मौजे मजकूर येथील तनखा. रुपये.

७२८॥ ऐन तनखा.
९१ सरदेशमुखी.

---

८१९॥

एकूण आठशें साडे एकोणवीस रुपये मशारनिल्हे यांचे नांवें ल्याहावयाचा करार करून, हे सनद तुह्मांस सादर केली असेत, तरी मौजे मजकूर हा गांव यांचे दुमाला करून देऊन

---

( 569 ) Rájá Máṇikpál of Sansthán Karoli Manḍaráyel having failed to pay the dues of Government, Mahádji Scindia was directed to arrange for their recovery.
A. D. 1781-82.

( 570 ) Ráṇá Himatsingh of Sansthán Akraṇi, having rendered good assistance to Government, was given the village Tákertaláv in Pargaṇá Nandurbár as personal Saranjám.
A. D. 1781-82.

सदरहू आठशें साडे एकुणीस रुपये तालुके मजकूरचे हिशेबीं यांचे नांवें खर्च लिहीत जाणें म्हणून, यादवराव रघुनाथ यांचे नांवें. सनद १.

येविशीं मोकदम, व जमीदार यांस कीं तुह्मीं मशारनिल्हेसीं रुजू होऊन मौजे मजकूर येथील अंमलाचा वसूल सुरळीत देत जाणें ह्मणोन, जमीदार नंदुरबार यांस चिटणिसी. पत्र २.

—
३

तीन सनदा व पत्रें दिल्हीं असेत.

रसानगी यादी.

५७१–( ७६० ) पर्वतसिंग दलपतराव संस्थान पेठ यांस, सालमजकुरीं सरकारांतून मामले कोहेज येथें चाकरीस पाठविलें होतें, त्यांस पर्वतसिंग मृत्यु पावले, सबब त्यांचे पुत्र हिंमतसिंग व भावसिंग उमेद धरून चाकरी करीत आहेत, याजकरितां उभयतांस तैनात करार करून देऊन रोजमरा द्यावयाची आज्ञा जाहली पाहिजे, ह्मणोन तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें, त्याजवरून हिंमतसिंग व भावसिंग यांस दरमहा तैनात रुपये १२० एकशें वीस रुपये करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी मामले मजकुरीं उभयतांपासून चाकरी घेऊन तैनातेप्रमाणें रोजमरा दरमहा देत जाणें ह्मणोन, आबाजी यादव याचे नांवें. सनद १.

इसने समानीन मया व अलफ जमादिलाकर २०

रसानगी यादी.

५७२–( ७६१ ) संस्थान रामनगर, व संस्थान वासदें येथील अंमल सरकारांत आहे, त्याची कमावीस सालमजकुरीं धोंडो महादेव यांस सांगितली असे, तरी तुह्मीं मशारनिल्हेचे ऐकमतें चालोन संस्थान मजकूर येथील सरकार अंमल सुरळीत देणें ह्मणोन. सनदा.

इसने समानीन मया व अलफ जमादिलाकर २१

१ सोमदेव राणा संस्थान रामनगर.
१ उदेसिंग संस्थान वासदें.

—
२

रसानगी यादी.

---

(571) Parvatsingh Dalpatrao of Sansthán Peth was sent in this year for service to fort Kohaj. He died. His sons Himatsingh and Bháwsingh were taken into service.

A. D. 1781-82.

(572) The Amal of Sanstháns Rámnager, Wásade, was under the management of Government. It was given in Kamávis to Dhondo Mahádeo. Somdeo Ráná of Sansthán Rámnager and Udesingh of Sansthán Wásade were requested to act in harmony with him and to pay him the Government Amal without objection.

A. D. 1781-82.

५७३–( ७७५ ) कमाविस भेट राजश्री राव यांसी चेतसिंग राजे काशीचे, यांजकडून नारायण निगेव्ये वस्त्रें घेऊन आले तीं गुजारत जानोजी जाधव खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

सल्लास समानीन मया व अलफ जिल्हेज २८

| | | |
|---|---|---|
| ३० | तिवट | १ |
| ७५ | जाफरखानी | १ |
| ३५ | शेले साधे, धुवट | २ |
| ८० | किमखाप | १ |
| २२० | | ५ |

५७४–( ८०० ) नवाब फत्ते अलीखान बहादर यांचे नांवें जाब कीं, तुह्मांकडे सन ११९५ हिजरी शके १७०३ प्लवनामसंवत्सरेचे पेषकसीचे ऐवजाचा ठराव केला त्याचा भरणा. रुपये.

सलास समानीन मया व अलफ रजब ३

१०,००,००० गुजारत नूरमहमदखान हस्ते अच्यापा नाईक, गुमस्ते दिंमत राघवेंद्र नाइक जखाते.

२,००,००० आनंदराव भिकाजी रास्ते याचे पथकास खर्चास देविले, त्याच्या वराता अलाहिदा दिल्या आहेत. रुपये.

५०,००० किता वरात सन इहिदेंत पेस्तर सालचे खंडणीचे ऐवजीं दिल्ही आहे ते. रुपये.

१,५०,००० किता वरात सन इसन्नेंत दिल्ही ते. रुपये.

२,००,०००

१२,००,०००

एकूण बारा लक्ष रुपये सदरहूप्रमाणें सरकारांत पोहोंचले असेत ह्मणोन. जाब १.

५७५–( ३५ ) बाळाजी महादेव लवाटे हे कोळीयांचे मलईत मिळोन, जवारकर राणीचे निसबतीस राहून, कल्याण प्रांतांत वगैरे जागा दंगा करीत होते, सबब मशारनिल्हेचे मुलांमाणसांस जामीन घेऊन कतबा तुह्मीं सुभा घेतला आहे, त्यास हल्लीं जवारकर राणी आनंदराव भिकाजी यांचे

अर्बा समानीन मया व अलफ रबिलाखर ५

(573) Clothes worth Rs. 220 were received as a present from Chetsing, Rájá of Kâshi.
A. D. 1782-83.

(574) Receipt was acknowledged of 12 lakhs of rupees received from Nabob Fate Alli Khán Bahádur as tribute for the year A. D. 1781-82.
A. D. 1782-83.

(575) Bálâji Mahádeo Lawâte joined the Kolis, and living under

गुजारतीनें घेऊन, सरकारांत रुजू जाली, त्याजबराबर बा(ळा)जी महादेवही रुजू जाहले, सबब मशारनिल्हेचा जामीनकतबा घेतला आहे तो, व वस्तभाव घेतली असेल ती, माघारे द्यावयाचा करार करून, हे सनद सादर केली असे, तरी जामीनकतबा घेतला आहे तो, व वस्तभाव घेतली असेल ती माघारी देणें ह्मणोन, आनंदराव धुळप यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५७६-( ८३७ ) जमा जामदारखाना.

अर्बा समानीन मया व अलफ रविलाखर २१

कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबत राजे रणसिंग संवस्थान नेपाळ, यांजकडे लज्या शंकर वकील हुजुरून पाठविले होते, त्यांजबरोबर राज्यांनीं मुसेजर पाठविले, ते गुजारत सिदोजी मान्या खिजमतगार सनंग १, एकूण किंमत रुपये ७५.

५७७-( ८४५ ) धोंडो महादेव यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें

अर्बा समानींन मया व अलफ जमादिलाखर २९

प्रविष्ट जाहलें. संस्थान रामनगर येथील राजा सोमदेवराणा यास आषाढमासीं देवाज्ञा जाहली, त्याच्या सावत्र आया, व कारभारी यांणीं राजाच्या मुलांस विषप्रलय करावयाचा मनसबा केला होता. ऐसें सोमदेवचे राणीस कळल्यावर कारभारी यास कैद करून पारपत्य केलें. आणि मुलांस घेऊन मांडवीस गेली, ते वेळेस राणीचे ममतेचे येसू दळवी किल्ले पेडवळ येथें आहे तो, व आवजीनाईक पालवे, वगैरे यांस सांगितलें कीं, तुह्मीं श्रीमंतांकडे चांगल्या माणसांचे हातें सूत्र

---

A. D. 1783-84

the protection of the Jowár Râṇi created disturbances in Prânt Kalyáṇ &c. A security-bond was therefore taken from his relations. The Jowár Râṇi and Bá(ḷá)ji Mahádeo having now tendered their allegiance to Government, the security-bond was annulled, and the property of Bá(ḷá)ji that had been attached was ordered to be restored to him.

( 576 ) Lajjá Shankar Vakil was sent to Ráje Raṇsingh of Sansthán

A. D. 1783-84

( Nepâḷ )? नेपाळ. The Rájá sent a present with him.

( 577 ) The Rájá of Sansthán Rámnagar, Somdeo Ráṇá, died in the month of Ashâḍh of this year. His step-mothers and

A. D. 1783-84

Kárbhári entered into a plot to poison his infant son. The Rájá's widow having got scent of the matter arrested and punished the Kárbhári and went away with her child to Mánḍvi. She then communicated to Esu Daḷvi of fort Pedwaḷ, Âwji Naik Pálve and others, who enjoyed her confidence, her desire to throw herself on the mercy of the Peshwá and to live under his protection. Esu Daḷvi thereupon sent Âwji Naik to Dhonḍo Mahádeo for negotiation. Dhonḍo sent men to the

ठवून त्यांचे पदरीं पडावे, त्याजवरून येसू दळवी किल्ले पेडवळ याणें आवजीनाईक यास पाठवून, कुमाजीनाईक याचे हातें आह्मांस येऊन भेटले. आह्मी तिकडील सर्वांचे संमत घ्यावयास कुमाजीनाईक खाडे यांस पाठऊन, दळवी वगैरे नाईक-वाडी व जमीदार व रयतेचे संमत आणिले. आवजी नाईक याचा लेक आणिला ह्मणून लिहिलें तें कळलें, व नाईक-वाडी व किल्लेकरी वगैरे यांस बक्षीस व इनाम द्यावयाची याद पाठविली, ती पावली. ऐशास बक्षीस व इनाम द्यावयाविशीं सनद अलाहिदा सादर केली आहे. तुह्मीं तालुके त्रिंबकपैकीं वगैरे शेंदोनशें लोक, व चाळीस पन्नास स्वार, व शहाणा माणूस पाठऊन सोमदेव राणा याच्या सावत्र आया रामनगरास आहेत, त्यांस, व पेडवळ किल्ला हस्तगत करावयासी पैरवी करणें. सरकारातून फौज व गाडदी रवाना केले आहेत. लौकरच येऊन पोहचतील. तुह्मांकडील यादीप्रमाणें पत्रें पाठविलीं आहेत, तर सरदारांस व जमीदारांस दिलभरंवसा देऊन संस्थानाचा व किल्याचा बंदोबस्त करणें. मसलत फार न लांबवितां युक्तीनें संस्थान हातास येईल ते गोष्ट करणें ह्मणून मशारनिल्हे यांचे नांवें. छ. २९ रविलाखर सनद १.

परवानगी रूबरू.

संस्थान रामनगर व किल्ले पेडवळ येथील बंदोबस्ताविशीं तुह्मीं विनंतिपत्र, व नाईकवाडी वगैरे यांस बक्षीस व इनाम द्यावयाची यादी पाठविली ती प्रविष्ट जाहली, ऐशास संस्थानाचा व किल्याचा बंदोबस्त तुम्हांस सांगोन, हे सनद सादर केली असे, तरी संस्थान मजकूरचे व किल्याचे कारभारी व नाईकवाडी यांस बक्षीस व इनाम द्यावयाविशींचीं.

कलमें.

| बक्षीस एकसाली. | रुपये. | इनामगांव. | रुपये. |
|---|---|---|---|
| ५५० कडीं सोन्याचीं. | | ५०० येसाजी दळवी किल्ले पेडवळ देहे १ एकूण. | |
| ३५० किल्लेदारास. | | ३०० आवजी नाईक पालवे यास. | |
| २०० कारभारियास. | | २०० मांडवीकर नाईक यास. | |
| ५५० | | ३०० रतन नाईक गावरीकर यास. | |

---

province and obtained the consent of the Jamidárs and the rayots ( to the province being taken under the protection of the Peshwá ). He then reported the circumstances to the Peshwá. He was directed to depute men to secure the persons of the Rájá's step-mothers and to obtain possession of the fort of Peḍwaḷ. Rewards to the fort-officers and others were sanctioned. Forces were sent from Huzur for his assistance. He was further directed to induce the Dowager Ráṇi to live with her son at some place in the Government territory and to make provision for his expenses.

१०० कर्डी रुप्याचीं सुमार ४ एकूण.
५० लोकांस पोस्त वगैरे मिळोन.

७००

एकूण सातशें रुपये संस्थान पैकीं देणें.
कलम १.

मध्यस्तास इनाम गांव. रुपये.
३५० कुमाजी नाईक खाडे यास.
७५ कमाजी नाईक वाघ यास.

४२५

एकूण सवा चारशें रुपयांचे गांव द्याव-याविशीं लिहिलें त्यास मध्यस्तास एक-साली बक्षीस द्यावें. इनाम गांव द्यावयाचें ठीक नव्हे; परंतु जरुराती देणेंचे, तर कांहीं कमी करून संस्थानपैकीं गांव नेमून देणें. कलम १.

२५० कित्ता नाईक असामी ५ एकूण दर असामीस रुपये पन्नास प्रमाणें.

१५५०

एकूण साडे पंधराशें रुपयांचे गांव इ-नाम कमकसर द्यावयाचा करार करून संस्थानाचा, व किल्याचा बंदोबस्त करून सदरील बेरीजेचे इनाम गांव कमालाप्रमाणें संस्थानपैकीं नेमून देणें. कलम १.

एकूण तीन कलमें करार केलीं असेत, तरी संस्थानाचा व किल्याचा बंदोबस्त करून सदरीलप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, धोंडो महादेव याचे नांवें. छ. २९ रविलाखर सनद १.

परवानगी रूबरू.

संस्थान रामनगर येथील बंदोबस्त करावयास धोंडो महादेव यास आज्ञा केली असे, तरी मशारनिल्हेशीं रुजू होऊन महालची आबादी करून अंमल सुरळीत देणें ह्मणोन. छ. २९ रविलाखर. सनदा.

१ देशमुख, व देशपांडे, महालानिहाय, संस्थान मजकूर यांस.
१ मोकदम, व रयान महालानिहाय, संस्थान मजकूर यांस.

परवानगी रूबरू.

२

सोमदेव राणा संस्थान रामनगर याचे राणीनें एका वर्षाचा पुत्र होता तो घेऊन मांड-वीस गेली, त्यास राणीनें पुत्र सुद्धां सरकार तालुक्यांत एखादी जागा योजून तेथें रहावें.

त्यांचे खर्चाची बेगमी कांहीं इतलाख व एक दुसरा गांव देऊन करावी. याप्रमाणें कोणी शहाणा माणूस पाठऊन आणावयाची पैरवी करणें. राणी बाहेर राहिल्यास सरकार बंदोबस्तांत कमी पडेल, यास्तव सोईस पडेल तसे करणें. सोमदेवाच्या सावत्र आया व जुने कारभारी रामनगरास आहेत, त्यांस हस्तगत करून आपल्या तालुक्यांत पक्या बंदोबस्तानें ठेवणें म्हणोन, धोंडो महादेव यांचे नांवें. छ. २९ रविलाखर. सनद १.

परवानगी रूबरू.

५७८–( ८५२ ) जमा जामदारखाना.

खमस समानीन मया व अलफ रमजान १३

कमाविस भेट राजश्री राव यांसीं, बाबत हरीसिंग राजे, संस्थान गढाकोट, प्रांत बुंदलखंड, यांणीं लग्नाचा पोशाक धरणीधर वकील याजबराबर सनगें पाठवलीं, ते गुजारत जानोजी जाबळा खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| २५ | तिवट कोरदार | १ |
| १०० | शाला थिर्के | २ |
| २५ | महमुदी जरी | १ |
| २५ | पटका अमदाबादी | १ |
| ५० | किमखाप | १ |
| २२५ | | ६ |

५७९–( ८५६ ) राजे व्यंकटापा नाईक बहिरी बहाद्दर संस्थान सुरापूर यांचे नांवें

खमस समानीन मया व अलफ रमजान २७

जाब कीं, तुम्हीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट जहालें. हरिदत्त हत्ती, नग१ एक सरकारांत नजर पाठविला तो पावला म्हणून. जाब १.

५८०–( ८५७ ) जमा जामदारखाना.

खमस समानीन मया व अलफ सवाल ११

कमाविस भेट बाबत हाय लग्नाचे अहेराचीं वस्त्रें आलीं, तीं गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

---

( 578 ) A present of clothes was sent by Harising, Ráje of Sansthán Gadhâkot in Piánt Bundelkhand, with his agent Dharṇidhar to the Peshwá in honor of the latter's marriage.
A. D. 1784-85.

( 579 ) Ráje Venkaṭapá, Naik Bahiri Bahádar of Sansthán Surápur, sent an elephant as a present to the Peshwá.
A. D. 1784-85.

( 580 ) Presents were received by the Peshwá, in honor of his marriage, from Tuḷjáji Ráje of Sansthán Chandáwar and from Soma Bhupál Ráje of Sansthán Gadwâḷ.
A. D. 1784-85.

९२८॥ बाबत तुळजाजी राजे, संवस्थान चंदावर, यांजकडून सांब शिवराव वकील घेऊन आले, तीं सनगें एकूण. रुपये.

१०७॥ (७०७॥) राजश्री राव यांसीं.

२५८॥(२५७॥) प्रत पोशाख.

| | | |
|---|---|---|
| २० | चिराबादली, कारचोबी | १ |
| ८७॥ | जामेवार बादली | २ |
| २० | गोषपेच | १ |
| ४० | चादर | १ |
| ९० | किमखाप | १ |
| २५८॥ (२५७॥) | | ६ |

४५० प्रत पोशाख.

| | | |
|---|---|---|
| १०० | तिवट, छिटी बालापुरी, वर काम सोनेरी | १ |
| १२५ | दुपटा, छिटी बालापुरी, वर काम सोनेरी | १ |
| १०० | जामेवार, छिटी बालापुरी, काम सोनेरी | १ |
| १२५ | किमखाप | १ |
| ४५० | | ४ |

७०७॥ — १०

२२० सौभाग्यवती रमाबाई यांसीं.

| | | |
|---|---|---|
| १५० | छीट जसोऊ, बालापुरी, वर काम सोनेरी | १ |
| १० | चोळखण छिटी बालापुरी | १ |
| ६० | चादर, जरीबादली | १ |
| २२० | | ३ |

९२७॥ — १३

२९३ बाबत सोमभूपाल राजे, संवस्थान गदवाल, यांजकडून नरसिंगराव वकील घेऊन आले, तीं सनगें. रुपये.

२०९ राजश्री राव यांसीं.

| | |
|---|---|
| २४ चिरा तमामी सोनेरी. | (१) |
| ३२ बोढणी तमामीन सोनेरी | १ |
| १०३ जामेवारे तमामी सोनेरी | २ |
| ५० किमखाप | १ |
| २०९ | ५ |

८४ सौभाग्यवती रमाबाई यांसीं.

| | |
|---|---|
| ८० लुगडें ताडपत्री | १ |
| ४ चोळखण ताडपत्री. | १ |
| ८४ | २ |
| २९३ | ७ |
| १२२०॥ | २० |

५८१–(८७५) लाला रणछोड वकील यांणीं हुजूर येऊन विनंति केली कीं, सोमदेव राणे, संस्थान रामनगर, हे मृत्य पावले, सबब त्यांचे पुत्र रूपदेव राणे यांची स्थापना संवस्थान मजकुरीं पूर्ववत्प्रमाणें करावी ह्मणोन, त्याजवरून तुमची एकनिष्ठता जाणोन, संस्थान मजकुरीं, तुमची स्थापना पूर्ववत्प्रमाणें केली असे, तरी तुह्मीं सरकारांत एकनिष्ठपणें वर्तणूक करून सुखरूप राहणें, अभय असे ह्मणोन, रूपदेव राणे संवस्थान रामनगर, यांचे नांवें. कौल १.

खमस समानीन मया व अलफ रविलाखर १९

रसानगी यादी.

५८२–(८७७) अबई राणी जवारकर इंग्रजाकडे कल्याणास होती, त्यास प्रांतांत कोळ्यांचा उपद्रव होऊं लागला, याकरितां तीस सरकारांत आणली ते समयीं ठराव जाहला आहे, त्यापैकीं हल्लीं सालगुदस्तापासोन जातीस तैनात वगैरे तालुके वसईपैकीं द्यावयाचीं कलमें.

खमस समानीन मया व अलफ रविलाखर २९

(581) Lálá Ranchhoḍ Vakil prayed that Rupdeo Ráṇá, son of Somadeo Ráṇá deceased of Sansthán Rámnagar, might be allowed to succeed to the Sansthán. The prayer was granted.

A. D. 1784-85.

(582) Abai Ráṇi of Jowár was residing at Kalyáṇ with the English. The Kolis having created a disturbance in the country, the lady was brought to the Peshwá and

A. D. 1784-85.

भोजनखर्च व पालखीचे व कारकुनास नेमणूक सालीना. रुपये.

१७५० अबईस.

१००० भोजनखर्च वगैरे

७५० पालखीचे भोई यांस.

---

१७५०

४५० कारकून.

३०० बाजी महादेव.

१५० विष्णु महादेव.

---

४५०

---

२२००

एकूण दोन हजार दोनशें रुपये सालीना नेमणूक केली असे, तरी राणी तेथें राहील तोंपावेतों सदरीलप्रमाणें देत जाणें. कलम १.

किता अबईस.

पालखीचे सरंजामास रुपये १५० दीडशें रुपये देणें पुढें दोन सालें आड जाऊन तिसरे सालीं देत जाणें.

दिवटीस तेल दरमहा वजन पक्के ८८३॥। प्रमाणें बारमाही वजन पक्के ८१८५ एकूण एक मण पांच शेर तेल सालीना करार करून दिल्हें असे, तरी सदरील प्रमाणें देत जाणें.

एकूण सदरीलप्रमाणें. कलम १.

लोक गाडदी वगैरे यांचे सालीना रुपये.

१००० सरदार असामी १० दरमहा दर असामीस रुपये १० प्रमाणें एकमाही रुपये १००. रोजमरे १० प्रमाणें रुपये.

३२०० गाडदी असामी ५० दरमहा दर असामीस रुपये ८ प्रमाणें रुपये ४००, एकूण रोजमरे ८

२२४० हशम असामी ४० दरमहा दर असामीस रुपये ७ प्रमाणें रुपये २८० एकूण रोजमरे ८

६०० राऊत असामी ५ दरमहा दर असामीस रुपये १२ प्रमाणें रुपये ६० एकूण रोजमरे १०

---

७०४० १०५

एकूण एकशें पांच असामींचे सात हजार चाळीस रुपये करार करून दिल्हे असेत, तरी सदरील लोकांपासून तालुके वसई येथील शिबंदीचे नेमणूकपैकीं लोकांची गैर हजेरी होईल त्याचा आकार वजा करून बाकी तालुके मजकूरचे शिरस्तेप्रमाणें देत जाणें. कलम १.

---

an engagement was entered into with her, by which it was agreed to pay her and her Sardárs and attendants, some allowances. The allowances were now ordered to be disbursed.

शिपाई लोकांचे कबीले व गुरूंढोर वगैरे ठेवावयासी पांचशें रुपयाचे आकाराचा एक गांव तैनातेंत नेमून द्यावयाचा करार केला असे, तरी सदरील बेरजेचा एक गांव तैनातेंत नेमून देणें; आणि फडफर्मास सालाबादी असेल, ते यांजकडे चालवणें. कलम १.

एकूण चार कलमें करार करून देऊन, हे सनद सादर केली असे, तरी सदरीलप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, जिवाजी गोपाळ यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५८३–( ९०५ ) कमाविस भेट राजश्री राव यांसी, बाबत संस्थान कर्नोल निसबत रणमस्तखान याचे पुत्र इब्रामखान यांजकडून राघवेंद्र नारायण वकील वस्त्रें घेऊन आले, ते गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

सीत समानीन मया व अलफ मोहरम १०

६० तिवटें २
३५० शेले जाफरखानी २

४१० ४

५८४–( ९२४ ) संस्थान करोली, निसबत राजे माणिकपाल यांजकडे सन सलास समानीन तागाईत सन सीत समानीन चार साला खंडणीचा ऐवज येणें, त्याचे वसुलाचें कामकाज महिपतराव कृष्ण साठे यांचे मारफातीनें तुह्मांकडे आहे, त्यास तुह्मीं खंडणीपैकीं ऐवज पाठविला तो. रुपये.

सीत समानीन मया व अलफ जमादिलाखर २९

१००० छ. ३० जमादिलावल, जमा पोता.
५००० रदकर्जे, गुजारत महिपतराव कृष्ण यांचें कर्ज सरकारांत आहे त्यापैकीं. जमाखर्च छ. २९. जमादिलाखर.

६०००

एकूण सहा हजार रुपये सदरहूप्रमाणें सरकारांत जमा जाले असत ह्मणोन, गोपाळ अनंदराव यांचे नांवें. जाब १.

---

(583) Presents were received from Ibráhimkhán, son of Raṇamastakhán of Sansthán Karṇol.
A. D. 1785-86.

(584) Rs. 6,000 were received from Ráje Máṇikpál of Sansthán Karoli on account of tribute.
A. D. 1785-86.

५८५–( ९६४ ) जमा जामदारखाना

समान समानीन
मया व अलफ
जमादिलाखर २०

कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबत राजे मर्दनसिंग संस्थान गढाकोट, यांजकडून वकील पोशाक घेऊन आले, ते गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार, सनगें एकूण किंमत. रुपये.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २० तिवट धुवट कोरदार | १ | २० पटका काशीचा | | १ |
| १२० शाला थिर्के | २ | १०० जामेवार जरी बुटेदार | | ·॥· |
| २० शेले आंबवे | २ | ——— | | ——— |
| ६० महमुद्या धुवट | २ | ३४० | | ८॥· |

५८६–(१०११ ) जमा जामदारखाना.

इहिदे तिसैन
मया व अलफ
सवाल १९

कमाविस भेट सनगें एकूण. रुपये.

२८६ राजश्री राव यांसी, बाबत राजे मर्दनसिंग संस्थान गढाकोट, यांणीं पर्वतसिंग याजबरोबर पोशाख पाठविला, तो गुजारत रायाजी वागमारा खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

| | |
|---|---|
| १६ तिवट चंदेरीचें, कोर | १ |
| १०० शालफर्द | २ दर ५० |
| १२५ किमखाप | १ |
| ३० शेले साधे धुवट | २ दर १५ |
| १५ शेले आंबुवे | २ दर ७॥ |
| ——— | ——— |
| २८६ | ८ |

·॥· सौभाग्यवती रमाबाई यांसी, बाबत मातुश्री लक्ष्मीबाई जोशी, श्रीकाशीयात्रेहून आली, त्यांणीं दिला, तो गुजारत केदारजी येवला खिजमतगार चोळखण. १

| | |
|---|---|
| ——— | ——— |
| २८६॥। | ९ |

५८७–( १०१२ ) जमा जामदारखाना.

इहिदे तिसैन
मया व अलफ
सवाल २१

कमाविस भेट बाबत हाये सनगें एकूण. रुपये.

---

( 585 ) A present was received from Rájá Mardansingh of Sansthán Gadhákot.
A. D. 1787-88.

( 586 ) Presents were received by the Peshwá from Mardansingh of Sansthán Gadhákot.
A. D. 1790-91

( 587 ) Presents were received by the Peshwá from Dhokalsingh Rájá of Sansthán Parane.
A. D. 1790-91.

६२७ राजश्री राव यांसी, सनगें एकूण. रुपये.

५७७ बाबत ढोकलसिंग राजे, संवस्थान परणे, यांजकडून चिमट हजारी व लाला अखेरमण यांजबरोबर पोशाख पाठविला, तो गुजारत रायाजी वागमारा खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| १२ | तिवट धुवट | १ |
| १७ | तिवट कोरदार धुवट चंदेरीचें | १ |
| २० | तिवट आंबवे | १ |
| ११० | दुपटे काशीचे | २ |
| १६ | पटका आंबवी | १ |
| २० | शेले आंबवे | २ |
| ७२ | शेले साधे धुवट | ४ |
| ७५ | शाला फर्द | २ |
| २३५ | किमखाप | ३ |
| ५७७ | | १७ |

५० बाबत रामराव नारायण देशमुख यांची मातुश्री काशीयात्रेहून आली, त्याणीं दिल्हा, तो गुजारत गणोबा काणा, पितांबर मर्दानी काशीचा जरी किनारदार. १

६२७ — १८

४।।। सोभाग्यवती रमाबाई यांसी, बाबत हाये श्रीकाशीयात्रेहून आली, त्यांणीं दिल्हे, ते गुजारत केदारजी यवला खिजमतगार चोळखण एकूण. रुपये.

३ बाबत रामराव नारायण देशमुख यांची मातुश्री, खण पितांबराचा जरी किनारदार लाल १

१।।। बाबत खण ताफ्त्याचे बुटेदार २ एकूण.

४।।। — ३

६३१।।। — २१

५८८-( १०३७ ) चिमणाजी दलपतराव राजे, संस्थान पेठ, यांणीं संस्थान व महाल जकात सुद्धां, देखील खैराई किल्ला तुम्हांकडे कर्जात दिल्हा होता, त्यास हल्लीं सरकारांतून तुमचे कर्जाचा ठराव करून किल्ला व किल्याचे सरंजामात पांच हजाराचे गांव परगणे हरसूलपैकीं सरकारांत घ्यावयाचा करार करून, बाकी संस्थान व महाल जकातसुद्धां संस्थानिक याजकडे देविले त्यासंमंधें. कलमें.

इहिदे तिसैन मया व अलफ सवाल १

संस्थानचा अमल, व घोडीं, व कुणबिणी, व भांडीं वगैरे वस्तभाव कागदपत्र खतासुद्धां दस्ताऐवजीं असतील ते चिमणाजी दलपतराव यांचे स्वाधीन करून त्यांस नरहर गोपाळ यांजकडे पोहोचते करून कबज घेणें. कलम १.

किल्ले खैराई सरकारांत घ्यावयाचा करार केला आहे, त्याचा बंदोबस्त नरहर गोपाळ यांस करावयाची आज्ञा केली असे. तरी किल्ला, तोफा व जेजाला वगैरे जकीरासुद्धां मशारनिल्हेचे स्वाधीन करून कबज घेणें, तीन सनदांचा उजूर न करणें. कलम १.

देवजी अवधूतराव वेलकर, व खंडोजी नाईक वगैरे असामी ४ चार किल्ले त्रिंबक येथें

संस्थानिक यांजपासून ऐवज घ्यावयाचा रुपये.

१४५८३४ नजरेचा ऐवज सरकारांत घ्यावयाचा करार केला. रुपये.

१२५००० गैर नजर एकसाला.

२०८३४ नजरेचे सवालक्ष व तुमचे कर्जाचे पंचवीस हजार एकूण दीड लक्ष रुपये नऊ सालांत हसेबंदीनें घ्यावयाचे ठराविले, सबब व्याजाबाबद मोघम घ्यावयाचे २५००० रुपये पैकीं वजा तुमचे

(588) Chimnáji Dalpatrao, Rájá of Peṭh, mortgaged his Sansthán with the fort Khairai to Dhondo Mahádeo, officer of Trimbak. The debt due to Dhondo was agreed to be paid by Government, and the Sansthán was freed from mortgage and made over to the Rájá excepting the fort and the villages in Parganá Harsul, worth Rs. 5,000 attached to the fort which were retained by Government. The amount of debt with interest as also a large amount of Nazar was levied from the Rájá by Government.

A. D. 1790-91.

| | | |
|---|---|---|
| कर्जाबाबद हिसेरसीद ४१६६ रुपये बाकी रुपये. | अटकेंत आहेत त्यांस फैल नरहर गोपाळ यांचे हवालीं घेणें. | जामीन घेऊन करून कबज कलम १. |

१४५८३४

२९१६६ तुमचें कर्ज संस्थानिकांनीं देणें. त्याचा ठराव जाहला ते रुपये.

२५००० ऐन कर्ज.

४१६६ नऊ सालांत हसेबंदीनें ऐवज घ्यावयाचा सबब व्याजाबाबद.

२९१६६

१७५०००

यासी हसेबंदी सालें बीतपशील.

२०००० सालमजकूर, सन इहिदे तिसैन.
२०००० सन इसन्ने तिसैन.
२०००० सन सलास तिसैन.
२०००० सन अर्बा तिसैन.
२०००० सन खमस तिसैन.
२०००० सन सीत तिसैन.
२०००० सन सबा तिसैन.
२०००० सन समान तिसैन.
१५००० सन तिसा तिसैन.

१७५०००

एकूण पावणेदोन लक्ष रुपयांची निशा सदरहू हसेबंदीप्रमाणें नरहर गोपाळ याची सरकारांत घेऊन ऐवज तुम्हांकडे देविला असे, तरी तुम्हीं आपले कर्जाचे एकूण तीस हजार एकशें सासष्ट घेणें. व एक लक्ष पंचेचाळीस हजार आठशें चौतीस रुपये नजरेबाबद तुमचें

फाजील सरकारांत आहे, त्याऐवजीं रद्द कर्ज सालाचे सालांत अखेर सालीं नासिकांत नासिक चलणी घेऊन कबज देणें. कलम १.

एकूण चार कलमें लिहिलीं असेत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणून धोंडो महादेव, तालुके त्रिंबक, यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५८९-( १०३८ ) तुह्मांकडील राघो मुकुंद पुरोहित, व भवानीशंकर मजमदार, व कृष्णाजी सदाशिव फडणीस, व सुंदर शामजी यांणीं हुजूर येऊन विनंति केली कीं, धोंडो महादेव याजकडे कर्जात संस्थान गुंतलें आहे, त्यास त्यांचे कर्जाचा ठराव करून संस्थान आमचें आह्मांकडे देविलें पाहिजे ह्मणोन; त्याजवरून संस्थान तुह्मांकडे द्यावयाचा करार करून धोंडो महादेव यांचे कर्जाचा ठराव केला, सबब तुह्मांपासून ऐवज ध्यावयाचा. रुपये.

इह्दिे तिसैन मया व अलफ सवाल १

१४५८३४ नजरेबाबत सरकारांत ध्यावयाचे ते. रुपये.

१२५००० ऐन नजर.

२०८३४ नजरेचे सवा लक्ष, व धोंडो महादेव यांचे कर्जाचे पंचवीस हजार, एकूण दीड लक्ष रुपये नऊ सालांत हप्तेबंदीनें ध्यावयाचे ठराविले, सबब व्याजाबाबद मोघम करार केले रुपये २५००० पैकीं वजा धोंडो महादेव यांस कर्जाचा बाबद हिसेरसीद द्यावयाचे रुपये ४१६६ बाकी. रुपये.

---

१४५८३४

२९१६६ धोंडो महादेव यांचें कर्ज तुह्मीं देणें ते. रुपये.

२५००० ऐन.

४१६६ नऊ सालांबीं हप्तेबंदीनें ऐवज ध्यावयाचा, सबब पंचवीस हजार

---

(589) This arrangement was made at the request of the Rájá.

A. D. 1790-91.

रुपये व्याजाबाबद ध्यावयाचे क-
रार केले, त्यापैकीं हिसेरसीद.
रुपये.

२९१६६

१७५०००

यासी हप्तेबंदी.

| | | | |
|---|---|---|---|
| २०००० | सालमजकूर सन इहिदे तिसैन. | २०००० | सन सबा तिसैन. |
| २०००० | सन इसन्ने तिसैन. | २०००० | सन समान तिसैन. |
| २०००० | सन सलास तिसैन. | १५००० | सन तिसा तिसैन. |
| २०००० | सन अर्बा तिसैन. | | |
| २०००० | सन खमस तिसैन. | १७५००० | |
| २०००० | सन सीत तिसैन. | | |

एकूण एक लक्ष पंच्याहत्तर हजार रुपये सदरहूप्रमाणें ध्यावयाचे त्यापैकीं धोंडो महादेव यास कर्जाबाबद एकूणतीस हजार एकसें सासष्ट रुपये देऊन, बाकी एक लक्ष पंचेचाळीस हजार आठशें चौतीस रुपये सरकारचे नजरेबाबद येणें ते मशारनिल्हेचें फाजील सरकारांत आहे, त्यापैकीं रद्द कर्जास देविले असेत, तरी सदरहू मुदतीप्रमाणें सालाचे सालांत अखेर सालीं नाशिकांत नाशिक चलनी पावते करून पावलियाचें कबज घेत जाणें; व किल्ले खैराई व किल्याचे खर्चास परगणे हरसूलपैकीं पांच हजार रुपयांचा सरंजाम सरकारांत ध्यावयाचा करार केला आहे, त्याचा बंदोबस्त नरहर गोपाळ जोशी यांस करावयाची आज्ञा केली असे, तरी किल्ला, तोफा, जेजाला वगैरे जकीरासुद्धां मशारनिल्हेचे स्वाधीन करून, कबज घेणें; व किल्याचे सरंजामास पांच हजार रुपयांचे गांव परगणे मजकूरपैकीं नेमून देणें; आणि सरकार लक्ष राखोन तुह्मीं आपले संस्थानचा बंदोबस्त करून सुखरूप राहणें, ह्मणोन, चिमणाजी दलपतराव राजे संस्थान पेठ यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५९०–( १०४५ ) नारो कृष्ण यांचे नांवें सनद कीं, ममडाई तालुका सरकारांत घेतला, ते समई भारतशहा हटियाराय, संस्थान मजकूर, यांजकडे तालुके मजकूरपैकीं किल्लासुद्धां पंचवीस हजारांची जहागीर ठेवली, तेव्हां सरकारांत प्रयोजन लागल्यास आपले सरंजामानिसीं येऊन हाजर होऊं,

इसन्ने तिसैन
मया व अलफ
रमजान २३

---

( 590 ) When the Sansthán of Mamdai was taken by Government, a portion worth Rs. 25,000 was continued in Jahágir to Bháratsháha Hatiyaráya, the Rája of the Táluká,

A. D. 1791-92.

याप्रमाणें करार केला असतां, सरकारांत मसलत पडली असोन चाकरीस आले नाहीं; व कर्जपटीचा ऐवज सर्वांप्रमाणें सरकारांत दिल्हा नाहीं; सबब तूर्त पंचवीस हजार रुपयांची वरात अलाहिदा करून ऐवज तुह्मांकडे देविला असे, तरी सरसुभा प्रांत खानदेश येथील नेमणूकेपैकीं स्वार व कारकून पाठऊन सदरील पंचवीस हजार रुपये वसूल घेऊन सरकारांत पावते करून जाब घेणें, याप्रमाणें फडशा न पडे तरी रामचंद्र कृष्ण भुसकुटे यांचे विद्यमानें तोडजोडीमुळें निदान पंधरा हजार रुपये ठरावांत आणून, फडशा करून घेणें ह्मणोन.

सनद १.

सदरील अन्वयें भारतशहा हटियाराय यांस कीं, पंचवीस हजार रुपये नारो कृष्ण यांजकडे देविले असेत, तरी देऊन कबज घेणें. सदरीलप्रमाणें ऐवज न दिल्यास तुह्मांकडे गांव चालतात त्या गांवापासून परभारा ऐवज घेतील ह्मणून. सनद.

---

२

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दप्तर.

५९१–( १०४७ ) संवस्थान वासदें प्रांत गुजराथ, वीरसिंग यांजकडे चालत होतें. त्यास ते मृत्य पावले, त्याचे पोटीं पुत्रसंतान नाहीं, याजकरितां त्याचे सापत्न भाऊ तुह्मीं, सबब तुमचे नांवें संवस्थान करार करून द्यावें ह्मणोन, तुह्मांकडील जगुलाला यांणीं विनंति केली, त्याजवरून तुह्मीं त्याचे सापत्न भाऊ, यास्तव तुमचे नांवें संस्थान मजकूर करार करून देऊन, नजरेचा वगैरे ऐवज घ्यावयाचा करार केला आहे, त्याप्रमाणें ऐवजाचा भरणा सरकारांत करून, संवस्थानचा बंदोबस्त राखोन, सरकारांत रुजू राहोन, एकनिष्ठपणें वर्तणूक करीत जाणें ह्मणोन, न्याहारसिंग राजे यांचे नांवें. सनद १.

इसन्ने तिसैन मया व अलफ सवाल १२

राजश्री गोविंदराम आपटे, कारकून निसबत दप्तर.

---

on condition of his assisting Government with his troops when required. He however failed to send troops. Náro Krishṇa of Khándesh was directed to recover Rs. 25,000 from him, and the Rájá was told that in case he failed to pay the amount it would be recovered from the villages direct

( 591 ) Virsing of Sansthán Wásade died without issue. His step-brother Nyáhársing having agreed to pay Nazaráṇá amounting in all to Rupees 29001, he was recognized as the ruler of the Sansthán. It was agreed that he should remit the amount due to Government from the Sansthán regularly and make suitable provision for the maintenance of Virsing's mother and widows.

A. D. 1791-92.

५९२–( १०५९ ) कमाविस भेट राजश्री राव यांसी, बाबत चेतसिंग राजे, श्री काशी, यांणीं पाठविली, ती नारायणराव वकील यांणीं आणून दिल्ही ती गुजारत जानाजी जावक खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

सलास तिसैन मया व अलफ सफर १९

| | | | |
|---|---|---|---|
| २० तिवट पैकीं | १ | ७५ मुसेजरी बुटेदार | १ |
| १२५ शालाफर्द | २ | ——— | ——— |
| २५ शेला साधा घुवट | १ | २९५ | ६ |
| ५० किमखाप | १ | | |

५९३–( १०७८ ) राजे भारतशा, संस्थान ममंडाई, यांजकडे तालुके मजकूर सरकार हांडेपैकीं, तपे जुनवण्या, व गोमगांव वगैरे चालत आहे, त्यास ते मृत्य पावले, पोटीं संतान नाहीं, सबब तपे मजकूर, व गांव वगैरे सरकारांत जप्त करून जप्ती रामचंद्र कृष्ण यांजकडे सांगितली असे, तरी मशारनिल्हेसीं रुजू होऊन अमल सुरळीत देणें ह्मणोन. जमीदार व मोकदम यांचे नांवें. सनदा.

अर्बा तिसैन मया व अलफ जिल्काद ८

१ तपे जुनवण्यापैकीं देहे बीतपशील.

| किता. | किता. |
|---|---|
| १ कसबे जुनवण्या मजरेसुद्धां. | १ मौजे डगांव खुर्द. |
| १ मौजे ढालेगांव बुद्रूख. | १ मौजे घागड्या खुर्द. |
| १ मौजे ढालेगांव खुर्द. | १ मौजे विश्रामपूर बुद्रूख. |
| १ मौजे बर्ड्यां बुद्रूख. | १ मौजे विश्रामपूर खुर्द. |
| १ मौजे सितली. | १ मौजे खुद्या. |
| १ (२)मौजे रामपुरा माकणपुरा. | १ मौजे मढीशेट. |
| १ मौजे बांदी. | १ मौजे जात्राखेडी. |
| १ मौजे महालीवाबगा. | १ मौजे पिपल्या उंद्र्या. |
| १ मौजे कोटाकुंड. | १ मौजे दयाळपूर. |
| १ मौजे पंढराव्या. | १ मौजे झिरण्या. |

---

**( 592 )** Presents were received from Chetsing Rájá of Benáres.
**A. D. 1792-93.**

**(593)** Rájá Bháratshahá of Sansthán Mamdai having died childless, the villages of Tapen Junwaṇyá, Gomgaum, &c. in Sarkár Háṇḍe enjoyed by him were attached.
**A. D. 179[illegible]**

१ मौजे मर्दानपूर. १ मौजे भटपुरा.

१२ ११

देहे २३

एकूण तेवीस देहे येथील अमल येविशीं मोकदमास. सनद.

१ तर्पे गोमगांव पैकीं देहे बीतपशील.

| किता. | किता. |
|---|---|
| १ कसबे गोमगांव. | १ मौजे कासीपुरा. |
| १ मौजे धनखार व कोटा. | १ मौजे आबखान. |
| १ मौजे दीपगांव. | १ मौजे खुटवल. |
| १ मौजे महेरागांव. | १ मौजे रतनपूर. |
| १ मौजे गावगवाळी. | १ मौजे नवलपूर. |
| १ मौजे रामपुरी. | १ मौजे घोगतपूर. |
| १ मौजे चौकी खुर्द. | १ मौजे जांबुलखान. |
| १ मौजे बाबव्या. | १ मौजे जावण्या. |
| ८ | ८ |

देहे १६

एकूण सोळा देहे येथील अमल येविशीं मोकदमास. सनद.

१ मौजे जाद्या, तर्फ संवताडा, व कसबे दीपगांव येथील अमल येविशीं मोकदमास. सनद.

१ तपे राळेगांव, पटाजण्या, व चौकी रेहेठ्याचे जकातीचा अमल व गड हवेलीपैकीं गाडी देहे ३९ एकूणचाळीस येथील अमल येविशीं जमीदारांस. सनद.

४

चार सनदा दिल्हया असेत.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून, निसबत दसर.

५९४–( १०९२ ) चंद्रसिंग, व भगवंतसिंग यांणीं हुजूर येऊन विनंति केली कीं,

( 594 ) Chandrasing and Bhagwantsing of Sansthán Budháwal

अर्बा तिसैन मया व अलफ जमादिलावल २

आपलें संस्थान बुधावल, दित्या भिल्लानें घेतलें. तें त्याजपासून सरकारांत घेतलें आहे, तें पेशजींप्रमाणें आह्मांकडे करार करून द्यावें, आज्ञा होईल ते समयीं सरकारचाकरीस येत जाऊं, ह्मणोन; त्याजवरून संवस्थान मजकूर सरकारांत जफ्तीस ठेविलें होतें, तें मोकळें करून, पूर्ववत्प्रमाणें उभयतांनीं संस्थान अनुभऊन, आज्ञा होईल ते समयीं सरकारचाकरीस येत जावें. याप्रमाणें करार करून, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी संवस्थान मजकूरचे गांव वगैरे जफ्तीस आहेत, त्यांची मोकळीक करून यांजकडे चालवणें ह्मणोन, नारायणराव यादव यांचे नांवें.

सनद १.

सदरील अन्वयें नारायणराव यादव कमावीसदार, परगणे नंदुरबार, व सुलतानपूर, दिंमत तुकोजी होलकर यांस कीं, संवस्थान मजकूरचा गिरास हरदू महालीं आहे तो मुदामत प्रमाणें चंद्रसिंग, व भगवंतसिंग यांजकडे देत जाणें ह्मणून. सनद १.

---

२

रसानगी यादी.

उभयतां संस्थानिक यांस हाजर जामीन राजाराम वलद गंगाराम शेट, वस्ती किल्ले कुकरमुंडे, यास हुजूर घेऊन जामीन कतबा छ. मजकूरच्या देण्याचे यादींत लाऊन ठेविला असे.

५९५-(११०३) राजे व्यंकटापा नाईक बहिरी बहाद्दर, संवस्थान सुरापूर, यांचे

अर्बा तिसैन मया व अलफ सवाल ६

नांवें सनद कीं, तुह्मांकडील सुबराव लक्ष्मीकांत, व गोविंद दासो, यांणीं हुजूर येऊन विनंति केली कीं, संवस्थान देवदुर्ग, किलीच नाईक याजकडे होतें, त्यास त्याचें नकल जाहालें. उपरांत त्याचे घरचा बंदा रंगापा नाईक संवस्थानची वहिवाट करूं लागला, त्यास किलीच नाईक याचे अफलाद वें-

---

A. D. 1793-94.

prayed that the Sansthán which was taken from them by Dityá Bhil, and from him by Government, might be restored to them on condition of their assisting Government with troops whenever required. Their prayer was granted.

(595) The Sansthán of Devadurg belonged to Kilich Naik. On his death the Sansthán was usurped by Rangappá Naik, his illegitimate son (बंदा) Rájá Vyankatapá Naik Bahiri Bahádur of Sansthán Surápur being a descendant of Kilich Naik in the female line attacked the Sansthán. Rangappá killed himself and the Sansthán fell into the hands of Rájá Venkatappá. He requested the Peshwá to recognize his claim to succeed to the Sansthán. His request was granted.

A. D. 1793-94.

कटापा नाईक असतां बंदा वहिवाट करितो, व संवस्थानाकडे याचा फसावा भारी जाहला, सबब सन इहिदे तिसैनांत कस्त मेहेनत करून, यांणीं संवस्थान हस्तगत केलें. रंगापा नाईक मुलांमाणसांसुद्धां दारू पसरून जळून मेला. याजकरितां संवस्थान मजकूर, वेंकटापा नाईक याजकडे करार करून दिल्हें पाहिजे ह्मणोन; त्याजवरोन मनास आणितां संवस्थानिकाचे नक्कल जहालें. तुह्मीं त्यांचे अफलाद व तुमचा फसावाहि त्याजकडे भारी जाहला, यामुळें तुह्मीं कस्त मेहेनत करून संवस्थान हस्तगत केलें, सबब तुह्मांकडे देवदुर्गचें संवस्थान करार करून दिल्हें असे, तरी सालाबाद सरकारचे स्वराज्याचे अमलाचा ऐवज वाजबी देऊन, सरकारासीं एकनिष्ठपणें राहून, संवस्थानची वहिवाट करीत जाणें ह्मणोन.

सनद १.

रसानगी याद.

५९६–( ११०७ ) राजे भारतशहा हटियाराय यांचे नांवें संवस्थान ममडाई, सरकार हांडे चालत होते, त्यास ते मृत्य पावले, पोटीं पुत्र नाहीं, सबब संवस्थान मजकूरची जप्ती सरकारांत करून कमावीस तुह्मांकडे सांगितली होती, त्यास हटियाराय याजकडील दुर्गादास भवानी हुजूर आले; त्यांणीं संवस्थान पेशजींप्रमाणें भारतशहा याचे चुलते राजे खंडणशहा हटियाराय यांजकडे करार करून द्यावें, ह्मणोन विनंति केली, त्याजवरून जप्ती मोकळी करून पेशजींप्रमाणें राजे खंडणशहा हटियाराय यांजकडे संवस्थान चालवण्याचा करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी शिबंदी वगैरे खर्च पडला असेल त्याची व जप्तीचा वसूल पडला असेल त्याची, व लुटीचे ऐवजाची रुजुवात सरकारांतून कारकून जाऊन करून आणील, त्याप्रमाणें समजोन फडशा केला जाईल. तुह्मीं संवस्थानाविशीं दखलगिरी न करणें ह्मणोन

अर्बा तिसैन मया व अलफ जिल्काद ५

रामचंद्र कृष्ण याचे नांवें सनद १.

येविशीं संस्थानानजीक तुह्मांकडील महाल आहेत. त्यास तुह्मीं आपलेकडील कमावीसदारास ताकीद करून संवस्थानास हरएकविशीं उपद्रव लागों न देणें ह्मणोन. सनदा.

१ रघोजी भोंसले सेना साहेब सुभा यांस.

१ दौलतराव शिंदे यांस.

२ तीन सनदा दिल्ह्या असेत.

३ रसानगी याद.

( 596 ) The Sansthán of Mamdai in Sirkár Hánde was attached owing to the death of Rájá Bháratshahá Hatiyáráya. It was now ordered to be restored to Khandanshahá uncle of the deceased.

A. D. 1793-94.

५९७–( १११३ ) दुर्जनसिंग राजे, संस्थान मांडवी यांचे नांवें सनद कीं, गुमानसिंग यांजकडे संस्थान मजकूरचा अधिकार होता, त्यास ते मृत्यु पावले, पोटीं पुत्र नाहीं, सबब त्यांणीं तुह्मांस दत्तकपुत्र घेतलें आहे, येविशीं सरकारचें अभय असावें ह्मणोन, तुह्मांकडील जीवनराम शिवलाल यांणीं हुजूर विनंति केली, त्याजवरून संस्थानावर नजर देऊन, तुह्मांवर कृपाळू होऊन, संस्थानचा अधिकार तुमचे नांवें करार करून दिल्हा असे, तरी तुह्मीं सरकारांत रुजू राहोन, संस्थानचा बंदोबस्त करून, सेवा एकनिष्ठेनें करीत जाणें. अभय असे ह्मणोन. सनद १.

खमस तिसैन मया व अलफ सफर १

परवानगी रूबरू.

---

# १. राजकीय.
## ( क ) देशातील बंडें.
### १ तोतया
### जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

५९८–( २५० ) महिपतराव कृष्ण, तालुके रत्नागिरी, यांचे नांवें सनद कीं, किल्ले मिरज येथें तोतया होता, तो तुह्मांकडे तालुके मजकुरीं पाठविला असे, त्यास तुह्मांपाशीं दाखल जाहल्यावर पक्या बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास शिधा मध्यम प्रतीचा देत जाणें ह्मणून. मशारनिल्हे यांस. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रमजान ३०

येविशीं वामनराव गोविंद यांस सनद कीं, तोतया डोलींत घालून, बरोबर रखवालीस प्यादे देऊन पक्या बंदोबस्तानें तालुके रत्नागिरीस पावता करून, पावल्याचें कबज घेणें. ह्मणून. १.

---

२.

परवानगी रूबरू, बाळाजी जनार्दन फडणीस छ. २५ साबान.

---

( 597 ) Gumánsing of Sansthán Mándwi having died, Durjansing his adopted son succeeded him. The latter requested Government to recognize his adoption and his succession to the Sansthán. His request was granted.

A. D. 1794-95.

[ 1 ] POLITICAL MATTERS.

( C ) Risings in the Country

( 1 ) By the Pretender ( continued )

( 598 ) The Pretender who was a prisoner at the fort Miraj was now transferred to Ratnágiri.

A. D. 1775-76.

५९९–( २९९ ) जैराम कृष्ण यांस सनद कीं, तुह्मीं विनंतिपत्र पहिले जमादिलाबलचें पाठविलें तें पावलें, लिहिला मजकूर सविस्तर विदित जाहला. तोतयाचे लोक हातलोटाचे घाटाखालीं आले आहेत, यास्तव किल्ले प्रतापगड येथील पोक्त भरती असावी, ह्मणोन लिहिलें. त्याजवरून दोनशें लोक ठेवावयाची आज्ञा केली असे, तरी चांगले दोनशें लोक पंचरूड ठेऊन बंदोबस्त किल्लेमजकूरचा चांगला करणें मसलत जाहल्यावर लोक दूर करणें ह्मणोन. सनद १.

सबा सबैन मया व अलफ जमादिलावल ४

परवानगी रूबरू.

६००–( ३०६ ) तोतयाकडे रत्नागिरीस जाऊन मिळाले आहेत येविशींचीं कलमें.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाकर २

बाबूराव मराठे वस्ती सिध्धेश्वर तालुके सिमावल, यास सरकारांतून धुळपाकडे पाठविला होता, तो रत्नागिरीस तोतयाकडे जाऊन, त्यास मिळोन, सरदारांचे बुद्धीस भ्रंश करून, बखेडा करित आहे, सबब त्याचीं मुलें माणसें कैद करून किल्ले अवचितगड येथें अटकेंत ठेवणें, व घर जप्त करून वस्तभाव जरावजरा सरकारांत लाऊन मोजदादीची यादी हुजूर पाठवणें. वरकड कोणी तिकडे गेले असतील, त्यांचा पत्ता लाऊन जप्ती करणें. अष्टमी येथील कुळकर्णी तेथें गेला आहे, त्याचा थांग लाऊन त्याचे घराची व मुलांमाणसांची जप्ती करणें कलम. १.

राघो जोशी यांचें घर भोरपेखालीं आहे, तो चिंतो विठ्ठल यांजकडे पेशजीं होता. व त्यांशीं जोशी तोतया घनगडास होता, तेव्हां त्याजकडे जात येत असे. देवभक्तीण ह्मातारी रत्नागिरीस गेली आहे. तिचा तो जांवई हल्लीं तोतयाकडे जाऊन राजपुरी प्रांतींचे वगैरे मराठे यांस पत्रें घेऊन आला आहे. त्याचा पत्ता लाऊन, युक्तीनें त्यास कैद करून, कागदपत्रसुद्धां हुजूर पाठवणें. घर जप्त करणें. फार बारकाईनें पत्ता लावणें तो लबाड आहे. कलम १.

एकूण दोन कलमें लिहिलीं आहेत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें करणें ह्मणोन, आबाजी बल्लाळ, व भास्कर महादेव तालुके अवचितगड यांस. सनद १.

परवानगी रूबरू.

---

( 599 ) The men of the Impostor having come below the Ghát of Hâtlot, the Kamávisdár Jayrám Krishṇa asked for reinforcements at fort Pratápgaḍ. He was permitted to enlist two hunderd additional men.

A. D. 1776-77.

( 600 ) Báburao Maráthe and Rágho Joshi were suspected of inducing Sardárs to join the standard of the Impostor who was at Ratnágiri. Their houses and property were ordered to be attached.

A. D. 1776-77.

६०१—( ३०७ ) गोविंदराव चिमाजी माणकर यास पत्र कीं, तुम्हीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. तोतयाकडील लोक महाडास आले, तिकडे कुलाबकर वगैरे लोक चाकरीस गेले आहेत, त्यांचे कबिले वगैरे जप्त करण्याचा मजकूर लिहिला तो कळला, त्याजवरून विसाजी केशव यास महाडास येण्याविशीं पत्रें सादर केलीं आहेत, त्यास आठ चार दिवस निघावयासी लागतसारीखे असल्यास, हजार दीड हजार माणूस तुम्हांकडे पत्र पावतांच पाठवणें म्हणोन मशारनिल्हेस लिहिलें आहे. ते तुम्हांकडे लोक रवाना करतील तुम्हीं त्यांस लेहून लोक लौकर आणावे, व सदाशिव पंडित सचिव यांजकडून भोरपें पैकीं वगैरे तीनशें माणूस तुम्हांकडे पाठवावयाविशीं त्यांस पत्र गेलं आहे. तुम्हीं त्यांजकडे कारकून पाठऊन लोक लौकर आणवणें. रामचंद्र महादेव याच्या भावा—पुतण्यानें तोतयासीं बेडी तोडून बंड उभें केलें. याजकरितां मशारनिल्हेस रत्नागिरीस पाठविलें होतें. ते जाऊन पाहून तेथील एक दोघे बंडाचे मिलाफू यांस सुचऊन तेथून निघोन येऊन, सरदारांस पत्रें लिहिलीं आहेत. त्याजवरून त्यांस लबाड ऐसे पकें समजलें. याउपरी तोतयास कोणी मिळणार नाहीं. हुजूरूनही पारिपत्याची पैरवी केली आहे. लौकरच बंड मोडेल. महाडास त्याचे लोक आहेत. तुम्हांजवळ जमात पडिल्यावर त्याचें पारिपत्य करणें. तिकडे लोक गेले आहेत, त्यांचीं मुलेंमाणसें जप्त करणें म्हणोन पत्र १.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाकर ३

परवानगी रूबरू.

६०२—( ३१९ ) बंसीधर परदेशी वस्ती कसबे मजकूर, याचे चार पांचशें गाडदी हल्लीं कोकणांत तोतयाकडे व कृष्णाजी लक्षुमण तोतयाकडून पुण्यांत येऊन, त्याचा माणूस अकोल्यास परदेशी मजकूर यास आणावयाविशीं तोतयाचीं पत्रें घेऊन गेला आहे. म्हणोन, हुजूर विदित जाहलें. त्यावरून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी परदेशी याचा बारकाईनें शोध लाऊन, घरीं चौकी बसऊन, त्यास व त्याचे मुलामाणसांस कैद करून, परदेशी याचे पायांत बिडी घालून,

सबा सबैन मया व अलफ जमादिलाकर २९

( 601 ) The men of the Impostor having come to Mahád, Govindrao Chimnáji Mánkar was directed to proceed against them. Visáji Keshav and the Pantsachiv were asked to send 1000 and 300 men respectively to assist Govindrao ( It is stated that the shackles of the Impostor were taken off by the brother and nephew of Rámchandra Mahádeo ).

A. D. 1776-77.

( 602 ) Government was informed that Banshidhar Pardeshi had sent 500 Gârdis to assist the Impostor in Konkan and that Krishnáji Laxman had come with letters from the Pretender to Banshidhar. Orders were issued for Banshi's arrest and for the arrest of his relations.

A. D. 1776-77.

अटकेंत ठेवणें. आणि पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देणें. घरांतील वस्तभावेची मोजदाद करून जाबता हुजूर पाठऊन देणें. हें काम आधीं फार जपोन करून बंसीधर यास हस्तगत बोभाट न होतां करून, पायांत बिडी घालून, जतन ठेवणें; आणि हुजूर लेहून पाठवणें ह्मणोन खंडो बाबूराव कमावीसदार परगणे अकोले याचे नांवें छ. १४ जमादिलाकर, परवानगी रूबरू. रसानगी, रामचंद्र महादेव परांजपे. सनद १.

६०३–( ३२० ) नारो रानडे हा तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब यांजकडे होता. तो कोकणांत तोतयाकडे जाऊन, आपले घरीं फलटणास येऊन, तेथून दोन तीनशें राऊत घेऊन, फिरोन तोतयाकडे जाणार ह्मणोन हुजूर विदित जाहलें. त्यास तुह्मीं बारकाईनें शोध लाऊन, मशारनिल्हेचे घरीं चौकी चांगली ठेवून, त्यास व त्याचे मुलामाणसांस पक्के बंदोबस्तानें अटकेंत ठेवणें; आणि वस्तभावेची मोजदाद करून जाबता हुजूर पाठवावा. त्याचीं घोडीं दहा पंधरा आहेत, तीं पुण्यास पाठऊन द्यावीं. तोतयाचें बंड कोकणांत जालें आहे. ते लबाड, तिकडे कोणी जाईल त्याचें घरदार जप्त केलें जाईल, अशी लोकांस निक्षूण ताकीद आपले महालांत करावी ह्मणोन, गुणाबाई निंबाळकर यांचे नांवें. सनद १.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाकर २९

छ. १४ जमादिलाकर परवानगी रूबरू. रसानगी, रामचंद्र महादेव परांजपे.

६०४–( ३३४ ) मौजे हुणशाल, परगणे गोकाक हा गांव देसाई यांजकडून व्यंकटराव नारायण घोरपडे, यांजकडे आहे, त्यास मशारनिल्हे तोतयास मिळाले, सबब मौजे मजकूरची जप्ती करून जप्तीची कमावीस तुह्मांकडे सांगितली असे. आकार होईल तो ऐवज सरकारांत पावता करून पावलियाचे जाब घेणें ह्मणोन, येसाजीराम याचे नांवें परवानगी रूबरू सनद १.

सबा सबैन मया व अलफ रमजान १२

येविशीं मोकदमाचे नांवें सनद १.



---

( 603 ) Government was informed that Náro Ránade who was with Dádásáheb had joined the Impostor and that he was now about to take 200 or 300 horsemen from Phaltaṇ to assist him. Saguṇábai Nimbálker was requested to keep him in confinement and to make it publicly known in her province that should any person join the Impostor, his house and property would be sequestrated.

A. D. 1776-77.

( 604 ) Vyankaṭrao Náráyaṇ Ghorpaḍe having joined the Impostor his village of Huṇshál in Parganá Gokák was attached.

A. D. 1776-77.

६०५–( ३३६ ) तोतया रत्नागिरीस अटकेंत होता, त्याणें फितूर करून किलेहायाचे लोकांची घालमेल केली होती, त्यास हल्लीं तोतयास कैद करून बाळाजी गोविंद यास फौजसुद्धां तालुकेहायचे बंदोबस्तास हुजुरून पाठविलें असेत, तरी किल्ले जकीरासुद्धां मशारनिल्हे यांचे स्वाधीन करून कबज घेणें, तुह्मांस उपसर्ग लागणार नाहीं. अभय असे ह्मणोन, किलेहायचे हवालदार, व कारकून, व सरदार यांचे नांवें दर किल्यास तीन तीन प्रमाणें. सनदा.

सबा सबैन मया व अलफ रमजान २०

१५ तालुके सुवर्णदुर्ग येथील किल्यास.

३ जंजिरे सुवर्णदुर्ग. ३ किल्ले मंडनगड.
३ किल्ले रसाळगड. ३ किल्ले सुमारगड.
३ किल्ले पानगड.

१२ तालुके अंजणवेल येथील किल्यास.

३ किल्ले अंजणवेल. ३ किल्ले विजयगड.
३ किल्ले गोविंदगड. ३ किल्ले बहिरगड.

१२ तालुके रत्नागिरी येथील किल्यास.

३ जंजिरे रत्नागिरीस. ३ किल्ले जयगड.
३ किल्ले महिपतगड यांस. ३ किल्ले पूर्णगड.

---

३९
१ बाळाजी गोविंद याचे नांवें सनद कीं, तालुके मजकूर येथील बंदोबस्त करणें ह्मणोन.

---

४० परवानगी रूबरू.

तोतया रत्नागिरीस अटकेंत होता, त्याणें फितूर करून तालुके देवगड येथील किल्याचे लोकांची घालमेल केली होती, त्यास हल्लीं तोतयास कैद करून बाळाजी गणेश यास तालुके मजकूर येथील बंदोबस्त पेशर्जीप्रमाणें हुजुरून सांगितला असे, तरी किल्ले जकीरासुद्धां मशारनिल्हे यांचे स्वाधीन करून कबज घेणें. तुह्मांस उपसर्ग लागणार नाहीं. अभय असे, ह्मणोन, किलेहायचे हवालदार, व कारकून, व सरदार यांचे नांवें दर किल्यास तीन तीन प्रमाणें. सनदा.

---

( 605 ) The Impostor while under imprisonment at Ratnágiri conspired to create disaffection among the men of some forts in the Konkan. He was now arrested and kept in confinement, and Báláji Govind was sent with an army to take charge of the forts in question. The officers of the forts were directed to surrender the forts to him.

A. D. 1776-77.

३ किल्ले देवगड.

३ किल्ले रामगड.

३ किल्ले भगवंतगड.

९

१ बाळाजी गणेश यास कीं, प्रांत कोंकण येथील तालुके सुवर्णदुर्ग, व अंजणवेल, व रत्नागिरी येथील बंदोबस्तास हुजुरून बाळाजी गोविंद यास फौजेसुद्धां पाठविले आहेत, त्याजकडे तालुके देवगड येथील किल्याचे हवालदार, व कारकून, व सरदार यांचे नांवें दर किल्यास तीनप्रमाणें सनदा पाठविल्या आहेत. ते तुह्मां-कडे पाठवितील. त्या घेऊन तालुके मजकूरचा बंदोबस्त करून हुजूर लेहून पा-ठवणें. ह्मणोन. सनद.

१० परवानगी रूबरू.

६०६–( ३४१ ) कोकणांत तोतयाचे पारिपत्यास तुह्मांस हुजुरून रवाना केले, त्यास त्याचे पारिपत्याकरितां हशमी लोक असामी २०० दोनशें असामी तुह्मांस ठेवावयाची आज्ञा केली असे, तरी सदरीलप्रमाणें दोनशें अ-सामी चांगले मर्द माणूस फारकरून बरकंदाज याप्रमाणें ठेवणें, आणि लोकांची हजिरी अंताजी रघुनाथ याजकडून घेवऊन हुजूर लिहिणें ह्मणोन बापूजी शिंदे याचे नांवें छ.५ रजब. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

परवानगी, राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस.

६०७–( ३४५ ) तालुके राजमाची येथील किल्यास कोळ्याचे दंग्यामुळें जाजती लोक साल गुदस्तां ठेविले होते. त्यांस कोळ्याचा बंदोबस्त जाला, सबब दूर करणें ह्मणोन, तुह्मांस सनद गेली होती परंतु तुह्मीं विनंति केली कीं कोक-णांत तोतयाची गडबड जाहली आहे, याजकरितां जाजती लोक ठेविले होते, त्याप्रमाणें किल्यास ठेवावयासी आज्ञा जाली ह्मणजे किल्याचा बंदोबस्त करून राहूं ह्मणोन त्याजवरून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी कोळ्याचे गडबडीमुळें बेहड्याचे नेमणुकेशिवाय जाजती लोक तुह्मीं ठेविले होते, त्याप्रमाणें हल्लीं तोतयाची गडबड कोंकण-

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

---

( 606 ) Bápuji Scindia was directed to proceed against the Impostor and was permitted to enlist 200 men for the purpose.
A. D. 1776-77.

( 607 ) The order previously issued for reducing the additional men employed at fort Rájmáchi was cancelled and the men were allowed to be retained as the insurrection raised in the Konkan by the Impostor had not yet subsided.
A. D. 1776-77.

प्रांतीं आहे; याजकरितां जदीद ठेवून रोजमरा सालगुदस्तां पावत होता, त्याप्रमाणें तालुके मजकूरपैकीं देऊन चाकरी घेत जाणें, तोतयाची गडबड वारल्यावर लोक दूर करणें, ह्मणोन, रामराव नारायण तालुके मजकूर यांचे नांवें. छ.२५ रजब. सनद १.

रसानगी यादी.

६०८—( ३४७ ) कर्यात मावळ किल्ले सिंहीगड येथील सरंजामास आहे, त्यास किल्ला तोतयाकडे गेला, सबब कर्यात मजकूरची जप्ती करून जप्तीची कमावीस तुह्मांस सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन आकार होईल तो सरकारांत पावता करित जाणें ह्मणोन, नारो बापूजी याचे नांवें. छ. ३० साबान. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

देशमुख, व देशपांडे कर्यात मजकूर यांस कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें ह्मणोन. १

२

बरहुकुम सनद पुरंधर.

६०९—( ३४९ ) राघोजी आंगरे वजारत महासरखेल याजकडील लोक तुह्मांबरोबर तोतयाचे पारपत्यास आहेत, त्यास अडशेरीपैकीं रुपये ३१०० एकतीसशें रुपये देविले असे, तरी पावते करणें ह्मणोन, भिवराव येशवंत याचे नांवें छ. १५ माहे रमजान. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

रसानगी यादी.

६१०—( ३५१ ) भिवराव येशवंत याचे नांवें सनद कीं, तुह्मांस तोतयाचे पारपत्यास बराबर फौज देऊन पाठविलें आहे, त्यास मसलत संमंधें कोंकणांत किल्यास वगैरे कौल सनदा पत्रें द्यावीं लागतील, याकरितां हुजुरूनची शिक्केकटार सामानसुद्धां बहिरजी बोडिगा व जानोजी पवार खिजमतगार

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

---

( 608 ) The fort of Sinhgad having fallen into the hands of the Impostor, Karyát Máwal, assigned for the support of the fort, was attached.

A. D. 1776-77.

( 609 ) Some men were sent by Rághoji Ângriá Vazárat Mahá Sarkhel to put down the Impostor. Their pay was given by Government.

A. D. 1776-77.

( 610 ) Bhivrao Yeshwant was sent with an army into Konkan to put down the Impostor. As it might be necessary from him to issue kowls or sanads to forts &c. the Mutálki seal was sent to him, and he was directed to keep it in charge of the same Khismatgár and to use it when required.

A. D. 1776-77.

जबराबर देऊन तुह्मांकडे पाठविली आहे. घेऊन मसलत संमंधें कागदपत्रावर सिके करीत जाणें; आणि याच खिजमतगाराजवळ बाळगावयासी देऊन सिकेकटार पावल्याचा जाब पाठवणें ह्मणोन. छ. १७ रमजान. सनद १.

६११–( ३५४ ) लक्ष्मण कृष्ण कोलटकर तोतयाबरोबर सांपडले आहेत, त्यांस तूर्त कुलाब्यास चांगला बंदोबस्त करून ठेवावे. पुढें येथून पत्र येईल तसें करावें. तूर्त तेथें ठेवावे. दोन माणसें, एक ब्राह्मण, बरोबर आहेत, त्यांसुद्धां ठेवावे ह्मणोन, राघोजी आंगरे वजारत महासरखेल यांस.

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

सनद १.

परवानगी रूबरू. छ. २८ रमजान.

६१२–( ३५५ ) शिवाजी बल्लाळ, व गोपाळ बल्लाळ केतकर यांचीं गुरेंढोरें, व वस्तभाव, व गल्ला तोतयाकडे, लोक फितुरांत मिळाले होते, त्यांनीं नेलें आहे, त्यास मशारनिल्हेचीं गुरें, व वस्तभाव ज्याजकडे ठिकाणीं लागेल, व ज्यांणीं परस्परें वस्तभाव नेवविली असेल, त्यांचीं घरें जप्त करावीं; आणि मशारनिल्हेचे वस्तभावेचा आकार करून पैका होईल तो यास देवणें. याचा पैका वसूल होई तोंपर्यंत दोन प्यादे देणें. फिरोन बोभाट येऊं न देणें ह्मणोन, विसाजी राम हवालदार, तर्फ अवचितगड याचे नांवें. चिटणिसी. पत्र.

सबा सबैन मया व अलफ जिल्काद ८

६१३–( ३५९ ) तर्फ बीरवाडी येथें सालमजकुरीं तोतयाची गडबड जाली, सबब सरकारच्या फौजा प्रांत मजकुरीं गेल्या, त्यामुळें मुलकाची तसनस जाली, त्याचे बंदोबस्ताचीं वगैरे कलमें बीतपशील.

सबा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

---

( 611 ) Rághoji Ângriá was directed to keep at Kolábá Laxman Krishna Kolatkar, found with the Impostor, till further orders.

A. D. 1776-77.

( 612 ) The cattle and other property belonging to Shiwáji Ballál & Gopál Ballál Ketkar were taken away by persons who were in conspiracy with the Impostor. It was ordered that the houses of these persons should be attached, that they should be punished, and that from out of the proceeds of their property the Ketkars might be reimbursed for the loss they had sustained.

A. D. 1776-77.

( 613 ) The following orders were issued to Táluká Birwádi.

A. D. 1776-77.

1 The Kamávisdár and the Darakdárs should honestly ascertain the damages caused in the Parganá by the movements of the

परगणा बीरवाडी येथील गांवगन्नाची पायमाली जाली आहे, त्याची चौकशी करून रयतीस मजुरा द्यावी लागेल ह्मणोन तुह्मीं विनंति केली, त्यास इमानें इतबारें तुह्मीं, व दरकदार मिळोन पायमालीची चौकशी करून जाबता गांवगन्नावार लेहून कारकुनाबरोबर हुजूर पाठवणें. पाहून आज्ञा करणें, ते केली जाईल. येणेंप्रमाणें. कलम १.

रखमाजी भोसले, व हुजूरचे लोक किल्ले मजकुरीं आहेत, सरभराई त्यांच्या सरोभारीयांकरितां त्यास हुजूर यावयाची आज्ञा असावी, ह्मणोन तुमची विनंति, त्यास हुजूरून लोक जातील त्यांस ठेवणें, आणि पहिल्या लोकांस यावयाची आज्ञा होईल त्याप्रमाणें किल्ले मजकुरींहून पाठवणें येणेंप्रमाणें. कलम १.

किल्ले मजकुरीं दारू व गोळा होता, त्यापैकीं तोतयाकडील लोकांनीं उतरून नेला आहे, त्यास सरदेची जागा, सबब किल्ले बीरवाडी शामलाचे सरदेची जागा नाजुक, तेथें लोकांचा भरणा असावा, ह्मणोन तुह्मीं विनंति केली, त्यास बेहज्याप्रमाणें लोक ठेवावे, जाजती ठेवावयाचे नाहींत. कामकाज विशेष पडिल्यास हुजूर ल्याहावें. कुमक पाठविली जाईल येणेंप्रमाणें. कलम १.

पर्जन्यकाळीं किल्ले मजकूरची तटबंदी दोनशें हात कोसळून पडली आहे, व चौबुर्जीचा बुरूज कोसळला आहे. त्याचे बंदिस्तीस दोन हजार रुपये अजमासें लागतील ह्मणोन तुमची विनंति, त्यास दोन हजार रुपयांपैकीं निमे एक हजार रुपयांत तर्फ मजकूरचे लोक तोतयाचे मिलाफी जाहले होते, त्यांपासून गुन्हेगारी घेऊन त्याऐवजीं सदरहू इमारत व तटबंदीचें काम करावें. येणेंप्रमाणें. कलम १.

तर्फ मजकुरीं ऐवजाच्या वराता जाल्या आहेत, देवसावंताचें लोकांची वरात मना

---

Government armies through the province for putting down the Impostor and report the loss sustained by each village. The question of granting remissions would then be considered.

1 No additional men should be entertained at the fort of Birwádi; should any contingency arise, assistance should be called for from the Huzur.

1 Rs. 1000 were sanctioned for the repairs of the rampart and one of the bastions. Another thousand required for the purpose should be recovered from the men in the fort by way of punishment for their defection to the cause of the Impostor.

1 The quantity of ammunition in the fort was taken away by the friends of the Impostor. Rs. 500 were sanctioned for the purchase of a new supply.

1 Out of the sanctioned strength at the fort, half the number should be selected by the officer, and the remaining half should be the nominees of Government.

नेमणूक कायमी असावी, म्हणून तुम्हीं विनंति केली त्यास दारूगोळा पांचशें रुपयांचा कमाविसीचे ऐवजीं खरेदी करून देणें. मजुरा पडेल येणेंप्रमाणें. कलम १.

खास बारदार जदीद दहा असामी ठेवावयाची आज्ञा असावी ह्मणोन विनंति केली, त्यास दहा असामी पहिल्या शिबंदींत ठेवणें. पहिले खासबारदार आठ असामी आहेत, त्यांचे तैनातेच्या शिरस्त्याप्रमाणें त्यांची तैनात करणें. कलम १.

किल्ले मजकुरीं हुजूरचे लोक आहेत, त्यांस पेशजींचे नेमणुकीपैकीं निमे लोक तुम्हीं आपले मार्फतीचे ठेविल्यावर, हुजूरचे लोक आहेत त्यांपैकीं नेमणुकेप्रमाणें निमे नेमणुकीचे भरतीस ठेवून, बाकी जाजती होतील त्यांस हुजूर रवाना करणें येणेंप्रमाणें. कलम १.

करावी, ह्मणोन तुमची विनंति, त्यास वराता पहिल्या जाहल्या आहेत त्यांस ऐवज द्यावा. मामलत तुह्मांकडे बहाल जाली, सबब दुसऱ्या वराता होणार नाहीं. येणेंप्रमाणें करार. कलम १.

किल्ले मजकुरीं पेशजींचे नेमणुकेप्रमाणें लोक ठेवावयाचे, त्यास निमे लोक इतबारी चांगले तुम्हीं आपले निशेचे, देशचे, मावळचे ठेवणें. त्यांचा शेरा सरासरी दरमहा रुपये सहा प्रमाणें, दसमाही शिरस्तेप्रमाणें करणें; आणि जामीन साकळी करून लेहून हुजूर पाठवणें. नेमणुकेपैकीं निमे लोक राहिले ते हुजूरचे पाठविले जातील. येणेंप्रमाणें. कलम १.

एकूण नऊ कलमें करार करून दिलीं असेत. सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, बाबूराव पासलकर याचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

६१४–( ३६१ ) नारो महादेव रिसबूड तोतयाचे फितुरांत होते, यास्तव त्यांस बेडी घालून किल्ले चाकण येथें अटकेस ठेविले आहेत, त्यांचा वृद्धापकाळ जाला आहे, ह्मणोन धोंडो नारायण यांणीं हुजूर विनंति केली, त्यावरून तोतया संबंधें अन्याय माफ करून फंदफितुराविशीं रामचंद्र बल्लाळ मोडक यांस जामीन घेऊन हें पत्र सादर केलें असे, तरी मशारनिल्हेची बेडी तोडून त्यांस रामचंद्र बल्लाळ यांचे स्वाधीन करणें ह्मणोन नारायणराव कृष्ण किल्ले चाकण यांस सनद १.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज १३

रसानगी यादी.

---

( 614 ) Náro Mahádeo Risbuḍ was sent to prison for conspiring with the Impostor. In consideration of his old age orders were issued that he should be released on his furnishing security.

A. D. 1776-77.

६१५—( २६२ ) किले सिंहगड येथील लोक फितुरांत मिळोन किल्ला तोतयाकडे दिल्हा, तो तुह्मीं सरकारांत घेतला आहे. त्यास हल्लीं किले मजकूर जनार्दन आपाजी याजकडे देविला असे, तरी जकीरासुद्धां मशारनिल्हेचे हवालीं करून कबज घेणें ह्मणोन, तुकोजी होळकर याचे नांवें.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज १९

सनद १.

रसानगी यादी.

६१६—( ३७७ ) ह्या महिन्यांत कोकणांतील पुष्कळ कामगार, दरकदार, जमीनदार, व घाटावरील मुलखांतीलही कांहीं लोक तोतयाकडे मिळाले होते, असें ह्या महिन्यांततील रोजकीर्दीवरून दिसतें.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज

६१७—( ३८१ ) कोंकणतालुक्यांत तोतयाचे पारपत्यास फौजा उतरल्या होत्या, त्याजमुळें रयतेची शेताभाताची तसनस झाली आहे, याजमुळें सारेच तालुक्यांत रयतीस बोलावयास निमित्य होईल. तेव्हां सरकारचे नुकसानीचा जाबसाल याजकरितां तालुक्यातालुक्यास चांगले कारकून जलदीनें शेतेंभातें आहेत तों पाठऊन, त्यांजकडून चौकशी करऊन, कोणते तालुक्यांत कोणा रयतीचा किती माल खराब जाहला, तो तमाम आकारून आणावा. बाकीचा माल रयतीचे जिम्मेस तालुकदाराचे विद्यमानें लावून द्यावा, ह्मणजे सरकारची जमा यथास्थित आकारेल, याकरितां ये गोष्टीची पैरवी आधीं करून कारकून तालुकियास पाठऊन चौकशी जलदीनें करणें. राजश्री बाजी गोविंद यांसही याच अन्वयें लिहिलें आहे, तरी लिहिल्याप्रमाणें करणें ह्मणोन, विसाजी केशव सरसुभा प्रांत कोंकण याचे नांवें छ. १३ सवाल.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

सनद १.

परवानगी रूबरू.

---

**( 615 )** Tukoji Holkar having retaken the fort of Sinhgad from the Impostor, it was entrusted to the care of Janárdan Appáji.

A. D. 1776-77.

**( 616 )** The diaries of this month show that many officers, Darakdárs, Jamidárs in Konkan, and also some in the territory above the Ghauts had gone over to the Impostor.

A. D. 1776-77.

**( 617 )** Owing to the movements of the armies sent into Konkan for putting down the Impostor, the rayats had suffered damage in some cases. To prevent people from urging false claims to remissions on this account, the Sarsubhá was directed to send experienced Kárkoons to the several Tálukás in his charge at an early date, to have the damage assessed by them while the crops were standing.

A. D. 1776-77.

६१८—( ३८३ ) वेंकटराव नारायण घोरपडे तोतयाकडे गेले, सबब मशारनिल्हेकडे महालनिहाय पैकीं गांव वगैरे आहेत, त्यांची जसी सरकारांत करून जसीची कमावीस तुम्हांस सांगितली असे, त्याची जसी करावयाविशींची कलमें.

सबा सबैन
मया व अलफ
जिल्हेज २९

महालनिहाय येथील गांव बीतपशील.

७ प्रांत मिरज पैकीं देहे.
- १ मौजे आरगर कर्यात बेडग.
- १ मौजे करोली.
- १ कसबे बेडग कर्यात मजकूर.
- १ कजबे मौजे राजुरी.
- १ मौजे टांकळी.
- १ मौजे सुलकुंडें.
- १ मौजे इतलकर्जी.

७

२ परगणापैकीं.
- १ मौजे कट.
- १ मौजे रांगोळी.

२

२ परगणे हुकेरीपैकीं देहे.
- १ मौजे सिपूर.
- १ बहिरसवाडी.

२

१ मौजे सिंदवड प्रांत कागल.

२ परगणे रायबागपैकीं देहे.
- १ मौजे नांदणी.
- १ मौजे सिराढोण.

२

१ मौजे हुणसालपैकीं गोकाक.

१ मौजे वोतूर, परगणे आजरें.

१६

सोळा गांव एकूण. कलम १.

प्रांत मिरज येथील देशमुखी मशारनिल्हेकडे आहे, त्याचा हक्क व इनाम वगैरे. कलम १.

परगणे आजरेंपैकीं मशारनिल्हेकडे गांव आहेत, ते चौकशीनें किती ते मनास आणून त्यांची जसी करणें. कलम १.

एकूण तीन कलमांची जसी सदरहू लिहिल्याप्रमाणें करून इमानेंइतबारें वर्तोन, सदरहूचा आकार होइल तो सरकारांत पावता करून जाब घेत जाणें म्हणोन, लक्ष्मण वेंकाजी कारकून शिलेदार याचे नांवें. छ. १४, सवाल. सनद १.

मोकदम देहाये सदरहू गांवचे यांस कीं मशारनिल्हेसी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें म्हणोन. सनदा १६.

(618) Vyankatrao Náráyan Ghorpade having joined the Impostor, his villages in several mahâls were ordered to be attached.

A. D. 1776-77.

प्रांत मिरज येथील देशमुखी मशारनिल्हेची आहे, ती जप्त करून जप्तीची कमावीस यांजकडे सांगितली येविशीं. सनदा २.

१ पांडुरंगराव गोविंद यास कीं देशमुखी संमंधें हक, व इनामें वगैरे जें असेल, त्याचा वसूल मशारनिल्हेकडे देववणें ह्मणोन. सनद.

१ तिमाजी भिकाजी यांस कीं, मशारनिल्हे देशमुखीचा अंमल करतील. तुह्मीं दख-लगिरी न करणें ह्मणोन. सनद.

---

२

जमीदार परगणें आजरें यांस कीं, परगणे मजकूरपैकीं मशारनिल्हेकडे गांव आहेत, त्यांची जप्ती करून जप्तीची कमावीस यांजकडे सांगितली असे, तरी मशारनिल्हेसी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें, ह्मणोन. सनद १.

सदरहू अन्वयें कीं मशारनिल्हेकडील जप्ती करून जप्तीची कमावीस यांजकडे सांगि-तली असे, तरी तुह्मीं आपलेकडील एक सरदार जमाव फौजासुद्धां पाठऊन सरकारच्या अलाहिदा सनदा सादर जाहल्या आहेत, त्याप्रमाणें ठाणीं, व गांव घेऊन मशारनिल्हेचे स्वाधीन करणें. सदरहू ठाण्याचे व गांवचे अमलांत कोणी दिलेल करतील त्यांस तंबी पो-होंचऊन अंमल सुरळीत घेऊन देणें. हरएकविशीं मशारनिल्हे तुह्मांस लिहित जातील त्याप्र-माणें साहित्य करित जाणें ह्मणोन. सनदा २.

१ परशराम रामचंद्र यांस.

१ रामचंद्र गणेश यांस.

---

२ २२

बावीस सनदा दिल्या आहेत. परवानगी रूबरू.

६१९–( ३८४ ) कोंकणप्रांतीं तोतयानें दंगा केला, त्याचें पारिपत्य करून किल्ले सर

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

करावयाबद्दल सरकारच्या फौजा घांटाखालीं उतरल्या ते दहशतीनें रयत उठोन गेली. पुढें किल्ले सरकारांत सर जाहालीयावर रयतीस सुभाहून कौल देऊन वसाहत होऊं लागली. तो सरकारचे रावतांनीं

(619) Armies having marched in Konkan to put down the Impostor and to gain back the forts taken by him, the rayats of Pránt Rájpuri absconded after the conquest of the fort.

A. D. 1776-77.

Kowls were issued by the Subhá and people began to return. Some horsemen of Government however having caused some damage in one or two Turfs in the province, the rayats thereof lost confidence and could not be induced to take to cultivation without an assuarance from Govern-

गोरेगांव वगैरे प्रांत मजकूरच्या एक दोन तर्फांत कांहीं तसनस केली, याजमुळें रयतीस भरंवसा पुरत नाहीं. यास्तव हुजुरून कौल सादर जाहली—या[स] वसाहत होऊन सालमजकूरचे पिकाची आळेपणी करून पेस्तर सालची कीर्द आबादी करतील ह्मणून तुमचे बाबे जयराम त्रिंबक यांणीं हुजूर विनंतीपत्र पाठविलें, याजवरून तुमचे हरद्र ध्यानास आणून हें अभयपत्र सादर केलें असे, तरी तुह्मीं बेवसवसापणें आपले गांवीं गुरेंढोरें बस्तभाव सुद्धां येऊन, वसाहत करून, सालमजकूरचे पिकांची आळेपणी करून, पेस्तर सालची कीर्द आबादी करणें. सालमजकुरीं शेताची खराबी जाहली असेल, त्याची चौकशी करून, जीवन पाहून, जमाबंदी करून निभावणी केली जाईल, रयतीस कोणेविशीं उपसर्ग देउं नये ह्मणून, सरकारचे सरदारास आज्ञापत्रें सादर जालीं आहेत. याउपरी या प्रांतीं सरकारच्या फौजा येऊन उपद्रव लागणार नाहीं. कोणेविशीं वसवसा न धरणें. अभय असे ह्मणोन, रयान देहाय

प्रांत राजपुरी मामलेदार याचे नांवें. छ. १८ जाव. कौल १.

संदरहूअन्वयें जयराम त्रिंबक याचे नांवें. सनद १.

२

परवानगी रूबरू.

६२०–( ३८९ ) वेदशास्त्र दादंभट लिमये तोतयाचे प्रकरणांत होते. त्यास हुजूर पुण्यास पाठऊन देणें, ह्मणून पेशजीं तुह्मांस पत्र सादर केलें आहे. त्यास त्याजकडे बाजी गोविंद यांणीं सरकारांत गुन्हेगारीचे पहिल्यानें पांच हजार रुपये, व मागाहून दुसरे पुणीयास नेऊं नये येविशींचे पांच हजार, एकूण दहा हजार रुपये करार केले. त्यास मुदती रुपये.

सबा सबैन मया व अलफ. जिल्हेज २९

५००० एका महिन्यानें.
५००० दोहो महिन्यांनीं.

१००००

एकूण दहा हजार रुपये घ्यावयाचे केले आहेत, त्यास भटजीपासून पका जामीन घेऊन

---

ment. A letter of assuarance was therefore sent, and people were informed that no further damage would be caused by the armies of Government.

( 620 ) Dádambhat Limaye being implicated in the conspiracy of the Impostor, Báji Govind fined him first in the sum of Rs. 5000, and afterwards in the same amount for excusing his attendance at Poona. The levy of the amount was sanctioned and it was ordered that the amount should be sent to Poona.

A. D. 1776-77.

घरीं राहूं देणें; आणि सदरहू मुदतीप्रमाणें ऐवज वसूल करून हुजूर पुणीयास पाठऊन देणें ह्मणोन, सदाशिव केशव तालुके रत्नागिरी याचे नांवें. छ. २५ सवाल. सनद १.

मशारनिल्हेचे नांवें सनद कीं, अंजणवेल, सुवर्णदुर्ग, या दोहों तालुक्यांत तोतयाकडील हरामखोर लोक आहेत. त्यांची चौकशी मोरो हरी यांस सांगितली आहे, तरी शंभर माणूस तालुके रत्नागिरी पैकीं मशारनिल्हेकडे पाठऊन देणें ह्मणोन. सनद १

---

२

६२१–( ३९१ ) सदाशिव केशव, तर्फ रत्नागिरी यांचे नांवें सनद कीं, तोतयाचे कुळांतील सखाराम केशव याणें जमाव करून देवगड तालुक्यांतील रामगड बळकाऊन होता. त्याचें पारिपत्य बाळाजी गणेश यांणीं करून कैदेंत ठेविला आहे. तो तुह्मांकडे पाठवावयाची आज्ञा केली असे, तरी मशारनिल्हे त्यांस तुह्मांकडे पाठवितील तो बेडी मुद्धां अटकेंत तालुके मजकुरीं बिकट किल्ला असेल तेथें पक्के बंदोबस्तानें ठेऊन चांगला राखणें. पोटास शेर पीठ नागलीचें देत जाणें ह्मणोन. छ. २९ सवाल. सनद १.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

परवानगी रूबरू.

६२२–( ३९३ ) सुखनिधान तोतया पतित कोकणांत जंजिरे रत्नागिरीस अटकेंत होता, त्यास तेथील कमावीसदार याजकडील कारकून शिवाजी आपाजी वगैरे ब्राह्मण मिळोन तोतयाची बेडी तोडून कोंकणामध्यें दंगा मांडला. त्याजवरून हुजूरून फौज पाठऊन, तोतयास व त्याचे मिलाफी शिवाजी आपाजी वगैरे होते, ते धरून आणून, त्यांचीं पारिपत्यें केलीं. परंतु तोतयाकडे कोंकणांतील व देशांतील जागाजागाचे ब्राह्मण गेले होते त्यांचा शोध करून, ज्यांणीं तोतयाचे पंक्तीस प्रत्यक्ष अन्नव्यवहार केले असतील, त्यांजला व तोतयाची श्रावणी ज्या ब्राह्मणांनीं

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

---

(621) Sakhárám Keshav, a confederate of the Impostor, who collected some men and took the fort of Rámgad in Turf Deogad, was arrested by Báláji Ganesh and imprisoned. He was sent to the officer of Ratnágiri and the latter was directed to keep him in an inaccessible place and to arrange for his safe custody.

A. D. 1776-77.

(622) Sukhnidhán Impostor while in prison at fort Ratnágiri was joined by Siwáji Appáji and others, Brahmin Kárkuns of the Kamáwisdár. They removed his chains and raised an insurrection. An army was sent against them and they together with the Impostor were punished. Instructions were now issued for excommunicating all who messed with the Impostor or who

A. D. 1776-77.

केली ते, व श्राद्धपक्षाचा क्षण ज्यांणीं घेतला आहे, त्या ब्राह्मणांस तूर्त प्रायश्चित्त द्यावयाचें नाहीं. त्यांणीं कोणाचे पंक्तीस अन्नव्यवहार केले असतील त्यांस व त्यांचे संसर्गीयांस यथोक्त प्रायश्चित्त मार्गशीर्ष कृष्ण चतुर्दशीस देऊन शुद्ध करावें. याप्रमाणें निश्चय करून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी येविशींचा शोध तालुके मजकुरीं करून, ज्यांणीं पतित तोतयाचे पंक्तीस प्रत्यक्ष अन्नव्यवहार केले असतील, त्यांणीं व तोतयाची श्रावणी ज्या ब्राह्मणांनीं केली, व श्राद्धपक्षाचा क्षण ज्यांनीं घेतला आहे. त्या ब्रह्मणांनीं कोणाचे पंक्तीस व त्यांचे पंक्तीस कोणी ते शुद्ध होत तोंपर्यंत अन्नव्यवहार करूं नयेत. याप्रमाणें ताकीद करून वरकड संसर्गीयांसी मार्गशीर्ष वद्य चतुर्दशीस प्रायश्चित्त द्यावयाचीं कलमें. बीतपसील.

पतितपंक्तीस प्रत्यक्ष जेवले, त्यांचे पंक्तीस ज्यांणीं अन्नव्यवहार केला असेल.

एक वेळ केला असेल, त्यास अर्धप्राजापत्य प्रायश्चित्त. कलम १.

बहुत वेळां केला असेल त्यास मुंडणपूर्वक प्राजापत्य प्रायश्चित्त. कलम १.

पतितपंक्तीस जेवले त्यांची पंक्ति ज्यांस जाली असेल त्यांस.

एक वेळ पंक्ति जाली त्यांची पंक्ति ज्यास एकच वेळ जाहली असेल त्याजला उपोषणपूर्वक पंचगव्य; व बहुत वेळ जाहली असेल त्यास पादप्राजापत्य प्रायश्चित्त. कलम १.

बहुत वेळां पंक्ति जाहली त्यांची पंक्ति एक वेळ ज्यांस जाहली असेल, त्यांस पादप्राजापत्य प्रायश्चित्त; व बहुत वेळां जाहली असेल त्यांस अर्धप्राजापत्य प्रायश्चित्त. कलम १.

सदरहूचे संसर्गी असतील त्यांस पंचगव्य. कलम १.

येणेंप्रमाणें यथाशक्ति प्रायश्चित्त देऊन शुद्ध करवणें; आणि शुद्ध केल्याचें वर्तमान, व याखेरीज ज्याकडे दोष बहुत असोन थोडका, ऐसें मिथ्या बोलोन पंचगव्य घेतलें असें ह्मणोन, अगर त्याप्रमाणें बोलोन. घेईल. त्याजपासून गुन्हेगारी सरकारांत घेऊन, त्याची नांवनिशी हुजूर लिहून पाठविणें. सर्वत्र प्रायश्चित्त एकेच दिवशीं सदरहू तिथीस द्यावयाचा निश्चय केला असे, तरी सदरहू लिहिल्या तिथीस प्रायश्चित्त घेवणें ह्मणोन मामलेदारास चिटणिसी. पत्रें.

१ प्रांत कल्याण भिंवडी निसबत रामचंद्र कृष्ण यांस.

१ दुर्गोजी शिंदे किल्ले माहुली यांस.

---

officiated as priests at his *Shrvání* or *Shrá dha* ceremonies. Those who had dined with the persons above referred to were also excommunicated but were to be admitted into the caste on the performance of certain penances, which were specified. A date was fixed for the performance of these penances. Sanads were issued to the officers of all the mahâls to give effect to these instructions.

१ प्रांत वसई निसबत विसाजी केशव यांस.
१ प्रांत बेलापूर निसबत बाजी गंगाधर.
१ प्रांत कर्नाळा व तर्फ अटगांव निसबत आनंदराव राम यांस.
१ तालुके अवचितगड निसबत आबाजी बल्लाळ, व भास्कर महादेव.
१ राघोजी आंगरे वजारत महासरखेल यांस.
१ तर्फ रेवदंडा निसबत आनंदराव शिंदे यांस.
१ जयराम त्रिंबक यांस, प्रांत राजपुरी येथील प्रायश्चित्ताविशीं.
१ तालुके रायगड निसबत गणपतराव कृष्ण यांस.
१ तर्फ सुवर्णदुर्ग निसबत मोरो बापूजी यांस.
१ तर्फ अंजणवेल निसबत कृष्णाजी विश्वनाथ यांस.
१ तालुके रत्नागिरी निसबत सदाशिव केशव यांस.
१ तर्फ विजयदुर्ग निसबत गंगाधर गोविंद यांस.
१ सुभा आरमार निसबत आनंदराव धुळप यांस.
१ तालुके देवगड निसबत बाळाजी गणेश यांस.
१ प्रांत मिरज निसबत पांडुरंगराव गोविंद यास.
२ तालुके त्रिंबक देखील जवार तालुका मिळोन. पत्रें.
 १ धोंडो महादेव यांस.
 १ समस्त ब्राह्मण वास्तव्य त्रिंबक यांस.

---

२

१ मामले कोहज निसबत भिकाजी गोविंद यांस.
१ परगणा वाई निसबत भवानी शंकर हैबतराव.
१ कृष्णराव अनंत मुक्काम सातारा यांस.
१ मामले पाली निसबत माधवराव राम यांस.
१ परशराम रामचंद्र यांस, चिकोडी तालुक्याविशीं.
१ केसो बाबाजी यांस, जानोली तालुक्याविशीं.
१ तर्फ उंदेरी निसबत राणोजी बलकवडे यांस.
१ प्रांत जुन्नर निसबत रामराव त्रिंबक यांस.
१ तर्फ पटा निसबत बालकृष्ण केशव यांस.
१ प्रांत कराड निसबत श्रीनिवास शामराव यांस.
१ तालुके नेरळ निसबत राघो नारायण यांस.
१ तर्फ कायनई निसबत परशराम त्रिंबक यांस.

१ श्री देवस्थान चिंचवड यांस.

८ समस्त ब्राह्मण क्षेत्रस्थ यांस. पत्रें.

१ क्षेत्र नाशीक. १ क्षेत्र माहुली.

१ श्री शंभुमहादेव. १ क्षेत्र वोझर.

१ क्षेत्र पुणतांबें. १ क्षेत्र कराड.

१ क्षेत्र वाई. ——

१ क्षेत्र करवीर. ८

१ बाबूराव सदाशिव परगणे बारामतीविशीं.

१ सदाशिव पंडित सचीव यांस.

१ खेम सावंत भोसले वाडीकर यांस.

१ सुबराव पंडित यांस.

१ श्रीनिवास पंडित प्रतिनिधी यांस.

३ लष्करांत स्वारीस आहेत त्यांस. पत्रें.

१ बाजी गोविंद यांस.

१ रामचंद्र गणेश यांस.

१ भिवराव येशवंत यांस.

——

३

१ आबाजी पंडित यांस, तर्फ विशालगड येथील प्रायश्चित्ताविशीं.

१ बाळकृष्ण महादेव कमावीसदार परगणे नेवासें, फौर महाल, निसबत रामचंद्र नारायण यांस.

१ परगणे कर्डे रांजणगांव निसबत बाबूराव माणकेश्वर यांस.

१ परगणे कोडील निसबत गोविंदराम यांस.

१ मालोजी नाईक निंबाळकर फलटणकर यांस.

१ किल्ले प्रतापगड निसबत जैराम कृष्ण यांस.

२ मोरो विश्वनाथ यांचें नांवें.

१ तर्फ कलानिधी.

१ किल्ले दातेगड.

——

२

१ परगणे पारनेर निसबत महादाजी नारायण.

१ तालुके नगर निसबत विठ्ठल नारायण.

१ प्रांत पुणें निसबत रामचंद्र नारायण.

१ श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी करवीर यांसी.

५ समस्त ब्राह्मण क्षेत्रस्थ यांस. पत्रें.

१ क्षेत्र परशराम.

१ क्षेत्र धोम.

१ क्षेत्रें टोकें, व कायगांव, व प्रवरासंगम.

१ क्षेत्र महाबळेश्वर.

१ हरिहरेश्वर.

---

५

१ परशराम रामचंद्र यांस लष्करांतील प्रायश्चित्ताविशीं.

२६ समस्त ब्राह्मण क्षेत्रस्थ यांस. पत्रें.

१ क्षेत्र थेऊर.

१ कसबे सासवड.

१ जेजुरी.

१ कसबे शिरवळ.

१ दिवे, व श्रीवर्धन.

१ कसबे वामोरी.

१ क्षेत्र पंढरपूर.

१ बावधन प्रांत वाई.

१ कसबे सातारे.

१ कसबे निंब प्रांत वाई.

१ प्रांत गंगापूर.

१ कसबे पाटण.

१ बूध.

१ कसबे खेड.

१ कसबे पाली.

१ चास.

१ तारळें.

१ कसबे भोर.

१ फलटण.

१ मौजे मेणवली प्रांत वाई.

१ अष्टागर प्रांत चेऊल.

१ कसबे तळेगांव.

१ वडूथ.

१ प्रांत जुन्नर.

१ संगमनेर.

१ उकसाण.

---

२६

१ तर्फ बीरवाडी निसबत बाबूराव पासलकर.

१ तर्फ शिवनेर निसबत उद्धो विरेश्वर.

१ आत्माराम रघुनाथ दिंमत सचिव मोरप० तर्फविशीं.

१ रामचंद्र शिवाजी परगणे वडरें.

१ परगणे सुपें निसबत आनंदराव त्रिंबक.

२ समस्त ब्राह्मणांचे नांवें.

१ क्षेत्र नरसिंहपूर.

१ कसबे इंदापूर.

---

२

१ परगणे इंदापूर निसबत गोपाळ भगवंत.

छ. १० जिल्काद.

---

१०१ (१००)

६२३–( ३९६ ) तोतयाकडील लोक किल्ले सिंहीगडावर होते, ते तुकोजी होळकर यांचे मार्फतीनें सरकारांत बोलोन किल्ला हवाला केला, त्याविशीं छ.२३ जिल्कादि चिटणिसी. पत्रें.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

१६ लोकांचे नांवें अभयपत्रें कीं, तुह्मीं हुजूर येऊन रुजू जाहालेत, सबब तुम्हांस पत्रें सादर केलीं असेत, तरी तुह्मीं आपले गावीं जाऊन घरीं सुखरूप राहणें कोणेविशीं उपसर्ग लागणार नाहीं ह्मणोन. पत्रें.

१ रामजी नाईक सिवलकर कसबे पावस तर्फ रत्नागिरी यांस.

१ गणोजी नाईक गोळपकर तर्फ रत्नागिरी यांस.

१ चांद सावंत वस्ती दिवली तर्फ अंजणवेल.

१ बाळाजी हरी केळकर.

१ हिरोजी सिर्के, वस्ती कुडप तालुके अंजणवेल.

१ सदाशिव काशी वस्ती मौजे बोरपाडळ.

१ बाळाजी कोकणराव चव्हाण, वस्ती कळंबुसी तर्फ सोंदल, तर्फ अंजणवेल.

१ बाळाजी नाईक भोई, वस्ती वेळजलें, तर्फ देवळें महाल तालुके रत्नागिरी, ब्राह्मण असामीसुद्धां.

१ रामचंद्र बाबूराव वस्ती वडझीरें, तर्फ कडें.

१ खेरा सिंपी आसामी २०.

१ कमालखान सिंपी असामी पंचवीस एकूण.

( 623 ) Letters promising immunity from punishment were granted to the men of fort Sinhgad, who had joined the Impostor, but who afterwards handed back the fort to Government through the inspection intervention of Tukoji Holkar. They were permitted to repair to their homes, and orders were issued for their houses and property being restored to them.

A.D. 1776-77.

१ हरूनखान, असामी ४५.
१ गोविंद हरी बिडबलकर, वस्ती तर्फ देवगड.
१ गोविंद कानो वस्ती वरवडें, तर्फ देवगड, लोकसुद्धां.
१ हैबतराव शिंदे व जनापा शिंदे वस्ती कणेरखेड यांस.
१ लिंगोरुद्र.

---

१६

पत्रावर बार केले नाहीं, दाखल्यास लिहून ठेवली असेत.

६ मामलेदारांस पत्र कीं, लोकांस आपले घरास जावयास निरोप दिल्हा असे, तरी घरांची वगैरे जप्ती केली असल्यास, मोकळी करून वस्तभाव यांची यांस माघारी देणें. कोणेविशीं तोसीस न करणें ह्मणोन. पत्रें.

१ कृष्णाजी विश्वनाथ, तर्फ अंजणवेल यांसी, चांद सावंत याविशीं.
३ सदाशिव केशव, तर्फ रत्नागिरी याचे नांवें.
 १ रामजी नाईक सिवलकर वस्ती पांवस.
 १ गणोजी नाईक गोळपकर.
 १ बाबाजी वलद भोई.

---

३

१ खेम सावंत भोसले सरदेसाई मामले कुडाळे, वगैरे महाल यांस, हरूनखान लोक सुद्धां याविशीं.
१ बाळाजी गणेश, तर्फ देवगड यांस गोविंद हरी बिसवलकर याविशीं.

---

६

१ हवालदार व कारकून किल्ले मदनगड यास, निळो बाबाजी याविशीं, याचीं भांडीं किल्ले मजकुरीं पेठेंत रामसेट कासार याचे घरीं ठेविलीं आहेत, तीं याचे स्वाधीन करणें ह्मणोन.

५ किल्ले मामलेदारांस पत्रें कीं, लोकांस आपले घरांस जाण्यास निरोप दिला असे, तरी यांचे घराची जप्ती केली असल्यास मोकळी करणें; आणि यांची वस्तभाव माघारी देणें ह्मणोन

२ कृष्णाजी विश्वनाथ, तर्फ अंजणवेल, यांचे नांवें.
 १ बाळाजी कोकणेराव चवाण याविशीं.
 १ हिरोजी सिर्के याविशीं.

---

२

१ गंगाधर गोविंद, तर्फ विजयदुर्ग, यांस रहिमानखान असामी ३७ याविशीं.
१ बाबूराव माणकेश्वर परगणा कर्डे रांजणगांव यांस, रामचंद्र बाबूराव वस्ती वडझरें याविशीं.
१ बाळाजी गणेश तर्फ देवगड, यांस गोविंद काणे लोकसुद्धां याविशीं.

५

२ हैबतराव शिंदे, व जनापा शिंदे, वस्ती कणेरखेड, यांसी लोकसुद्धां घरास जाण्यास निरोप दिला असे, त्यास यांचे घराची जप्ती केली असल्यास मोकळी करणें. जप्तीमुळें मुलेंमाणसें परागंदा जाहलीं आहेत. त्यास कौल देऊन गांवीं आणावीं; व निसबतीचे लोकांचीं मुलेंमाणसें गांवीं आणावीं, याविशीं. पत्रें.
१ श्रीनिवास पंडित यांस.
१ कृष्णराव अनंत, जिल्हा सातारा यांस.

२

३०

६२४–( ४०० ) तर्फ हवेली पाल, येथें तोतया आला, तेव्हां सरकार शिलकेचीं, व रयतेचीं भातें होतीं, तीं नेलीं, व तोतया पळोन गेल्यावर शिंदे घाटाखालीं उतरले, याजमुळें रयत परागंदा जाहली. शेतें जागाजागाचीं उभींच गळालीं; व कांहीं फौजेचे दळवाटानें गेली, आणि सरकारचा तो महसूल द्यावा लागेल याजकरितां रयत यावयासी अनमान करित्ये, ह्मणोन हुजूर विदित जाहलें. त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. रयत तजावजा जाहली आहे, तीस कौल देऊन गांवीं आणणें; व फौजेमुळें शेतें वगैरे पायमाली जाहली असेल, त्याची चौकशी करून,

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

(624) It was represented to Government that the Impostor on his arrival at Tarf Haveli Pál took away all grain belonging to Government as well as to rayats, that after he had run away, Scindia marched down the Ghauts, that the rayats consequently left their villages, that the crops were destroyed for want of men to cut them down and also in consequence of the movements of the Government army through the province, and the rayats feared that they would be called upon to pay the revenue notwithstanding the above circumstances. The officer of the Pargaṇá prayed that a Kowl might therefore be given by Government to the villages. The request was complied with and orders were issued that the Tarf in question should receive the same remissions as other Tarfs.

A. D. 1776-77.

जसा सर्वत्र प्रांतांत पायमल्ली मजुरा द्यावयाचा शिरस्ता पडेल, त्याप्रमणें तर्फ मजकूरचे रयतेस पायमल्ली मजुरा देणें, जाजती उपद्रव न देणें ह्मणोन, बाजी गोविंद यांचें नांवें चिटणिसी छ. २२ जिल्हेज. पत्र १.

६२५–( — ) महालानिहाय येथील सरदार लोक व शिपाई लोक तोतयास मिळोन होते, त्यास सरदार लहान, व मातबर पाहून वीस पंचवीसपासून पन्नास रुपये, व शिपायी लोक यांजपासून पंधरा रुपयेपर्यंत दरअसामीस गुन्हेगारी घ्यावयाचा करार करून, हें पत्र सादर केलीं असेत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें गुन्हेगारी घेऊन ऐवज जमा करणें, हुजुरून वराता होतील त्यास वराताप्रमाणें ऐवज देणें ह्मणोन, कमाविसदारांस. सनदा.

सबा सबैन मया व अलफ मोहरम, ९

१ तालुके अवचितगड निसबत आबाजी बल्लाळ, व भास्कर महादेव यांस.

१ प्रांत राजपुरी निसबत गोविंदराव माणकर यांस.

२

परवानगी रूबरू.

## भिवराव यशवंत पानसी यांच्या कीर्दीपैकीं.

६२६–( ४१४ ) कमावीस, बद्दल सुखनिधान तोतया याणें किल्ले राजमाची येथें, गडदेंत सोनें रुपें वगैरे ठेविलें होतें, तें आबाजी यादव मजमदार प्रांत वसई यांणीं मोजदाद करून आणिली त्यापैकीं.

मबा सबैन मया व अलफ मोहरम ११

| | जमा | रुपये. |
|---|---|---|
| ९९८॥‹ | पुतळी तांटें २०० एकूण वजन तोळे ६३।२ दर १५॥। | |
| ११२८६।≡ | सोनें तोळे एकूण. | |
| | ५४६३॥= प्रत तोळे ३६४८२।॥१ दर १५ | |
| | ३२४६॥।‹ प्रत तोळे २२९॥।१।१ दर १४८= | |
| | ७१६॥।=॥ प्रत तोळे ५१८२॥ दर १४ | |
| | १३६९८॥ प्रत तोळे ७८॥ (१०१॥) दर १३॥ | |
| | २६० प्रत तोळे २० दर १३ | |

११२८६।≡(११०५६।=)७७६॥।०॥(७६६॥।०॥)

( 625 ) All the Sardárs and men in Táluká Awachitgad in Pránt Rájpuri who had joined the Impostor were fined, the former at a sum varying from Rs. 20 to 50 each and the latter at Rs. 15 each.

A. D. 1776-77.

( 626 ) Property kept by Sukhnidhán Impostor in the fort of Rájmáchi was attached.

A. D. 1776-77.

१२३२६। रुपें रुपये भार १२३४३।।। पैकीं वजा खोटें रुपें गाळून जमा होईल, सबब भार २१।। बाकी. जमा.

---

२४६११।।

७५० (१५०) माळ रुद्राक्ष. व मोत्यें मिळोन.

८५ मोत्यें.

८५ रुद्राक्ष जुने.

---

१७०

पैकीं मोत्यांची किंमत दर मोत्यास रुपये १।। प्रमाणें.

---

२४७६१।।

१० चमचा दगडी लाल १

---

२४७७१।।

६२७–( ४१५ ) इनाम खर्च जासूद दिंमत महादजी शिंदे असामी २ तोतयास धरलियाची खबर घेऊन आले, सबब परवानगी रूबरू तिवटें एकूण आंख.

सबा सबैन मया व अलफ मोहरम ११

| | |
|---|---|
| १२।। बाबूजी | १ |
| १० आनाजीस | १ |
| २२।। | २ |

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

६२८–( ४४२ ) बलवंतराव मल्हार दिंमत हुजरात, याजकडे मौजे सोंव, परगणे महाड, तालुके रायगड, हा गांव आहे, त्यास त्याचे भाऊ तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब यांजकडे गेले होते, सबब; व याचे दुसरे बंधु तोतयाकडे गेले, याजकरतां मौजे मजकूरची जप्ती सरकारांत केली होती, त्यास तीर्थरूपां-

सबा सबैन मया व अलफ रबिलावल २९

---

( 627 ) Reward was given to messengers of Máhádji Scindia who brought news of the arrest of the Impostor.
A. D. 1776-77.

( 628 ) Balvantrao Malhár employed under the Sátárá Rájá held the village of Sowa in Parganá Mahád. One of his brothers having gone over to Dádásáheb and another having joined the Impostor, the village was attached. He now represented that
A. D. 1776-77.

करून सर्वांबरोबर याचे भाऊ इकडे आले; व तोतयाकडे जाण्याचें कारण याणीं विदित केलें कीं, आपला गांव तोतयानें इंग्रजास द्यावयाचा करार करून आपले भावास बोलाविलें. न जावें तरी गांव जातो याजकरितां गेले, याखेरीज दुसरी लबाडीची गोष्ट केली नाहीं; ह्मणोन विनंति केली, त्यावरून येविशीं जामीन हुजूर घेऊन, मोजे मजकूरची जप्ती मोकळी करून, हें आज्ञापत्र सादर केलें असे, तरी जप्ती उठवून गांव पेशजींप्रमाणें याजकडे चालता करणें; व जप्तीमुळें वसूल घेतला असेल, तो माघारा देणें ह्मणोन; महादाजी बल्लाळ कारकून शिलेदार याचे नांवें चिटणिसी छ. २० मोहरम. पत्र १.

येविशीं मोकदम मौजे मजकूर अंमल सुरळीत देणें ह्मणोन. १.

———

२

६२९–( ४५७ ) तालुके रेवदंडा येथील लोकांनीं सालमजकुरीं तोतयाचा वेढा बसला होता; तेसमयीं चाकरी मेहनतीनें केली; सबब लोकांस पेस्तर साल सन समान सबैनपासून जाजती नेमणूक करून दिल्ही त्याचीं वगैरे. कलमें.

सबा सबैन
मया व अलफ
रबिलाखर २६

१ आत्फागिरे सरदारास नवीं दिल्हीं त्यास आत्फागिरे यांस तैनात शाईशिरस्ता दरमहा रुपये.

| | | |
|---|---|---|
| ५ | जावजी शिंदे | १ |
| ५ | लक्ष्मण नाईक मदनळीकर | १ |
| ५ | बाजी बागराव | १ |
| ५ | गोविंदराव जवार | १ |
| ५ | गोविंदराव दरेकर | १ |
| ५ | रामजी शिंदे | १ |
| ३० | | ६ |

his brother who had gone over to Dádásâheb had returned to the side of Government along with others, and that his second brother joined the Impostor through fear of losing the village in question, as it was promised by the Impostor to the English. A security was taken from Balvantrao, and the attachment placed over his village was ordered to be removed.

( 629 ) Rewards were given to and honors conferred on men and officers of Tálukâ Rewadandá, who did good service during the siege of the Impostor in the current year.

A. D. 1776-77.

एकूण सहा असामी यांस तैनात शाईशिरस्ता तीस रुपये करार केले असेत, तरी सदरहू सहा असामी सरदारांकडे चालवून रोजमरे शिरस्तेप्रमाणें देत जाणें. कलम.

१ दिवट्ये सरदारांस करार करून दिल्हे त्यास तैनात, व तेल दरमहा. शाईशिरस्ता.

| | आसामी | तैनात | पक्के तेल वजन. |
|---|---|---|---|
| जावजी शिंदे | १ | ३ | ८८२॥ |
| गोविंदराव दरेकर | १ | ३ | ८८२ |
| गोविंदराव जवार | १ | ३ | ८८२ |
| राजोजी राणे | १ | ३ | ८८२ |
| दसोजी वणजारे | १ | ३ | ८८२ |
| राघोजी मोरे | १ | ३ | ८८२ |
| गोपालजी नाईक मदनळीकर | १ | ३ | ८८२ |
| | ७ | २१ | ८।४॥ |

एकूण सात आसामी यांस तैनात शाईशिरस्ता एकवीस रुपये व तेल दिवटीस, दरमहा साडेचवदा शेरप्रमाणें; करार करून दिल्हे असे: सदरहूप्रमाणें पाववीत जाणे. कलम.

१ इजाफा लोकांस तैनात दरमहा रुपये १५० दीडशें करार केली असे; तरी जे लोक या मसलतींत कामास मेहनतीस उपयोगी पडले असतील, त्यांस नांवनिशीवार कदीम शिरस्त्याप्रमाणें इजाफा सदरहू दीडशें तैनातपैकीं रोजमरा शिरस्तेप्रमाणें पाववीत जाणें. कलम.

१ जावजी शिंदे यास चवरी दिल्ही; त्यास चवरीबारदार असामी १. एकूण तैनात आकारमाही शिरस्ता दरमहा रुपये ४ चार करार करून दिल्हे असेत; तरी सदरहू असामी यांजकडे चालवून रोजमरे शिरस्तेप्रमाणें देत जाणें. कलम.

१ बाळपर्वेसी लोक तोतयाचे लढाईंत ठार जाले. त्यांस मोईन सालीना. रुपये.

६० दिंमत जावजी शिंदे.

३५ बाजीराव मालुसरे याचे आईस, व बायकोस.

२५ संभाजीराव कदम याचे आईस. व बेट्यास.

६०

४० माजी रायगडकरी दोन असामी ठार झाले त्याची बाळपर्वेसी तालुके मजकुराकडे नेहमीं नेमणूक करून दिल्हे ते.

२० संभाजी जागड, दिंमत बाबूराव दरेकर याचे आईस, व भावास.

२० अबदुल रहिमान, दिंमत लक्ष्मण गणेश याचे आईस, व भावास.

———

४०

———

१००

एकूण शंभर रुपये नेमणूक करून दिल्ही असे, पाववीत जाणें. कलम.

१ शिरस्ते मुबदला सरदाराची तैनात पेशर्जी शाईशिरस्ता होती, ते दूर करून मोईन करार केली असामी ४ पैकीं ऐन २, व पोरगे २.

एकूण सालीना रुपये.

२०० गोविंदराव जठार असामी २
पेशर्जींची तैनात रुपये २५ पंचवीस दूर करून हल्लीं.

२०० बाजी बागराव असामी २
पेशर्जींची तैनात रुपये १८ अठरा दूर करून हल्ली.

———

४००

एकूण चारशें रुपये मोईन सालीना करार केली असे, चाकरी घेऊन सदरहू वेतन पाववीत जाणें. कलम.

१ बाबूराव कदम भंडारी मुकादम याचा बाप महादजी नाईक फितूर होता. त्याचें पारिपत्य जाहलें. त्यास बाबूराव कामाचा माणूस, सबब मोकादमी पेशर्जीप्रमाणें याजकडे करार केली असे, तरी वर्तणुकेस जामीन सरसुभा चौकशीनें देऊन कतबा सरसुभा देणें; आणि याजपासून चाकरी घेऊन पेशर्जीप्रमाणें रोजमरा व अडीसरी देत जाणें. कलम.

१ कानोजी धर्मोजी नाईक आमटे आगरी भंडारी जदीद असामी १ एक यासी दरमहा नक्त दसमाही शिरस्ता अडिसेरी भात.

| तैनात रुपये. | कैली मापें. |
|---|---|
| ४ | ८१। |

एकूण चार रुपये दसमाही पथक शिरस्ता तैनात व अडिसेरी सवामणप्रमाणें करार केली असे, तरी वर्तणूकेस जामीन घेऊन कतबा हुजूर पाठवणें; आणि यांजपासून चाकरी घेऊन रोजमरा व अडिसरी शिरस्तेप्रमाणें देत जाणें. कलम.

१ दमाजी नाईक जगदळे यानीं रायगडकर दिंमत हुजूर हशम तालुके मजकुरीं नामजाद आहेत, त्यास दिवट्या असामी १ तैनात शाईशिरस्ता दरमहा रुपये तीन

असतां, फिरोन परगणे मजकुरीं वगैरे महालांत दंगा करून मुलूख मारिला, सबब जामीना-पासून सरकार नुकसानीचे वगैरे कितेक जाबसाल भरून घ्यावयाचे, याजकरितां हमीदा बेगम इचे दरोबस्त महालानिहायचे देशमुखीचे वतनाची जप्ती करून, त्याची कमाविस-सादर केली असे, तरी देशमुखीचे वतनाचा हकदक, मानपान, व उबलीचे गांव वगैरे जे असतील ते जफ्त करून, वसूल घेऊन, सरकारहिशेबीं जमा करणें ह्मणोन, नारो राम कमाविसदार परगणे चिमलगे यांस. सनद १.

येविशीं देशमुखीचे वतनाची वगैरे हकदक, मान, व उबलीचे गांव वगैरे परत नेले असतील, त्यांचा वसूल मशारनिल्हे यांजकडे देणें ह्मणोन, चिटणिसी अठरा परगणे. व नऊ ठाणीं बेगम देसाई मजकूर हिची आहे. तेथील कमाविसदारांस व जमीदारांस. पत्रें ५४.

२ परगणे होनवड.

१ कमाविसदार, निसबत रास्ते.

१ देशमुख, व देशपांडे यांस.

---

२

२ परगणे गोटे कमाविसदार, निसबत प्रतिनिधी; व देशपांडे यांस.

२ परगणे आलमेल कमाविसदार, निसबत विसाजी कृष्ण; व देशपांडे.

२ परगणे अथणी कमाविसदार, निसबत रास्ते; व देशपांडे.

२ परगणे इंडी कमाविसदार नरसिंगराव जनार्दन; व देशपांडे.

२ परगणे तांबे कमाविदार नरसिंगराव जनार्दन; व देशपांडे.

२ परगणे हलसगी कमाविसदार नरसिंगराव जनार्दन; व देशपांडे.

२ परगणे होरती.

२ परगणे मुळवाड.

२ परगणे उकळी.

२ परगणे बागेवाडी.

२ परगणे कोल्हार.

२ परगणे ममदापूर.

---

A. D. 1777-78. and plundered some villages in the Parganá. He was therefore arrested and imprisoned. Hamidá Begam Kom Siádi Rahim Desái of Parganá Vijápur having stood security for him, he was released. He again raised an insurrection and plundered the country. Hamidá Begam's watan was attached pending a settlement of the sum due from her on account of the loss caused to Government.

२ हवेली विजापूर कमाविसदार, निसबत प्रतिनिधी; व देशपांडे.
२ परगणे जालवार कोकटनूर.
२ परगणे हुसूर कमाविसदार भापकर; व देशपांडे.
२ परगणे बिदरी कमाविसदार, निसबत शंकराजी घोरपडे; व देशपांडे.
२ परगणे हिपरगे.
२ परगणे चिमलगे, नागोराम कमाविसदार यांस; व देशपांडे,
२ परगणे कोकटनूर कमाविसदार, निसबत खंडेराव पाले; व देशपांडे.
२ परगणे बेलवती.
२ परगणे सिद्धनाथ.
२ मौजे गीरसागर परगणे रुळी.
२ परगणे चांद कवठें.
२ परगणे.
२ परगणे.
२ ——————

| ५४ | ५५ |
|---|---|

रसानगी यादी.

६६२–( ८८५ ) उद्धो दादाजी कमाविसदार, परगणे डबई, यांचें नांवें सनद कीं, तुम्हीं विनंतिपत्र पाठविलें तें पावलें. परगणे मजकूर येथें इंद्राळेकर, व भमेरीकर, व जिरेकर गिराशे, तालुके चांपानेर व भिलाडें, तालुका गाइकवाड, यांणीं महालांत नित्य धाडी घालून गांव मारावे, व खळीं जाळावीं, पाटील धरून न्यावे, मारहाण करावी, जाजती गिरास मागावी, याप्रमाणें उपद्रव देऊं लागले. यास्तव जाजती शिबंदी ठेऊन, गिराशाचें पारिपत्य केलें; परंतु फिरोन गिराशे जमाव करून परगण्यांत उपद्रव करणार, त्यांचे पारपत्यास जाजती शिबंदी ठेऊन, बंदोबस्त जाहला पाहिजे ह्मणोन, तुम्हीं लिहिलें; त्यास गिराशाचे बंदोबस्ताबद्दल कार्याकारण जाजती

खमस समानीन
मया व अलफ
जमादिलाखर २०

(662) Uddho Dádáji, Kamáwisdár of Dabhoi represented that Girasias of Indrále, Bhámeri, and Jiri in Tâluká Champáner &c. frequently committed raids on the villages in his charge, made increased demands on account of their Girás, and took the Pátils prisoners, and prayed that sanction might be given to his entertaining more Shibundis. The sanction was given.

A. D. 1784-85.

शिबंदी लागेल, ते सरसुभ्याचे विचमानें ठेऊन, गिराशांचें पारपत्य करणें; आणि गिराशांचें पारपत्य जाहल्यावर दूर करणें ह्मणोन. सनद १.

परवानगी रूबरू.

६६३–( १००५ ) नारो चिमणाजी कमाविसदार परगणे अरूण वगैरे महाल यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं विनंतिपत्रें पाठविलीं तीं प्रविष्ट जाहलीं. परगणे मजकूर येथें सेरसिंग गिराशा वगैरे यांणीं दंगा बहुत केला. चिचोर्डी किल्ला शिंद्याकडील घेतला. मौजे पिंपरिया परगणे मावन या ठाण्यास मोर्चे लाविले होते, त्यास स्वामीचे प्रतापेंकरून स्वार व प्यादे सरंजाम सुद्धां घेऊन जाऊन मोर्चे उठऊन दिले, परंतु सरकार तालुका खराब फार केला. घासदाण्याचे रोखे करून गांवगन्ना ऐवज घेतला. बळवंतसिंग लष्करांतून सुटून आल्यामुळें त्याचे भाऊबंद वगैरे मिळोन नानाप्रकारचे उपद्रव देतात, व ठाणीं ध्यावयाचे उद्देशांत आहेत. येविशीं त्यांस पत्रें पाठविल्यास, परस्परें एकमेकांवर घालितात. गांवगन्ना स्वाऱ्या करून जिराइतांची वगैरे खराबी बहुत केली. तर्फ शहा पिंपरिया येथील पांच सहा गांवची बदमवेसी नेली. शिंद्याचीं पत्रें खेचीस येतात, त्यांचीं उत्तरें ते सालसीनें लिहितात. आह्मांकडील कारकुनापासीं खेची ह्मणतो कीं मुलुकाची आह्मांस आशा नाहीं. काहड चालेल तसें करूं आणि पोट भरूं. याप्रमाणें बोलतो. सालमजकुरीं हरभरेयाचे पिकावर हींव पडोन शेतें करपून गेलीं, व मदसुदनगडचा किला व झाझोणचें ठाणें खालीं करून द्या ऐसें ह्मणतो. नवी शिबंदी ठेवून बंदोबस्त करित आहे ह्मणोन लिहिलें, त्यास मुलुकाचा व ठाण्याचा बंदोबस्त जाहला पाहिजे, यास्तव नेमणुकी स्वार व प्यादे आहेत, त्याशिवाय स्वार व प्यादे कार्याकारण ठेऊन ठाण्याचा व किल्याचा व मुलुकाचा बंदोबस्त करणें ह्मणोन. सनद १.

तिसेन मया व अलफ जमादिलाखर १९

रसानगी, त्रिंबकराव नारायण परचुरे कारकून निसबत दप्तर.

६६४–( १०३२ ) सरसुभा प्रांत गुजराथ येथें मवासांनीं दंगा केला होता, त्यांचे

---

( 663 ) Shersing Girassia created a disturbance in Parganá Aruṇ &c. He captured the fort of Chichordá belonging to the Scindia. He also laid siege to the Tháṇá of Pimpriyá in Parganá Máwan, but was repulsed by the Kamávisdár. He was assisted by Balwantsing who was a deserter from the army. They levied contributions from the people and completely ravaged the country. The Kamávisdár therefore asked for assistance. He was directed to entertain as many new men as were necessary, and to punish the rebels.

A. D. 1789-90.

( 664 ) The Mawás having created a disturbance in Gujerath, a force was sent to assist the Sar Subhá.

A. D. 1790-91.

इहिदे तिसेन मया व अलफ सवाल ७

पारिपत्यास हुजुरून पागा व पथकें व गाडदी पेशजीं पाठविले आहेत, त्याप्रमाणें कृष्णराव भिवाजी तालुके अमदाबाद यांजकडे.

सरंजामी पथकें यांचे स्वार.

२०० दिंमत रामचंद्र नागनाथ.

१५० दिंमत काशीराव रास्ते.

---

३५०

गाडदी दिंमत हाये निसबत रावो विश्वनाथ याजकडील असामी ५२५

एकूण साडे तीनशें स्वार, व पांचशें पंचवीस गाडदी देविले असेत, तरी सदरहूप्रमाणें मशारनिल्हेकडे रवाना करणें ह्मणोन, हरी चिंतामण यांचे नांवें. सनद १.

६६५–( १०६५ ) मल्हार खंडेराव यांणीं मोगलाई जाहागीरदार यांस मिळोन सरकार अमलांत बखेडे केले, सबब त्यांस कैद करून किल्ले अवचितगड तालुके मजकूर येथें अटकेस ठेवावयास, बरोबर चिंतो बापूजी याजकडील गाडदी देऊन पाठविले असत; तरी किल्ले मजकुरीं पके बंदोबस्तानें अटकेस ठेऊन, पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, बाबूराव पासलकर यांचे नांवें.

सलास तिसेन मया व अलफ जमादिलावल ५

सनद १.

रसानगी, त्रिंबकराव नारायण परचुरे.

६६६–( १०७७ ) बाबूराव पासलकर यांचे नांवें कीं, तुह्मीं विनंतिपत्र छ. २१ सवालचें पाठविलें, तें प्रविष्ट जाहलें. जंजीरकराकडील चोरटे मुलकांत उपद्रव करावयास आले होते. त्याजवर स्वारी पाठविली त्यांणीं व किल्ले सोनगिरीस बातमीस आला होता, तो मिळोन सात आसामी धरून आणिले; त्यांजपैकीं पांच असामींचे हातपाय जंजिकराकडील महालचे सर्देवर नेऊन

आर्बा तिसेन मया व अलफ जिल्काद ३

---

(665) Malhár Khanḍerao, having with the assistance of Moglái Jahágirdárs created a disturbance in the Government territory, was sent to fort Awachitgaḍ for being imprisoned.

A. D. 1792-93.

(666) Thieves from the territory of Janjirkar were infesting the country. They were arrested by Báburao Pásaḷkar, and the hands and feet of five of them were cut off on the borders of the Janjirkar's territory. The Janjirkar having issued an order to the Jamidárs of the Peshwá's province to keep the country desolate, a counter order to the same effect was issued by Báburao to the officers of the Janjirkar. Báburao reported the matter to Government, and his action was approved.

A. D. 1793-94.

तोडविले. दोन असामी दाखल्यास ठेविले आहेत; व जंजीरकरानें बेकौल मुलकाची वसाहत न करण्याविशीं जमीदारास पाठविला होता. तो शेवेसीं पाठविला आहे; व चोरट्याचीं हत्यारें पाडाव करून आणिलीं आहेत; व जंजीरेकराकडील महालांत वस्ती न करण्याविशीं बेकौल पाठविले आहेत; ह्मणोन तपशीलवार लिहिलें तें कळलें. त्यास चोरटे पांच असामींचे हातपाय जंजीरकराचे सर्देवर तोडविले, व बेकौल चिठ्या त्यांचे महालीं पाठविल्या. उत्तम केलें. दोन चोरटे दाखल्यास ठेविले आहेत, ते पक्के बंदोबस्तानें ठेवणें, हत्यारें पाडाव करून आणिलीं आहेत; तीं तालुके बीरवाडी येथील हिसेबीं जमा करणें ह्मणोन.

सनद १.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दप्तर.

६६७–( ११०९ ) महादजी खंडेराव यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं छ. २ जिल्हेजचें विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. कित्तूरकर देसाई जांबतुटीचे रानांत होता, तेथून पंचवीस स्वारांनिशीं निघोन, सुरापूर तालुक्याकडे गेला. ह्मणोन दोन चार बातम्या आल्या. बायका अगोदरच हलसीहून विजापुराकडे पाठविल्या, ह्मणोन बातमी आहे. काटक प्यादे वगैरे एक हजार अजमासें त्याजपासून निघोन, ते धारवाड वगैरे तालुक्यांत राहिले आहेत. त्यांचें बोलणें, ज्या गांवचे आहेत त्या गांवकरियांचे गुजारतीनें जामीन देऊन गावांत येतों ह्मणोन आलें. त्याप्रमाणें येत आहेत जांबुटकर देसाई याजवळ हल्लीं कित्तूर तालुक्याचे नाईकवाडी, काटक वगैरे देसाई याचे मिलाफी दोनशें व कारभारी दहा बारा असामी आहेत, व ककीरे कर्यातींत ककीरेकर देसाई यांजकडील व कित्तूरकरांकडील मिळोन पांच सहाशें माणूस आहे, त्यास ते नित्य उपद्रव करूं लागले असतां अबादी होणार नाहीं. शिबंदी दीड हजार माणूस व पांचशें स्वार ठेविले असतां बंदोबस्त होणार नाहीं. ककीरेकर देसाई दोन वर्षें अंमल चालूं देत नाहीं त्यास झाडींतील चार देसक जांबूट कमाविसदाराचे इतल्यांत आहेत. त्यांचें ह्मणणें कीं, कित्तूरकर देसाई यानें खानापूर महालाचे सरदेसकतीचे सहा हजार रुपये आकाराचें वतन माझें जबरदस्तीनें घेतलें आहे, तें मजला द्यावें; व एक वर्षपर्यंत शिबंदीचे खर्चास बाराशें रुपये दरमहा द्यावे. ह्मणजे झाडीचे आंगें तालुके मजकूरच्या सात आठ कर्याती आहेत, तेथें शिबंदी ठेऊन कोणाचा तलीतगादा होऊं देत नाहीं. येविशीं जामीन देतों. उपद्रव हो-

खमस तिसेन मया व अलफ जिल्हेज १४

---

( 667 ) Mahádji Khanderao wrote that the Desái of Kittur had gone from the Jambūt forest into the Parganá of Surápur, that Kakirekar Desái had some force with him, that Jambutkar Desái offered to put down the Kitturkar, if he were given his watan worth Rs. 6000 taken by the Kitturkar. His offer was accepted.

A. D. 1794-95.

ऊन सरकार तालुक्याची खराबी जाहल्यास वतन चालवूं नये. नुकसानी जामिनापासून घ्यावी. कर्कीरे कर्यातींत अमल चालला नाहीं तो हस्तगत करून देतों ह्मणतो. त्याचा आकार सालास तीन हजार पर्यंत होईल. जांबुटकर वगैरे झाडींतील देसक याचें पारिपत्य व्हावें, तर परजन्यकाळ. झाडींत फौजेचा लाग नाहीं. फौज राहील ते कांहीं काबाड करील, यामुळें लावणी होणार नाहीं. यास्तव असें जाहल्यास बंदोबस्त होईल. बाकी देसच्या कर्याती मैदानच्या आहेत. चारशें स्वार व हजार गाडदी चार मास ठेविल्यानें बंदोबस्त राहील ह्मणोन लिहिलें, तें विदित जाहलें. ऐशास ज्या गांवचे काटक त्या गांवकरियाचे गुजारतीनें काटकांनीं फंद फितूर करूं नये, रयतेप्रमाणें गांवांत राहून रयतीप्रमाणें वसूल द्यावा, असे पक्के जामीन घेऊन त्यांस गांवगन्ना राहण्याची परवानगी देणें. जांबुटकर देसाई यांजपासून आठ कर्यातींत तलीतगादा कोणाचाही होऊन एक रुपयाचें नुकसान कधीं जाहल्यास भरून घ्यावें व पुढें वतन चालऊं नये, असा जामीन खातरजमेचा घेऊन दरमहा बाराशें रुपये शिबंदी खर्चाचे एकसाल द्यावयाचा करार करून बंदोबस्त करणें; आणि खानापूरचें वेतन पहिलें आपलें चालत होतें म्हणतो, त्याची चौकशी करून पेशजींपासून चालत होतें असें असल्यास, सहा हजार रुपयांचें वेतन त्याजकडे चालतें करणें; व देसचे कर्यातीचे बंदोबस्तास धोंडो बल्लाळ यास त्याची पागा व गाडदी धारवाड पैकीं पांचशें, व हुजूरचे पांचशें, मिळोन हजार, इतक्या सरंजामानिशीं ठेऊन तुह्मीं निघोन येणें ह्मणोन, महादाजी अनंत यास अलाहिदा लिहिलें आहे, तर सदरहूप्रमाणें जांबुटकरानें जामीन दिल्हा ह्मणजे खानापूरचें वतन याजकडे चालू करणें. व दरमहा बाराशें रुपये शिबंदी खर्चाबद्दल एकसाल देऊन, तालुके मजकूरचे हिशेबीं खर्च लिहिणें; आणि धोंडो बल्लाळ यास सरंजामानिशीं तालुक्याचे रखवालीस ठेवले आहेत, तर तुह्मीं रयतेस दिलदिलासा देऊन तालुक्याची लावणी व आबादी करणें. कित्तूरकर देसाई सुरापुराकडे गेला असल्यास कैद करून हुजूर पाठवणें ह्मणोन. सुरापूरकर यास पत्रें गेलीं आहेत, तर देसाई याचें पक्कें ठिकाण लाऊन लिहून पाठवणें ह्मणोन. सनद १.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

६६८–( ११९२ ) परशराम रामचंद्र यांचे नांवें सनद कीं, सावनूर तालुक्यांत धोंडजी वाघ याचा उपद्रव जाहला होता, याजकरितां तुह्मीं सरकारचे गारदी ठाण्याठाण्यांत बंदोबस्तास ठेविले आहेत. त्यास धोंडजी वाघ टिपूकडे सांपडला. तालुक्यांतील बखेडा मोडला. यास्तव गाडदी

खमस तिसेन
मया व अलफ
मोहरम १३

(668) Dhondji Wágh having given trouble in Sáwanur, Gárdis were placed to watch the several posts. Dhondji having been arrested in Tippoo's territory, the Gárdis were ordered to be recalled.

A. D. 1794-95.

ठेवावयाचें प्रयोजन नाहीं, तरी ठेविले आहेत ते दूर करणें. जरुराती कार्याकारण बंदोबस्तामुळें प्रयोजन लागल्यास तुह्मांकडील सरंजामी फौज पाठवून बंदोबस्त करणें ह्मणोन. सनद १.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

६६९–(११९५) धोंडजी वाघ याणे जमाव करून कर्नाटक प्रांतांत सरकारचे महालीं दंगा करीत होता. त्याचा भाऊ सिदोजी वाघ कांहीं लोक घेऊन सावनूर तालुक्यांत येऊन उपद्रव करीत होता. त्यास भास्कर सखदेव कमाविसदार तालुके सावनूर यांजकडील माणको आपाजी यांणीं ठाणें बेलूर परगणा हावनूर, येथून लोकसुद्धां धरून आणिला. त्यास परशराम रामचंद्र यांणीं हुजूर रवाना केला. ते तालुके हाय येथील किल्यांत पाठविले असामी ५३ त्रेपन्न असामी बराबर गाडदी असामी दोनशें दिंमत हाय निसबत गणेश हरी यांस देऊन तालुके हाय येथें अटकेस ठेवावयाविशीं पाठविले आहेत, तरी सदरहू त्रेपन्न असामीचे पायांत बेड्या घालून, पक्या बंदोबस्तानें अटकेस ठेवून, पोटास शेर शिरस्त्याप्रमाणें देऊन, कारकून खेरीज करून बावन असामींपासून इमारतीचें काम घेत जाणें ह्मणोन, मामलेदार यांचे नांवें. सनदा.

खमस तिसेन मया व अलफ रबिलावल ४

१ तालुके वसई निसबत सदाशिव रघुनाथ येथें पाठविले असामी.

५ जंजिरे वसई येथें.

| | |
|---|---|
| १ शर बाग. | १ चांदोजी वागमारे. |
| १ कृष्णाजी भगा. | १ सटवाजी शिंदा |
| १ धावजी फडतरा. | —— |
| | ५ |

५ जंजिरे अर्नाळा येथें.

| | |
|---|---|
| १ कासीबा शिंदा. | १ मानाजी यादव. |
| १ मानाजी फडतरा. | १ राणोजी निकम. |
| १ नरसोजी वणगर. | —— |
| | ५ |

——

१०

एकूण दहा असामी बरोबर गाडदी असामी २८ अठ्ठावीस देऊन पाठविले येविशीं. सनद.

(669) Sidoji Wágh, Dhondji Wágh's brother, who was ravaging the Táluká of Sáwanur was arrested with his men by Máṇko Appáji at Belur in Parganá Hávnur. Sidoji and his men were sent to be confined in forts.

A. D. 1794-95.

# सवाई माधवराव पेशवे यांची रोजनिशी.

## भाग ( ४ )

## २ लष्करी खातें.

### ( अ ) फौज.

६७०-( १ ) राणोजी सलगर सरंजामी राजमंडळ, करवीरकर याजकडील. कलमें.

अर्बा सबैन मया व अलफ रजब ४

आपाजी सदाशिव मजमदार, व लक्ष्मण पांडरंग फडणीस दिंमत सलगर, याजपासून दरकाचें कामकाज सलगर घेत नाहीं. नवे कारकून ठेविले आहेत ते कामकाज करितात. त्यास राजपत्रीं कारकून जुने आहेत. त्यांजपासून कामकाज घेऊन वेतन नेमणुकेप्रमाणें देत जाणें. व नवे कारकून ठेविले आहेत ते दूर करणें. कलम १.

राणोजी सलगर याची स्वारसुद्धां चाकरीची नेमणूक सरकारांतून होईल त्याप्रमाणें तिकडे चाकरीस न गेल्यास त्याचा जातीचा ऐवज सरकारांत घेऊन, बाकी ऐवज स्वाराची चाकरी घेऊन, नेमणुकेप्रमाणें देत जाणें. कलम १.

एकूण दोन कलमें करार केलीं असेत, तरी सदरील प्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, लक्ष्मण बल्लाळ याचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

---

## II MILITARY ADMINISTRATION

### ( A ) Army.

A. D. 1773-74.

( 670 ) Ráṇoji Salgar, a Saranjám-holder under the Rájá of Karvir, was directed to remove the new kárkoons entertained by him, and to accept service from the old kárkoons appointed by order of Government. He was further told to be ready to serve with his Sawárs wherever he may be directed. His personal Saranjám was to be withheld from him if he failed to serve in person.

६७१–( १० ) गोविंद बल्लाळ यांचें नांवें सनद कीं, सुलतानजी वडगर अमिरुल् उ-

अर्बा सबैन मया व अलफ रमजान ३०

मराव, हिंमत शहाजी भोसले, यांचें तर्फेनें तुमचे तीर्थरूप बाळाजी नरसी याजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम चालत होता. त्याचा तपशील.

१ परगणे अकोले येथील मोकासा देखील जकात.

* * *

येणेप्रमाणें महाल एक, व सवाता दोन, व गांव बारा येथील सदरहूप्रमाणें मोकासा चालत होता, त्यास तुमचे तीर्थरूप मृत्यु पावले, याजकरितां सरंजाम याजकडून दूर करून सालगुदस्त शहाजी भोसले याजकडे कमावीस सांगितली होती. त्यास सालमजकुरीं त्याजकडील कमावीस दूर करून तुह्मांकडे सरकारची नजर रुपये १०००० दहा हजार एक साल हप्त्याचा करार करून घेऊन पूर्ववत्प्रमाणें महाल व गांवचा सदरहू मोकासा तुह्मांस फौजेचे सरंजामास करार करून दिला असे, तरी सदरहूचा वसूल घेत जाऊन, पेशजींचे करारप्रमाणें स्वार बाळगून, सरकारचाकरी एकनिष्ठपणें शहाजी भोसले याचे बिसबतीस करीत जाणें ह्मणोन. सनद १.

येविशीं महालानिहायचे जमीदारांस व मोकदमांस सनदा कीं मशारनिल्हेसीं रुजू होऊन मुकाशाचे अमलाचा वसूल सुदामतप्रमाणें सुरळीत देणें ह्मणोन. सनदा.

* * *

शहाजी भोसले यांस सनद कीं, सदरहू सरंजामाची कमावीस सांगितली होती. ते साल मजकुरीं दूर करून बाळाजी नरसी यांचे पुत्र गोविंद बल्लाळ यांजपासून दहा हजार रुपये सरकारांत नजर घेऊन पूर्ववत्प्रमाणें मशारनिल्हेकडे फौजेचे बेगमीस सरंजाम सदरहूप्रमाणें महाल व गांवचा मोकासा करार करून दिला असे, तरी तुह्मीं यांजपासून पेशजीं करारप्रमाणें स्वारांची चाकरी घेऊन, यांजकडे सरंजाम सुदामत बमोजीब सुरळीत चालविणें ह्मणोन. सनदा.

---

१६

रसानगी यादी.

---

( 671 ) Báláji Narsi held a Military Saranjám from Amirul Umrao Sultánji Vadgar under Sháháji Bhosle. On Báláji's death the Saranjám was resumed and given for management to Shaháji Bhosle. It was now conferred on his son Govind Ballál and a Nazar ( tribute ) of Rs. 10,000 was levied.

A. D. 1773-74.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

६७२-( १७० ) सखाराम भगवंत याचे नांवें कीं, खासबरदार नाईक असामी.

खमस सबैन
मया व अलफ
मोहरम ६

| | |
|---|---|
| १ खंडोजी राजगुडे. | १ खंडोजी शेवळे. |
| १ बहिरजी सिंगटे. | १ लक्ष्मण धनवडे. |
| १ राणोजी जाधव. | १ शाहाजी गोले. |
| १ अण्णाजी सिंगटे. | १ सयाजी पवार. |
| १ जानोजी शिर्के. | —— |
| | ९ |

एकूण नव असामी वस्ती बेलमाची, किल्ले वंदन, हे किल्ले साष्टी येथें जमाव सुद्धां चाकर होते, त्यांस इंग्रजानें बदमामली करून किल्ला घेतला. तेव्हां किल्यांतून बाहेर निघाले, त्यांणीं वरकड लोक चाकरीस आहेत, त्याप्रमाणें असावें, तें नकरितां बगरहुकूम निघोन आपले घरांस गेले आहेत. त्यांचें प्रयोजन आहे; यास्तव हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी सदरील नव असामी माची मजकुरीं अगर आसपास गांवीं असतील, त्यांची चौकशी करून, त्यांस आणून, बंदोबस्तानें हुजूर पाठवणें. व त्यांचीं मुलें, माणसें व भाऊबंद व दिंमतीचे लोक वगैरे जागा असतील, त्यांचा शोध करून, त्यांस जामीन चांगले घेऊन, हुजूर लेहून पाठवणें, येविशीं राजश्री शामराव जगजीवन यांस लिहिलें आहे. तें पत्र त्यांजकडे रवाना करणें. त्यांजकडील लोक पाहिजेत तरी आणवणें. पत्र पावतांच सदरील लिहिले प्रमाणें तुह्मीं चौकशी करणें. त्यांची वाट न पाहणें. येविशीं बोभाट न करितां, जलदीनें बंदोबस्त करणें ह्मणोन. छ १४ जिल्काद. सनद १.

येविशीं चिटको गुंजे मशारनिल्हेकडील किल्ले वंदनास आहेत, त्यांस कीं, सदरील लिहिले प्रमाणें बंदोबस्त करणें ह्मणोन. १

——
२

परवानगी रूबरू.

---

### FROM NÁRO ÂPÁJI'S DIARY.

( 672 ) Certain Khásbardár Naiks having gone away to their homes, when Salsette was taken by the English, instead of continuing in service, orders were issued for their being brought to the Huzur and for security being taken from their relations.

A. D. 1774-75.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

६७३–( २२१ ) दिंमत पागा हुजूर याजकडेस बेगमीस सालगुदस्तांप्रमाणें सालमजकुरीं रावते महालानिहाय येथील कमाविसदारांकडून बेगारीनें.

सीत सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

प्रांत पुणें निसबत रामचंद्र नारायण यांजकडून.

२५ महार.
५ मांग.
५ चांभार.
———
३५
एकूण पस्तीस असामीविशीं.

तालुके हवेली, संगमनेर, निसबत त्रिंबक कृष्ण यांजकडून.

३० महार.
१० मांग.
१० चांभार.
५ जिनगर.
———
५५
एकूण पंचावन असामीविशीं.

परगणे पारनेर निसबत नारो बावाजी यांजकडून असामी.

४० महार.
१० मांग.
१० चांभार.
———
६०
एकूण साठ असामीविशीं.

तालुके राहुरी निसबत बहिरो रघुनाथ यांजकडून महार असामी १० एकूण दहा असामीविशीं.

तालुके खेड, प्रांत जुन्नर, निसबत गंगाधर रघुनाथ यांजकडून बेगारी असामी.

९ महार.
३ मांग.
३ चांभार.
———
१५
एकूण पंधरा असामीविशीं.

प्रांत जुन्नर निसबत रघुनाथ हरी यांजकडून असामी.

२९ महार.
११ मांग.
९ चांभार.
———
४९
एकूण एकूणपन्नास असामीविशीं.

परगणे नेवासें वगैरे महाल निसबत रामचंद्र नारायण यांजकडून.

७५ महार.
५ जिनगर.
———
८०
एकूण ऐशीं असामीविशीं.

---

### FROM JÂNARDAN APPÂJI'S DIARY.

( 673 ) Mahárs, Mángs and Chámbhárs were obtained from certain Tarfs and Parganás for service in connection with the Huzur Pagá. The number required for each Tarf is given in this Sanad.

A. D. 1775-76.

परगणे कर्डे निसबत बाबूराव माणकेश्वर सुभेदार यांजकडून असामी.

१० महार.

५ मांग.

५ चांभार.

---

२०

एकूण वीस असामीविशीं.

परगणे गांडापूर निसबत नारो बाबाजी याजकडून.

७५ महार.

१० मांग.

१० चांभार.

---

९५

एकूण पंच्याण्णव असामीविशीं.

तालुके बेकापूर निसबत बाळाजी केशव यांजकडून महार. असामी १०

महार. असामी. १०

एकूण दहा असामीविशीं.

दहा सनदा छ. २४ रबिलाखरीं दिल्या असेत. रसानगी यादी.

६७४–( २८२ ) परगणे जंबूसर प्रांत गुजराथ, येथील अमल नारो शंकर यांजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम होता, त्यास ते मृत्य पावले सबब त्यांचे पुत्र रघुपतराव नारायण राजेबहादर यांजकडे पुर्ववत्प्रमाणें परगणे मजकूरचा अमल फौजेचे बेगमीस सरंजाम करार करून हे सनद सादर केली असे; तरी यांसीं रुजू होऊन सुदामत प्रमाणें अमलाचा वसूल सुरळीत देणें म्हणोन, परगणे मजकूरचे जमीदारांस. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रबिलोवल १२

परवानगी रूबरू.

६७५–( २९७ ) गणेश विश्वनाथ बेहरे यांजबरोबर फौज देऊन छावणीस ठेविले आहेत,

---

(674) Náro Shankar being dead, the Parganá of Jambusar in Gujeráth, which was assigned to him in Military Saranjám, was continued to his son Raghunáthrao Náráyan.

A. D. 1775-76.

(675) Ganesh Vishvanáth being left in camp with the army, the

सबा सबैन मया व अलफ रबिलाखर १८

सबब शिक्का, मोर्तब, व सिक्के दौत एकूण तीन दागिने रुप्याचे अलाहिदा अक्षरें लेहून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें शिक्यांत खोदून तयार करून देणें ह्मणोन, हरी बल्लाळ कमाविसदार परगणे पिंपळनेर यांचे नांवें.

सनद १.

रसानगी, गणेश हरी पेठे.

६७६–( ३०१ ) जगन्नाथ नारायण, तालुके असेर यांस सनद कीं, हुजूर लोकांचें प्रयोजन आहे, त्यांस पांचशें लोक चांगले मर्द, त्यांत सरदार चार पांच लढाईत कामकाज केलें असे, अढलाचे बर्कंदाज, तिरंदाज, तेथें माणूस पाहून, तैनात करून सदरील लिहिल्याप्रमाणें जदीद लोक ठेऊन, हुजूर जल्दीनें रवाना करणें. या लोकांस एक रोजमरा तालुके असेर पैकीं देऊन लोक जलद रवाना करणें ह्मणोन.

सबा सबैन मया व अलफ जमादिलावल २०

सनद १.

परवानगी रूबरू.

६७७–( ३७९ ) पांडुरंग गोविंद यांचे नांवें सनद कीं, तुह्मांस फौज सुद्धां कर्नाटक प्रांतीं रवाना केलें आहे, त्यास स्वारींत संस्थानिकास वगैरे कौल, व सनदा व पत्रें द्यावीं लागतील. याजकरितां हुजुरून मुतालीचा शिक्का व मोर्तब एकूण दोन डागीनें महादजी जाधव व कृष्णाजी यादव खिजमतगार यांजबराबर पाठविले आहेत, घेऊन स्वारींत कौल व सनदा व पत्रें द्याल त्यावर शिक्के करीत जाणें. आणि शिक्का व मोर्तब पावल्याचें उत्तर पाठवणें. जुनी शिक्के कटार तुह्मांजवळ आहे, त्या पैकीं दौत व कटार हे दोन दागिने ठेऊन घेऊन जुना शिक्का कैलासवासींचे नांवचा आहे तो व मोर्तब एकूण दोन दागिने माघारे पाठऊन देणें ह्मणोन. छ. २ सवाल.सनद १.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

परवानगी रूबरू.

---

A. D. 1776-77. Kamávisdár of Pimpalner was ordered to provide him with a silver seal and silver signet with the letters engraved on it, as also a silver ink-stand.

( 676 ) Government being in want of men, the officer of Asher was ordered to send 500 good fighting men in charge of 4 or 5 Sardárs who had experience of battles.

A. D. 1776-77.

( 677 ) Pándurang Govind being sent out on a campaign to Karnátic, a royal seal and a signet was sent to him for being affixed to Sanads and Kowls to Sansthániks, which he might have occasion to issue. The old seal and signet of the time of the late Peshwá, which were with Pándurang Govind were ordered to be returned.

A. D. 1776-77.

६७८–( ४३० ) धोंडो गोपाळ कमाविसदार परगणे भेलसें, व खामखेडा याचे नांवें. सनद.

सबा सबैन मया व अलफ सफर २६

सन खमस, व सीत सबैन दुसाला फाजील सरकारांत आहे, व सालमजकुरीं पर्जन्य पडला नाहीं, तेणें करून रब्बी कमी जाहली व हल्लीं छ. २३ जिल्हेजीं गारा नारळा येवढ्या पडल्या तेणेंकरून बैल व माणसें बहुत मृत्यु पावलीं, याजमुळें आफत भारी पडेल. फाजील साल मजकुरीं फार निघेल तें पेस्तर सालचे रसदेंत मजुरा द्यावें. ह्मणोन तुह्मी विदित केलें, त्यास गारांची वगैरे आफत पडली. त्याची तुह्मी महालीं गेल्यावर चौकशी करून हुजूर लेहून पाठवणें. समजोन आज्ञा कर्तव्य ते केली जाईल. कलम १.

दरकदार वगैरे राघो पांडुरंग व सबनीस हे स्वार व प्यादे आपले निसबतीचे, नेमणूक स्वाराची व प्याद्याची महालीं आहे, त्यांत ठेवणें ह्मणोन हुजूर सनदा घेऊन येतात, परंतु लढाईचे कामीं पडल्यास दरकदार याचे स्वार व प्यादे याचे वस्तु काम होत नाहीं, व कोणी कोणाचे आज्ञेंत रहात नाहीं. येविशींचा बंदोबस्त व्हावा ह्मणोन विदित केलें. ऐशास दरकदाराचे स्वार व प्यादे महालीं एकंदर न ठेवणें. तुह्मीं स्वार चांगले ठेऊन बंदोबस्त चांगला करणें. हजरी गणतीची चौकशी दरकदार करतील ह्मणोन. कलम १.

६७९–( ५२९ ) बदल देणें मुसा जारज फिरंगी यांजकडील रोजमरे, मागील तटले आहेत. त्यांपैकीं मोघम रसानगी यादी. रुपये ३०००० तीस हजार रुपये, कमावीस नजर बाबत राजे सरजेतसिंग, बुंधेले हिंदूपंत यांचे पुत्र यांजकडे गणेश संभाजी याचे मार्फातीनें नजरेचा ऐवज करार केला, त्याचा हवाला आबाजी नाईक बानवळे यांणीं घेतला आहे, त्यापैकीं बानवळे यांजकडून तूर्त देवविले. रुपये.

खमस सबैन मया व अलफ सफर २८

---

( 678 ) Reference is made to a shower of hail-stones of the size of a cocoanut in Parganá Bhelse and Khámkhedá. The Kamávisdár of the above Parganás represented that Darakdárs were frequently permitted by the Huzur to enlist their Sawárs and men in the sanctioned military establishment of the province; that the Sawárs and men so enlisted were useless for military purposes, and that, moreover, they were not amenable to discipline. Orders were issued for discontinuing the practice complained against, and the Kamávisdár was authorized to enlist men of his selection, the Darakdárs keeping a record of their attendance and their numbers.

A. D. 1776-77.

( 679 ) Rs. 30,000 were paid to Musá Naraji (George ?), a Portugese, in past ( ? ) payment of remuneration due.

A. D. 1777-78.

६८०—( ५७८ ) किल्ले असेर येथें तोफा आहेत, त्यांपैकीं तोफा येणें प्रमाणें सुमार.

तिसा सबैन मया व अलफ रजब १७

१३ पंचरसी.

| | |
|---|---|
| १ सुरजमुर्दी. | १ व्याघ्रमुखी. |
| १ चांद. | १ भवानी प्रसाद. |
| १ लक्ष्मी. | १ बहिरी प्रसाद. |
| १ सुमेरसिंग. | १ लक्ष्मण |
| १ गुलाब. | १ तक्कराव. |
| १ येशवंती. | १ महबूब. |
| १ मार्तंड. | |
| | १३ |

१० बीडीं.

| | |
|---|---|
| १ कालपहाड. | १ राजहंस. |
| १ हटी हणमंत. | १ दिलदार. |
| १ जयवंती. | १ दिलपसंत. |
| १ चंद्रवादल. | १ बिंद्रावन. |
| १ गरुड. | |
| १ मकरध्वज. | १० |

२३

एकूण तेवीस तोफा आणावयास तोफखान्याकडील कारकून व लोक हुजुरून पाठविले आहेत, तरी सदरील तेवीस तोफा व या तोफांचे उपयोगी सामान जें असेल तें देऊन, तोफा लौकर रवाना करणें ह्मणोन, केशवराव जगन्नाथ याचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

६८१—( ६०१ ) त्रिंबकराव नारायण राजेबहादर, यांचे नांवें, कीं तुमचे पथकाची गणती घ्यावयाकरितां गणेश संभाजी कारकून हुजुरून पाठविले असेत, तरी त्यांस गोट गणती व खंडी गणती देणें ह्मणोन. सनद.

तिसा सबैन मया व अलफ रबिलाखर ६

परवानगी रूबरू.

---

( 680 ) Twenty-three pieces of cannon were ordered to be sent to Poona from fort Asher. The names of the pieces are given.

A. D. 1778-79.

( 681 ) Ganesh Sambhάji, Kárkoon, was sent to take muster of the battalion under Trimbakrao Náráyan Ráje Bahádar.

A. D. 1778-79.

६८२–( ७५७ ) मुसा जारज फिरंगी यांजकडे सरकारच्या तोफा व बंदुका आहेत, त्यांची दागदोजी करावयास कोळसे वजन खंडी ३ खंडी कोळसे पडत अशीं लाकडें जळाऊ तर्फ पौडखोरें येथील रानपैकीं देविलीं असेत, तरी मशारनिल्हे माणसें पाठऊन तोडतील, त्यांस तोडूं देणें ह्मणोन, आनंदराव भिकाजी यांचे नांवें रसानगी, बाजी गोविंद, जवानी बाबूराव महादेव कारकून शिलेदार.

इसने समानीन मया व अलफ जमादिलाखर ७

सनद १.

६८३–( ८१५ ) तालुके व किल्ले हाय येथें इंग्रजाचे वगैरे गडबडेमुळें बंदोबस्ताकरितां नेहमीं नेमणुकेशिवाय जाजती नामजाद लोक पाठविले आहेत, ते हुजूर पाठऊन देणें; व जदीद ठेविले आहेत, ते दूर करणें ह्मणोन.

अर्बा समानीन मया व अलफ साबान २९

सनदा.

१ तालुके विजयदुर्ग निसबत गंगाधर गोविंद. असामी.

२६१ हुजुरून नामजाद पाठविले आहेत ते.

९६ माजी रायगडकरी.
१०२ माजी सातारकर.
११ माजी विसापूरकर.
२ हुजूर हशम.
५० गाडदी दिंमत हाजी हुसेन.

२६१

३५० तालुके मजकुरीं जदीद ठेविले आहेत ते हशम व गाडदी मिळोन.

६११ सनद.

१ तालुके सुवर्णदुर्ग निसबत मोरो बापूजी. असामी.

१४८ हुजुरून नामजाद पाठविले आहेत ते.

९० हुजूर हशम.
५८ किल्ले विसापूर पैकीं.

१४८

( 682 ) Musa Naraji ( George ), a Portugese, who was in charge of Government guns and cannon, was ordered to be supplied with 3 Khandies of coal.

A. D. 1781-82.

( 683 ) Additional men, entertained at the several Tálukás in Konkan in consequence of the disturbance of the English, were ordered to be disbanded, and the men, deputed from the Huzur for assistance, were ordered to be sent back.

A. D. 1783-84.

३५२ तालुके मजकुरीं जदीद ठेविले आहेत ते.

५००

सनद.

१ किल्ले माहुली निसबत दुर्गोजी शिंदे. असामी.

२२१ हुजुरून नामजाद पाठविले आहेत ते.

१४४ दिंमत आपाजीराव बोकसे.

७७ वसईकर लोक.

२२१

६० किल्ले मजकुरीं जदीद ठेविले आहेत ते.

२८१

सनद.

१ परगणे साकसे निसबत भास्कर लक्ष्मण, नामजाद लोक पाठविले आहेत ते असामी.

२४ निसबत त्रिंबक बल्लाळ यांजकडील लोक हुजूर पाठऊन देणें म्हणोन सालगुदस्तां आज्ञा जाहली असतां पाठविले नाहींत.

९७ माजी सिवी गडकरी.

१२१

सनद.

१ प्रांत राजपुरी निसबत गोविंदराव व चिमाजी माणकर. असामी.

११० हुजुरून नामजाद कुलाबकर पाठविले आहेत ते.

६४ प्रांत मजकुरीं जदीद ठेविले आहेत ते.

१७४

सनद.

१ प्रांत कल्याण भिंवडी निसबत गोविंदराम. असामी.

८८९ नामजाद हुजुरून पाठविले आहेत ते.

९९ हुजूर हशम.

४०० दिंमत मुसा मुंत्रम.

५४ दिंमत सिद्दी मुबारक.

१८६ दिंमत संताजी सिलकंदा.

५१ दिंमत अर्जुनजी बोकड.

९९ गाडदी निसबत बापूजी हरी.

८८९

१२१ प्रांत मजकुरीं जदीद ठेविले आहेत ते.

१०१०

सनद.

१ तालुके रेवदंडा निसबत आनंदराव शिंदे.

१०० हुजुरून नामजाद पाठविले आहेत ते.

१०० माजी रायगडकरी.

२ बणदार निसबत तोफखाना.

१०२ पैकीं माजी रायगडकरी.

९२ तालुके मजकुरीं जदीद ठेविले आहेत ते.

१९२

सनद.

१ तालुके वीरवाडी निसबत गणेश बल्लाळ, व हरी गणेश येथें जदीद ठेविले आहेत, असामी १०० येविशीं. सनद.

१ परगणे नसरापूर निसबत बाळाजी जनार्दन, नामजाद लोक दिंमत जाधवराव बेलासे निसबत हुजूर हशम असामी १०२ एकशें दोन येविशीं. सनद.

१ तालुके नेरळ निसबत हरी लक्ष्मण जदीद लोक असामी २५ ठेविले आहेत येविशीं. सनद.

१ तालुके अंजणवेल निसबत त्रिंबक कृष्ण येथें जदीद लोक असामी ११७ एकशें सत्रा येविशीं. सनद.

११

अकरा सनदा दिल्ह्या असेत. रसानगी, सदाशिव केशव दात्ये.

६८४–( ९.१५ ) अली वल्द मुदफरशा फकीर होऊन पेशर्जी येदगीरचे स्वारींत तोफखान्यांत राहिला होता. तो मारेकरी असें समजलें, सबब धरून आणून, बेडी घालून, कैदेंत ठेविला आहे, त्यास हल्लीं किल्ले सिंहगडास अटकेंत ठेवावयास बेडीसुद्धां रवाना केला आहे, त्यास किल्ले

सीत समानीन
मया व अलफ
रबिलावल १९

( 684 ) Alli Wd. Mudfarshá, who accompanied the artillery as a Fakir in the campaign of Edagiri, was reported to be an assassin. He was sent to prison.

A. D. 1785-86.

मजकुरीं अटकेंत ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, केशवराव जगन्नाथ किल्ले सिंहगड यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

६८५–( १००१ ) गाडदी दिंमत मुसा फेरात हा तुह्मांजवळ बिरादरीसुद्धां चाकरीस होता, त्यास तो मयत जहाला, सबब त्याची बिरादरी मुसा आलमेल फिरंगी याजकडे करार करून तैनात दरमहा पेशजींप्रमाणें. रुपये.

तिसेन
मया व अलफ
रबिलावल २९

| | | |
|---|---|---|
| १५५ | खुद्द जमातदार आफ्तागिरासुद्धां | १ |
| २० | बहिरो जिवाजी कारकून | १ |
| १५ | दफेदार | १ |
| ७५ | किरिस्ताव असामी | ५ दर १५ |
| १०० | गोरे फिरंगी असामी | ४ दर २५ |
| ९९ | गाडदी शेरेकरी असामी | ११ दर ९ |
| ९ | निम शेरेकरी भिस्ती व दिवट्या असामी | २ |
| ४७३ | | २५ |

एकूण चारशें त्र्याहत्तर रुपये पंचवीस असामींस करार करून देऊन, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी मुसा फेरात याचे दिंमतीचे लोक चोवीस तुह्मांजवळ चाकरीस आहेत, ते याचे हवालीं करून, चाकरी करून, सदरहू रुपये पेशजींचे शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, महादाजी अनंत यांचे नांवें. सनद १.

रसानगी याद.

---

( 685 ) A Portugese Musá Farot, employed under Government, having died, another Portugese ( मुसा आलमेल ) was appointed to the command of the battalion of the deceased. His salary was Rs. 155 a month. He had 4 Portugese on a salary of Rs. 25 each, a month; and 15(5) Christians on a salary of Rs. 15 each, and 11 Gárdis at Rs. 9 each, under him.

A. D. 1789-90.

# २ लष्करी खातें.

## ( ब ) आरमार.

### नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

६८६–( १९८ ) प्रांत वसई येथील कलमें. बीतपशील.

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

प्रांत वसई येथील कोळ्यांच्या महांगिऱ्या पन्नास आहेत, त्यांचा उदीम सालमजकुरीं गडबडीमुळें चालला नाहीं. सरकार कामावर नेहमीं आहेत, त्यांस पांच सहा महिने अडशेरी वगैरे पावत आहे, परंतु प्रजन्यकाळीं कुटुंबाचे बेगमीस चारमाही दरमहागिरीस भात पांच खंडी प्रमाणें देवावें, ह्मणोन तुह्मीं विनंति केली, त्याजवरून दर महांगिरीस भात खारें गोडें मिळोन खंडी ५ प्रमाणें कैली खंडी २५० अडीचशें एकसाला प्रांत मजकूर पैकीं देविले असेत; तरी चाकरीबद्दल पावते करणें. कलम १.

आगर वसई व आगाशी व माहीम व केळवें प्रांत मजकूर येथील भंडारी चौकी-पहारेयाचें काम नाकेबंदीचें करितात, सबब निमे घरपट्टी त्याजपासून सरकारांत घेत आहों ते सोडावी; ह्मणून तुह्मीं विनंति केली, त्याजवरून सदरहू भंडारी मजकूर चौकीपहारेयाचें काम करितात; सबब निमे घरपट्टी सरकारांत घेत आहां. ते नेहमीं सूट दिल्हे असे, तरी न घेणें. या ऐवजीं त्यांजपासून चौकीपहाऱ्याचें काम-काज घेत जाणें. कलम १.

---

# II MILITARY ADMINISTRATION.

## ( B ) Navy.

### FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

( 686 ) The following orders were issued to the officer of Prânt Bassein.

A. D. 1774-75.

1 The private boats in the province were, owing to disturbance in the country, unable to ply for trade and were employed all the while on Government duty. Subsistance-allowance was given to the boatmen for 5 or 6 months by Government, and provision was now made for the monsoon by granting 5 Khandies of corn to each ship.

1 The Bhandáris of Âgar, Bassein, Âgáshi and Kelwe did the duty of guarding posts, and half the house-tax on their houses was therefore remitted.

एकूण दोन कलमें करार करून दिल्हीं असेत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, विसाजी केशव यांसी सनद पुरंधर. छ. ५ रबिलाखर. ·सनद १.

रसानगी यादी.

६८७–( ७१३ ) आनंदराव धुळप यांस सनद कीं, आरमार विजयदुर्ग येथील बंदोबस्ताविशीचीं. कलमें.

इसन्ने समानीन मया व अलफ रमजान ५

दरकदाराचे वडिलाचे नांवानें याजमुळें पायमल्ली होऊन सरकारकाम होत नाहीं, सबब सर्व दरकदार यांस हुजूर आणून, आरमार तुमचे हवाला केलें असे, तरी तुह्मीं मेहनत करून आरमारची तयारी जलदीनें करणें. आणि इक्तियारीनें कारभार करून लोकांची उस्तवारी दिलासा करून चाकरी बजाऊन दाखवणें. कलम १.

आरमारची बेमरामत जाली येणेंकरून सरकार नुकसानी फार होते, सबब तुह्मांकडे अखत्यार सांगितला असे, तरी तीन पाल, व तीन गुराब, व तेरा गलबतें तयार करून, स्वारीस जाणें. यास ऐवज असावा. त्यास सौंदल महाल व कोलावण नेहमीं तुह्मांकडे आहे, याशिवाय तूर्त सरकारांतून वीस हजार रुपये तुह्मांकडे दिल्हे

दरकदार हुजूर राहिले तेथील लिहिण्याचें कामकाज चाललें पाहिजे, सबब कृष्णाजी नारायण हुजुरून नेमून दिल्हे आहेत. यांचे हातें साऱ्या दरकाचें तूर्त कामकाज घेणें, तुमच्या सांगितल्याप्रमाणें हे वर्ततील. कलम १.

आरमारचें काम इक्तियारीनें सांगोन पैदास्त करून, शिबंदीस खर्च करावा, ह्मणून तुह्मांस आज्ञा केली असे, तरी इंग्रजाचे वगैरे मसलतीमुळें, तुह्मांस चाकरी सांगितल्यास नेमणुकेप्रमाणें लोकांस ऐवज सरकारांतून पावेल. चाकरीस बोलाविलें नाहीं, तरी सरकारांतून बेगमी जाहली आहे. याशिवाय फिरंगियाचे काफल्याखेरीज बेकौली तरांडीं धरून आणून, त्यांत खर्च करून संभाळावें. कलम १.

विजयदुर्ग, व रत्नागिरी, व अंजणवेल,

---

( 687 ) The relations between Ánandrao Dhuḷap, Commander of the naval forces, and the Darakdárs under him being strained, the interests of the Government suffered. The Darakdárs were recalled, and the naval administration was left entirely into the hands of Dhuḷap.

A. D. 1781-82.

Krishṇáji Náráyaṇ was sent to do the writing business and was directed to act according to Dhuḷap's instructions. Dhuḷap was given Rs. 2000 in addition to the revenues of Saundal Mahal, and Kolávaṇ, and was directed to fit out 19 ships and to go on an expedition. He was informed that an additional amount would be given to him in case he was sent against the English, &c.

आहेत. यांत लागवड वगैरे खर्च करून सरकारचा कारखाना यथास्थित राखणें. याशिवाय पैदास्त करून त्यापैकीं, बेहड्या-प्रमाणें ऐवज घेऊन, बाकी राहील तो ऐवज सरकारांत देणें. गुदस्तांची शिल्लक ऐन जिन्नस सुद्धां असेल ती तुह्मीं सालमजकुरीं आरमारचे खर्चास घेणें. पैदास्त कमी जाहल्यास दुसरा ऐवज सरकारांतून पावणार नाहीं. सदरहू बेगमींत सरकाराचा कारखाना तयार राखोन यापैकीं, व पैदास्त पैकीं, मेळऊन लोकांची समजूत करणें. कलम १.

सीफातले व झाप व काथ्या व मीठ व गल्ला तालुके हाय पैकीं नेमून अलाहिदा सनदा तालुकदारांस दिल्ह्या आहेत. त्याप्रमाणें देणें. कलम १.

सुतार व लोहार व चांभार यांची वेठ नेहमीं तालुक्याची असेल, ते वजा करून बाकी राहील तें तुह्मांकडे देविलें असे घेणें. कलम १.

सरकारचे माणूस कोणाचे निसबतीस एकंदर न ठेवणें. कलम १.

व देवगड येथील दालदी व गावीत व कसबी भंडारी आहेत. त्यांपैकीं तालुक्याचे बेगमीस सालाबादप्रमाणें ठेऊन, बाकी तुह्मीं आरमाराकडे चाकर ठेऊन घेऊन जाणें. आरमारचे उपयोगी गैरदस्ती झाडें पाहून तोडणें, व दस्ती झाड सरकार कामामुळें जरुराती लागल्यास अगत्याअगत्य आरमाराकडे तोडून नेणें. आणि मामलेदारास लिहून देणें. त्याप्रमाणें रयेतीस दस्त मजुरा देतील. कलम १.

आरमाराकडे कारकुनांचा भरणा भारी आहे, त्यास सालमजकुरीं वीस पंचवीस कारकून चांगले लिहिणार मोसबेकरी व नेहमीं कामावर आहेत, त्यासुद्धां घालमेली नवेत असे निवडून ठेवणें, बाकी तूर्त रजेस लिहिणें. कलम १.

सरकार चाकरी लोक करतील त्यास चाकरीप्रमाणें तुह्मीं पाहून बक्षीस द्याल तें पैदास्तींत मजुरा पडेल. कलम १.

एकूण दहा कलमें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन. सनद १.

रसानगी यादी.

६८८–( ७७९ ) तालुके सुवर्णदुर्ग येथील आरमाराकडे गलबत महादेव नवें तयार आहे. त्याजवर लोकांची नेमणूक करून दिल्ही पाहिजे, ह्मणोन तुह्मीं विनंति केली, त्याजवरून महादेव गलबत नव बांदिस्त स्वारीचे उपयोगीं तयार जालें आहे, त्याजवर वरकड गलबतांचे अन्वयें लोकांची

सलास समानीन
मया व अलफ
सफर २७

(688) A new warship, named 'Mahádev', was prepared. It was manned by 30 Sepoys and 30 sailors and one Golandáj (Gunner). The total annual expenditure on account of the ship was Rs. 3,862-8.

A. D. 1782-83.

नेमणूक करून आरमारकरी यांचा शेरा दर असामीस पडतो, त्याप्रमाणें आकार. रुपये.

१९५० शिपाई असामी ३० एकूण आकार. रुपये.

१२३५ रोजमरे व कापड मिळोन दर असामीस शेरा रुपये ४१८॥ प्रमाणें. रुपये.

७१५ अडशेरी दर असामीस शेरा गल्ला कैली १।१।-॥। प्रमाणें खंडी ३९॥४।१॥ दर खंडीस रुपये १८ प्रमाणें रुपये ७१५ एकूण दर असामीस शेरा २३॥।-। प्रमाणें. रुपये.

१९५०

शेरा एकंदर असामीस रुपये ६५ प्रमाणें. रुपये.

१८४५ दर्यावर्दी असामी ३० एकूण आठमाही.

आकार. रुपये.

१३८० रोजमरे द्यावयाचे त्याचा शेरा दर असामीस रुपये ४६ प्रमाणें. रुपये.

३५१ अडशेरी दर असामीस दरमहा गल्ला ८१॥१॥ प्रमाणें कैली ·॥३ एकूण आकार कैली खंडी १९॥ दर खंडीस रुपये १८ प्रमाणें ३५१.

एकूण शेरा दर असामीस रुपये ११॥= प्रमाणें. रुपये.

११४ जिनसांना डाळ तूप मिळोन दर असामीस रुपये ३॥।-प्रमाणें रुपये.

१८४५

एकंदर शेरा दर असामीस रुपये ६१॥ प्रमाणें. रुपये.

६७॥ गोलंदाज असामी १ एकूण आठमाही आकार. रुपये.

५४ रोजमरे ८ दर ६॥। प्रमाणें.

११।≈ अडशेरी आठमाही कैली ·॥२॥। एकूण दर खंडीस रुपये १८ प्रमाणें.

२८- जिनसांना डाळ तूप मिळोन. रुपये.

० लंग.

६७॥

३८६२॥

एकूण तीन हजार आठशें साडे बासष्ट रुपये, एकसष्ट असामींस सालीना नेमणूक बेहेड्याशिवाय जाजती सालमजकुरापासून करार करून देऊन हे सनद सादर केली असे, तरी सदरीलप्रमाणें लोक आरमारचे कसबी मर्द माणूस ठेऊन, गलबतावर चाकरी घेऊन, चाकरी बमोजीब आदा करीत जाणें ह्मणोन, बापूजी याचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

---

## २ लष्करी खातें.

### ( क ) किल्ले.

६८९-( १३ ) जंजिरे रेवदंडा येथील हशमाची दफ्तरदारी गोविंद गणेश यांचे नांवें आहे, त्यास अशक्त जाहले, नेत्रांनीं दिसत नाहीं, सबब त्यांचे पुतणे लक्ष्मण बाबाजी यांचें नांवें करार केली असे, तरी मशारनिल्हेचे हा ूत सदरील दफ्तरदारीचें कामकाज घेऊन, वेतन बेहडेयाचे नेमणूकप्रमाणें पावीत जाणें ह्मणोन, आनंदराव शिंदे यांचे नांवें. छ. २९ माहे साबान. सनद १.

अर्बा सबैन मया व अलफ रमजान ३०

रसानगी यादी.

६९०-( १५ ) किल्ले सातारा येथें भरण्यास लोक कमी आहेत; आणि हल्लींतो गडबडेचे दिवस आहेत, यास्तव कांहीं लोकांची नेमणूक करून दिल्हियास बंदोबस्त करूं ह्मणोन तुह्मी विनंतिपत्र लिहिलें; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी गडबडेचे दिवस आहेत, सबब असामी ५० पन्नास ठेऊन बंदोबस्त करणें, लोक चांगले आपले खातरजमेचे इतबारी ठेवणें, सदरील असामी कमसेरेकरी अखेरसालपर्यंत ठेवणें ह्मणोन, नागोजी शिंदे व बाबूराव कृष्ण यांचे नांवें. छ. १५ रमजान. सनद १.

अर्बा सबैन मया व अलफ रमजान ३०

रसानगी यादी.

---

II MILITARY ADMINISTRATION.

( C ) Forts.

( 689 ) Govind Gaṇesh, Daftardár of the Hasham at fort Rewadaṇḍá, having become debilitated, the post was conferred on his nephew Laxamaṇ Báwáji.

A. D. 1773-74.

( 690 ) Owing to the troubled state of the country, 50 additional men were permitted to be entertained at Fort Satárá.

A. D. 1773-74.

६९१–( ९४ ) तालुके वसई येथील मामलत सालमजकुरीं विसाजी केशव यांस सांगितली असे. येविशीं. सनदा.

खमस सबैन मया व अलफ साबान ५

१८ किल्याचे व कोटाचे हवालदार व कारकून वगैरे यांस कीं, तालुके मजकूर येथील मामलत पेशजींचे मामलेदारांकडून दूर करून मशारनिल्हेस सांगितली असे, तरी तुह्मीं यांचे रजातलबेंत वर्तोन किल्याची व कोटाची अलंग नौबत चौकी-पहारा यथास्थित करीत जाणें ह्मणोन. सनदा.

१ गणाजी चंद्रराव मोरे नामजाद व कारकून जंजिरे वसई यांस.

१ रामाजीराव बोकसे हवालदार व कारकून जंजिरे अर्नाळा यांस.

| | |
|---|---|
| १ किल्ले वडर(ज्र)गड. | १ किल्ले भोपतगड. |
| १ किल्ले भवानगड. | १ कोट मांडवी. |
| १ किल्ले इंद्रगड. | १ कोट केळवे. |
| १ किल्ले अर्जुनगड. | १ कोट माहीम. |
| १ किल्ले असावा. | १ कोट शिरगांव. |
| १ किल्ले काल्दुर्ग. | १ कोट तारापूर. |
| १ किल्ले बल्लाळ. | १ कोट डाहाणू. |
| १ किल्ले सेवगा. | —— |
| १ किल्ले कुरंग. | १८ |

१ येसाजी शिवदेव यांस कीं, तुह्मीं मशारनिल्हे यांचे आज्ञेंत वर्तणूक करीत जाणें, ह्मणोन.

——
१९

रसानगी यादी.

---

( 691 ) The following 18 forts were under the control of the Mámlatdár of Bassein.

A. D. 1774-75.

| | |
|---|---|
| 1 Janjira Vasai. | 10 Kille Shewaga. |
| 2 Janjira Arṇáḷá. | 11 Kille Kurang. |
| 3 Vajragad Killa. | 12 Kille Bhopatgaḍ. |
| 4 Kille Bhawángaḍ. | 13 Koṭ Máṇḍavi. |
| 5 Kille Indragaḍ. | 14 Koṭ Keḷve. |
| 6 Kille Arjungaḍ. | 15 Koṭ Máhim. |
| 7 Kille Asáwá. | 16 Koṭ Shirgaon. |
| 8 Kille Káḷdurga. | 17 Koṭ Tárápur. |
| 9 Kille Ballaḷgaḍ. | 18 Koṭ Dáháṇu. |

| नक्त. | रुपये. |
| --- | --- |
| १३ | किल्ले शिवनेर. |
| १० | सदरे पुढील झेंडे यांस खाद्या सुमार पांच व काव रंगास वगैरे मिळोन. |
| ३ | दसऱ्यास बकरीं २ एकूण किंमत. |
| १३ | |
| ९ | किल्ले चांवड. |
| २ | तुलसीपूजन, व हुताशनी व दीपवाळी मिळोन. |
| ५ | चांदरातीस विड्याचे पानांबद्दल सालीना नेमणूक. |
| २ | पीर किल्ल्यावर आहे, त्याचे गलेफास शेल्याबद्दल. |
| ९ | |
| ५ | किल्ले कुंजरगड येथील दरवाजा नवा करून सालमजकुरीं लाविला त्यास रोगणाबद्दल. |
| २७ | |

| वजनी वजन. | पक्कें. |
| --- | --- |
| ८॥७ | किल्ले शिवनेर. |
| ८।= | मुसलमानांची ईद रमजान व मोहरमची, त्यास तोफांचे बार करावे लागतात, त्याची नेमणूक. |

| वजन. | पक्कें. |
| --- | --- |
| ८।· | दारू. |
| ८८= | आंबाडी बुचास. |
| ८।= | |

| वजनी वजन. | पक्कें. |
| --- | --- |
| ८८५ | तोफांचे व जेजाळाचे जामग्यास सूत. |
| ८॥· | किल्याचे गीर्दनवाईचे झाडें तोडितात, त्यांचे कमरेस चऱ्हाटें बांधण्याबद्दल आंबाडी. |
| ८॥७ | |
| ८१॥१ | किल्ले चांवड. |
| ८॥६ | चांदरातीस विड्याबद्दल सुपारी दरमहा वजन ८८३ प्रमाणें दरमाही. |

### FORT CHANWAD.

Rs.
2 For the worship of Tulsi.
2 For clothes to the Pir.

### FORT SHIWANER.

On account of gun-powder for firing cannons on the Eed of Ramján and Moharam.

### FORT KUNJARGAD.

On account of
Oil for lighting lamps before Hanumant and Pir.

८।५ दिव्यास तेल.

८८६ बिनी दरवाजा दरमहा ८८॥· प्रमाणें दरमाही.

८८९ सदर बालेकिल्ला दरमाहा ८८॥।· प्रमाणें दरमाही.

८।५

८।· गस्तीस जातां लोक दुखावतात, त्यांस द्यावयास तूप व तेल मिळोन वजन. पक्कें.

८८५ तूप.

८८५ तेल.

८१॥१

८८९ किल्ले जिवधन येथील सदरेस तेल दरमहा वजन ८८॥।·प्रमाणें दरमाही दिव्यास.

८।= किल्ले कुंजरगड येथील हनुमंत व पीर आहेत, त्यांस दीपाबद्दल तेल दरमहा वजन पक्कें ८८१ प्रमाणें दरमाही.

८।२॥।९

एकूण सत्तावीस रुपये नक्त व पावणे तीन मण नव शेर वजन पक्कें सालीना जाजती खर्च नेमून दिला असे. चौकशीनें खर्च करणें ह्मणोन, उधो विरेश्वर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी. छ. २२ रबिलावल.

६९६–( ३३९ ) तालुके अवचितगड येथील किल्यावरील लोकांचे कबिले तोतयाचे

( 696 ) The members of the families of the men, employed at the fort of Awachitgad, were, in consequence of the insurrection raised by the Impostor, taken into the fort. The

A. D. 1776-77.

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

गडबडीमुळें किल्यावर घेतले आहेत, त्यास तोतयाची गडबड वारेतों ज्या असामींचे कबिले किल्यावर आले असतील त्यास दर असामीस कबज अडशेरी बद्दल दरमहा १ एक प्रमाणें देविला असे, तरी तालुके मजकूरचे ऐवजीं सदरहूप्रमाणें देत जाणें. गडबड वारल्यावर मना करणें; व तालुके मजकूरचे चाकरमाने लोकांकडे नवे पट्टीबद्दल ऐवज येणें आहे, तो सालमजकुराचे रोजमरेयांत वजा करून घेतां, तो तूर्त न घेणें. सालमजकूरचे अखेर रोजमरेयांत वजा करून पुढें घेणें ह्मणोन, आबाजी बल्लाळ, व भास्कर महादेव यांचे नांवें. छ. ५ रजब.

सनद १.

परवानगी, राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस.

६९७–( ४०२ ) किल्ले सिंहगड येथील कारखानिशी विठ्ठल येशवंतराव पोतनीस

सबा सबैन मया व अलफ मोहरम २

यांजकडून बापूजी कमाजी यांजकडे होती, त्यास सन इसन्ने सबैनांत किल्ले मजकुरीं वीज पडोन दारूखाना उडाला. ते समईं कारखानीस मशारनिल्हे कबिला मुद्धां घरदार उडोन गेले; तेव्हां त्यांचे बंधु बाजीराव कमाजी यांचे नांवें कारखानिसी हुजुरून करार करून देऊन चालविली. सन तिगस्तां दरक संबंधें कर्जाचा ऐवज सरकारांत घेतला; व सालमजकुरीं तोतयाच्या बखेड्यांत कारखानीस व यांचे तर्फेचा कारकून किल्ले मजकुरीं नवता; ह्मणोन विदित जालें; त्यावरून पूर्ववत्‌प्रमाणें बाजीराव कमाजी यांकडे किल्ले मजकूरची कारखानिशी करार करून वेतन सालीना रुपये २०० दोनशें पेशजींप्रमाणें करार करून देऊन पाठविले असेत, तरी यांपासून किल्ले मजकूरचे कारखानिशीचें कामकाज घेऊन, वेतन पेशजींप्रमाणें पाववीत जाणें ह्मणोन, नारो महादेव यांचे नांवें.

सनद १.

रसानगी यादी.

६९८–( ६०० ) रामाजीराव राणे हवालदार किल्ले चांवड तालुके शिवनेरी हे सिंह-

men were therefore granted an allowance of Rupee 1 each per month so long as the disturbance lasted.

( 697 ) The office of Kárkhánnis at fort Sinhgar was held by Bápuji Kamáji on behalf of Vithal Yeshwantráo Potnis. He and his family, with their house, were blown up in Isánne Sabain in the explosion of gun-powder, which was caused by the descent of lightning at the fort. The office was therefore conferred on his brother and was continued to him, as he was not implicated in the conspiracy formed in favour of the Impostor.

A. D. 1776-77.

( 698 ) The Havåldár of fort Chánvad was desirous to go to the

तिसा सबैन मया व अलफ रबिलाखर ४ — स्थाचे गंगास्नानाकरितां जाणार, त्यास किल्ले मजकूरच्या बंदोबस्तास त्यांचे पुत्र दोघे किल्ले मजकुरीं नेहमीं चाकरीस आहेत, ऐशास गंगास्नानास जाण्याविशीं सरकारची आज्ञा असावी, ह्मणोन राजश्री बाळाजी जनार्दन फडनीस यांस तुह्मीं लिहिलें; त्यावरून रामाजीराव राणे यांस गंगास्नानास जावयाची आज्ञा करून त्यांस अलाहिदा पत्र सादर केलें असे, तरी मशारनिल्हेचे पुत्र बाबूराव राणे यांस हवाल्याचे कामकाजास ठेऊन किल्ले मजकूरचा त्यांजकडून बंदोबस्त करऊन मशारनिल्हेस गंगास्नानाकरितां पंधरा रोजांचा निरोप देणें. गंगास्नान करून आल्यावर पेशजीप्रमाणें हवाल्याचें कामकाज मशारनिल्हेपासून घेत जाणें ह्मणोन, बाळाजी महादेव तर्फ मजकूर यांस. पत्र १.

सदरील अन्वयें रामाजीराव राणे हवालदार यांस. १.

―――

२.

परवानगी रूबरू.

६९९.–(६३५) सेनाधारी व सेनालेखक, किल्ले गडगडा, तालुके कावनई, यांस

समानीन मया व अलफ साबान २० — कीं, किल्ले मजकूर येथील हवाला येशवंतराव भोसले यांजकडे होता, तो दूर करून हल्लीं कादरखान वलद नथेखान यांस सांगोन पाठविले असेत. तरी यांचे रजेतलबेंत वर्तोन किल्ले मजकूर येथील अलंग नौबत, चौकी पाहरा करून किल्ला हुशार राखणें ह्मणोन. सनद १.

रसानगी यादी.

७००.–(७०८) जंजिरे उंदेरी येथील हवाला पेशजीं बाळाजी विश्वासराव यांस

इसन्ने समानीन मया व अलफ साबान ९ — होता. ते सन सबा सबैनांत मयत जाहले, त्यापासून मशारनिल्हेचा लेक भवानजी विश्वासराव याचे हातें सुभाहून हवाल्याचें काम घेत आले, हुजूरची सनद सादर जाहली नव्हती, सबब भवानजी विश्वासराव यांस हुजूर आणून, सालगुदस्त सन इहिदे समानीनापासोन जंजिरे मजकूरचा हवाला सांगोन वतनें.

---

A. D. 1778-79. — Godáwari for bathing, that being the year in which the sun entered the Sign of Lion, and applied for a fortnight's leave. The leave was granted and his son was appointed to officiate for him.

(699) The office of Hávaldár of fort Gadgadá was taken away from Yeshwantrao Bhosle, and conferred on Kádarkhán Wd. Nathekhán.

A. D. 1779-80.

(700) A new Haváldár was appointed to the fort of Underi. Security was taken from him. The following were some of his duties.

A. D, 1781-82.

असामी.

१ खुद्द.

१ पोरगा.

१ दिवट्या.

―――

३

एकूण तीन असामींस जंजिरे मजकुरीं पेशजीं पावत आहे, त्याप्रमाणें तैनात शाई शिरस्ता दरमाहे. रुपये २८

पैकीं रोजमरा दुमाही. रुपये २०॥

सालीना मोईन.

अर्ज बाब नक्त रुपये १० कापड मोईन बक्षीस. रुपये २०

दरमाहे अडशेरी खुद्द व पोरगा व दिवट्या मिळोन रोजमरेयाशिवाय, भात कैली साडेतिशेरी. मापें ८३

तेल दिवटीस दरमहा वजन. पक्कें ८८२॥

तैवजाची नेमणूक सुभा आहे त्यापैकीं, यांस पावत आहे दरमाहे.

पानें विड्याचीं. सुमार ७५० सुपारी. वजन. पक्कें ८८।९

एकूण असामी तीन पैकीं ऐन एक व पोरगा एक व दिवट्या एक यांसी तैनात शाई शिरस्ता दरमाहे अठ्ठावीस रुपये पैकीं दुमाहे रोजमरा साडे वीस रुपये यास सरसालांत पावती रोजमरे व भर माहे एक व कापड तैनातेप्रमाणें अठ्ठावीस आंख सरसाल चाकरीस व अडशेरी दरमाहे भात साडे तिशेरी तीन मण, व तेल दिवटीस दरमाहे वजन पक्कें अडीच शेर, व सालीना अर्जबाब नक्त दहा रुपये व कापड मोईन बक्षीस आष्टोस हुजूरची पेशजीं नेमणूक, व सुभा तैवजाची नेमणूक आहे त्यापैकीं यांस दर माहे पानें विड्याचीं साडे सातशें व सुपारी वजन पक्कें दीड पाव सुभा पावत आहे, त्याप्रमाणें यांस नेमणूक सालगुदस्त अवल सालापासून करार करून जंजिरे मजकुरीं हवाल्याचे चाकरीस आहेतच. यांस हुजूर आणून हवाला करार करून पाठविले आहेत, यांस जामीन आनंदराव बिन यशवंतराव चवाण कान्हगराव देशमुख, तर्फ अंजनवेल, सुभा दाभोळ हुजूर घेऊन जामीन कतबा दप्तरीं विल्हेस लाविला असे, हवाल्याची कैद कानू यांचे हातें घेऊन, वेतन पेशजीं बमोजीब सदरहूप्रमाणें पाववीत जाणें, या खेरीज कलमें.

---

1 To sign and seal the accounts of grain &c. received in the store,

1 Do the daily accounts of the store,

1 To receive information of out-going and incoming vessels,

1 To receive information regarding soldiers going on and returning from leave,

1 To be present at the monthly muster-roll.

1 To accord permission to soldiers wishing to go out of the fort,

दिमतीस लोक पेशजीं नाहींत, सबब हल्लीं असामी २५ पंचवीस हुजूर करार करून नांवनिशीवार नेमणूक जाबता अलाहिदा लेहून पाठविला आहे, त्याप्रमाणें चाकरी घेऊन रोजमरे व अडशेरी व कापड द्यावयाचा शिरस्ता जाबत्यास लिहिला आहे, त्याप्रमाणें चाकरी बमोजीब पाववीत जाणें. हे लोक जंजिरे मजकूरचे बेहडेयाचे भरण्यांत ठेऊन यांचे ऐवजीं दुसरे दूर करणें.

कलम १.

बाळाजी विश्वासराव सन सबा सबैनांत मयत जाहल्यापासोन भवानजी विश्वासराव हवाल्याचे कामास सुभाहून ठेऊन पेशजींप्रमाणें वेतनाची पावती जहाली. त्यापासून कबजे करावी. कलम १.

भवानजी विश्वासराव याजबरोबर जंजिरे मजकूरपैकीं शिपाई असामी.

१ संताजी तानाजी कदम.

१ सूर्याजी लखमोजी सणस.

१ दादजी रामजी संकपाल.

---

३

एकूण तीन असामी रवाना केल्यापासून हुजूर चाकरी जहाली आहे, यांचे रोजमरे व अडशेरी राहिली असेल ते देणें.

कलम १.

हवाल्याची कैदकानू चालावी त्यापैकीं तूर्त चालते. कलमें.

१ कोठी व मुलकी धारा, वगैरा जिन्नस येईल त्याचे जमाबर्चावरी मोर्तब होत आहे.

१ कोठीचे कीर्दीवरी शिक्का मोर्तब होत आहे.

१ गलबत बाहेर जातें येतें त्याचा दाखला आहे.

---

३

एकूण तीन कलमें चालवितां, याखेरीज चालवीत नाहीं तीं. कलमें.

किल्याचे रोजनिशीवर शिक्का मोर्तब बलकवडे व महादाजी कृष्ण यांचे कारकीर्दींत होत होते त्याप्रमाणें चालवणें.

१ रजेस शिपाई जातो तो समजतो, परंतु येतो त्याचा दाखला समजत नाहीं, त्यास येईल त्याचा दाखला समजावणें.

१ दरमहा हजिरी होईल तेसमई यांस जवळ बसऊन हजिरी घेणें.

१ दरवाज्याबाहेर शिपाई जातो येतो, तो बहुतेक यांचे परवानगीनें जातो येतो, त्याप्रमाणें असावें; यांचे परवानगी शिवाय जाऊं येऊं नये.

---

४

एकूण चार कलमें हल्लीं चालवावयाची आज्ञा केली असे, तरी सदरहूप्रमाणें चालवणें. कलम १.

यांचे नांवाचा शिक्का हल्लीं पाहिजे, त्यास जुना शिक्का बाळाजी विश्वासराव यांचे नांवाचा आहे, तो मोडून नवा यांचे नांवाचा करून देणें. कलम १.

एकूण पांच कलमें सदरहू लिहिल्याप्रमाणें करणें ह्मणोन, गणेश बल्लाळ यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

७०१–( ७३५ ) किल्ले उंदेरी येथील कोठीची मोजदाद करावयाकरितां सरकारांतून दादो महादेव कारकून शिलेदार यांस पाठविले असेत, तरी मशारनिल्हे किल्ले मजकूर येथील कोठीची मोजदाद करितील, त्याचा जाबता करून देणें ह्मणोन, गणेश बल्लाळ यांचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ मोहरम ८

परवानगी रूबरू.

७०२–( ७६९ ) त्रिंबक कृष्ण तालुके अंजनवेल यांचे नांवें पत्र कीं, किल्ले मजकूर येथील हवाला धोंडजी पाटवर्णे याजकडे आहे, त्यास हवाल्याचे कैदकानू वगैरे बंदोबस्ताविशीं मशारनिल्हेचें पत्र हुजूर आलें, त्याजवरून ठराव करून दिल्हा. कलमें बीतपशील.

सलास समानीन मया व अलफ रजब २८

मशारनिल्हेचे पथकाचे लोक तेथें आहेत, त्यांचा रोजमरा नांवनिशीवार ज्याचे त्याच्या हातावर तुह्मीं वांटणी करितां, त्यास तालुके मजकूरच्या सर्व लोकांचे रोजमरेयाची वांटणी करीत असाल त्याप्रमाणें यांच्या पथकाची करणें. कलम १.

सुभा निसबत व किल्ला निसबत कोठीच्या किल्ल्या सुभा असतात, त्यास सुभा निसबत कोठीच्या किल्ल्या सुभा असाव्या. किल्ला निसबत कोठीच्या किल्ल्या हवालदाराकडे ठेवीत जाणें. कलम १.

बंदरकिनारा किल्ल्याचे लोकांचा रोजमरा सन समान सबैनापासून तकूब होता, तो सन समानीनापासून देविला असतां यांचे लोक किल्ल्यांत नेहमीं असोन रोजमरा दिल्हा नाहीं, तो दुसाला समानीन व इहिदेचा ऐवज नेमणुकेपैकीं राहिला असेल तो सदरहू दुसालांत चाकरी जालेले लोक हजीर असतील त्यांचा देणें; व पुढें सन इसन्नेंत किल्ल्याचे व सुभाचे लोकांचे मिळोन तकूब रोजमरेयाविशीं सनद सादर आहे त्याप्रमाणें करणें. कलम १.

( 701 ) A kárkun was sent to examine the stores at fort Underi.
A. D. 1781-82.

( 702 ) The following instructions were issued for the guidance of Trimbak Krishṇa, Mámlatdár of Anjanwel, and Dhondji Pátvaṇe, the Haváldár of the fort of Anjanwel.
A. D. 1782-83.

1 The keys of the store-room of the Táluká should be kept by

कृष्णाजी पाटणे यासी किल्ले विजयगड येथील हवाला होता, तेव्हां तोतयास मिळाला, सबब पुढें त्याचा खंड रुपये बाराशें जाला ते धोंडजी पाटणे याचे वरातेंत वजा केले आहेत, ते यांणीं हवाला घेतला असिल्यास वजा केले तें ठीक केलें, हवाला घेतला नसिल्यास माघारे देऊन, कृष्णाजी पाटणे यांजपासून वसूल कराराप्रमाणें घेणें. कलम १.

किल्याचे दरवाज्याची परवानगी हवालदाराची. पडकोटच्या दरवाज्याची परवानगी सुभेदाराची. त्यास किल्याचे दरवज्यास सुभेदारांनीं चार असामी खबरदारीबद्दल ठेवणें तर ठेवावे, त्यास हवालदारांनीं दिक्कत करूं नये. पडकोटच्या दरवाज्यास हवालदारांनीं दोन असामी ठेवावे, त्यास सुभेदारांनीं दिक्कत करूं नये. किल्लेकरी लोकांची परवानगी किल्याचे व पडकोटचे दरवाज्यास हवालदाराची व पडकोटचे दरवाज्यास सुभा निसबत व मुलकी माणसास परवानगी सुभेदाराची. येणेंप्रमाणें असावें. कलम १.

पडकोटच्या दरवाज्याच्या किल्या सुभा ठेवीत जाणें. किल्याचे दरवाज्याच्या किल्या हवालदाराकडे रहातील. कलम १.

मशारनिल्हेच्या पथकाचे लोक हुजूर येऊन पाठविले, त्यापैकीं कांहीं गेले, त्यांचे ऐवजीं दुसरे ठेविले यामुळें तैनात कमी केली असलियास माणूस पाहून तैनात करणें ते जुन्या शेऱ्याचे अन्वयें करावी. अदावतीनें उगेच घालूं नये; सनदेचे नेमणुकेप्रमाणें मशारनिल्हेच्या पथकाचे लोक राखावे. कलम १.

किल्लेकरी लोक रजेस जाणें, अगर रजेपैकीं किल्यास येणें, तर सुभा दाखला देऊन जावें यावें. कलम १.

लांकूडफाटें, व पान व किरकोळ कामगारी एका दोहों रोजाचे किल्लेकरी जाणें तर हवालदाराचे परवानगीनें जावें यावें. कलम १.

किल्यांत लोक आहेत, त्यांत कितेक मातबरही आहेत; त्यांस किल्या निसबत सरकार काम असेल तें हवालदारांनीं

the Subhá ( Mámlatdár ), and those of the store-room of the fort should remain with the Haváldár.

1 The keys of the door in the outer wall of the fort should be kept by the Subhá, and those of the door of the fort proper by the Haváldár.

1 Permit to pass the fort door should be given by the Haváldár, and that to pass the outer door by the Subhá.

1 Four men of the Subhá should stay at the fort-door and 2 men of the fort should stay at the outer door, for assistance.

1 The men in the fort when going on or returning from leave should send intimation to the Subhá. The Subhá should not grant leave to the fort people direct.

गलबत वगैरे बाहेरून बंदरांत येईल त्याची परवानगी हवालदाराकडे लागावी. सुभेदारास पुसोन येऊं द्यावें; व बाहेर जाईल त्यास सुभाची परवानगी बंदरावरील बुरजास लागल्यावर हवालदारास पुसोन जाऊं द्यावें. गलबताचा झाडा सुभेदारांनीं व हवालदारांनीं घ्यावा. कलम १.

किल्लेकरी लोकांस सुभाहून परभारें रजा देऊं नये. कलम १.

किल्याची कारसाई व सरंजाम हंगामशीर सुभाहून पावता करावा, हवालदाराचे संसाराची बेगमी लांकूडपाठ्याची कार्याकारण करावी. कलम १.

किल्लेकरी लोकांचे रोजमरेयाची वांटणी करणें ते हवालदाराचे पथकसुद्धां सुभाचा कारकून पाठऊन किल्याचे दरकदार व हवालदार यांचे गुजारतीनें वांटणी करावी. कलम १.

सांगावें. त्यांणीं हवालदाराचे सांगितल्याप्रमाणें करावें. एकादा दिक्कत करूं लागल्यास सुभाहून ताकीद करावी. हवालदारांनीं माणसाचे स्वरूपाप्रमाणें चाकरी घ्यावी. उगेंच कोणावर रागें भरूं नये. कलम १.

दाभोळचे तरीवर किल्याकडील शिपाई असतो, त्यास तरीवर चिठी किल्याची चालत नाहीं, याजकरितां किल्याकडील शिपाई नसावा; ह्मणून हवालदाराचें बोलणें, याजकरितां किल्याकडील शिपाई आहे तो किल्यांत पाठऊन सुभाचा शिपाई ठेऊन तरीची खबरदारी करणें. कलम १.

सुभाचे कोठींपैकीं किल्लेकरी यास अडशेरी घालणें जाली तरी किल्याकडील चिठी नांवनिशीवार यावी, त्याप्रमाणें कारखानिसानें द्यावी. कलम १.

किल्याकडील कारसाई चूड, ओढा वगैरे नेमणुकेप्रमाणें खर्च होणें ते हवालदाराचे परवानगीनें व किल्याकडील चिठीनें खर्च करावा. कलम १.

सतरा कलमें करार करून दिल्हीं आहेत. याप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, चिटणिसी.

पत्र १.

---

1 The permission of the Havâldár should be sufficient authority for a man in the fort to go out on business for a day or two.

1 The Havâldár should assign duties to the fort-people according to their capacity. If anybody objected, the Subhá should warn him.

1 Permission to land boats coming into the harbour should be given by the Havâldár; when boats were going out, the permission of the Subhá should be obtained.

1 The duty of searching boats should be performed by the Havâldár and Subhá together.

&c. &c. &c.

७०३–( ७८६ ) तालुके शिवनेर येथील किल्ले हायचे लोकांचे रोजमरेयाचे बोभाट फार दिवस पडिले आहेत, त्याचा बंदोबस्त होऊन येत नाहीं; व अखेर साल समीप आलें, त्यास किल्याच्या चातुरमासाच्या बेगम्या अद्याप जाहल्या नाहींत, याजकरितां हल्लीं हुजुरून आपाजी बाबाजी, व गणेश संभाजी कारकून पाठविले असेत, तरी साल गुदस्तां व साल मजकूरचा ऐवज तुह्मीं वसूल घेतला असेल, त्यापैकीं खेरेदी गल्ला व लोकांचे रोजमरेयापैकीं ऐवज दिल्हा असेल, तो वजा करून बाकी ऐवज राहील तो, सरकारचे कारकुनाचे हवाला करणें. हे लोकांस वांटणी करितील; व गल्ल्याची खेरेदी करून किल्याचे बेगमीस देतील. तुह्मी याजउपर मुलखांत वसुलाविशीं रोखापत्र एकंदर न करणें, पुढील वसूल हे करून किल्याचे बेगमीस ऐवज देतील. तुह्मीं वसूल आजपावेतों केला आहे, तो याचे हवाला करणें ह्मणोन, कृष्णाजी रामचंद्र यांचे नांवें. सनद १.

सलास समानीन मया व अलफ रबिलाखर ९

येविशीं महालकरी व मोकदम तालुके मजकूर यांचे नांवें सनदा कीं, साल गुदस्तां व सालमजकूरचा ऐवज कृष्णाजी रामचंद्र यांजकडे दिल्हा असेल, तो उभयतांकडे रुजू करून देणें व पुढील वसूल हे घेतील. कृष्णाजी रामचंद्र यांजकडे न देणें ह्मणोन. सनदा २.

१ मोकदम देहाय यांस.

१ महालकरी यांस.

२

३

परवानगी रूबरू.

७०४–( ८५५ ) जंजिरे रत्नागिरी तालुके मजकूर येथील बंदराकडील तटाचें काम हयग्रीव बुरुजाचे उत्तरेस खचलें आहे तें बांधावें लागतें, त्यास बंदरालगती जागा पर्जन्य आहे तों काम तयार जालें पाहिजे; परंतु लोकांचा भरणा भारी असल्याविना काम लौकर आटोपणार नाहीं; याजकरितां आरमारकरी लोक रजेस घातले आहेत, ते कामावर हजीर धरून काम तयार करा-

खमस समानीन मया व अलफ रमजान १९

---

( 703 ) The wages of the men at the Táluká of Shiwaner having long remained unpaid, and no provision having been made in the fort against monsoon, 2 Kárkoons were sent from the Huzur to arrange about the matter, and the officer of the Táluká was directed to hand over to them all the balance in his possession.

A. D. 1782-83.

( 704 ) Sanction was ordered to the repair before the monsoon of a bastion called हयग्रीव ( horse-neck ), in the fortifcations on the sea-side of fort Ratnágiri, which had fallen down,

A. D. 1784-85.

वयाची आज्ञा जाली पाहिजे, ह्मणोन तुह्मीं हुजूर विनंति केली; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी जंजिरे मजकूर येथील बंदरकिनारा तटाचें काम खचलें आहे, तें पर्जन्यकाळांत आरमारें चालतीं न जालीं तों तयार जालें पाहिजे, त्यास आरमारकरी लोक रजेस आहेत, ते हजीर धरून तटाचें काम जलदीनें तयार करणें. आरमारकरी लोकांचा गैरहजिरीचा आकार अडशेरीसुद्धां तालुके मजकूर येथील साल गुदस्त सन अर्बा समानीनचे अजमासास वजा केला आहे तो. रुपये.

६९० नक्त.

३७४॥८ गल्ला कैली साडे तिशेरी बारुळे मापें खंडी १६॥=॥ एकूण किंमत फ्रोक्ताचे निरखानें, दर खंडीस रुपये २२॥ प्रमाणें. रुपये.

---

१०६४॥८

एकूण एक हजार चवसष्ट रुपये एक आणा वजा केले आहेत, त्यापैकीं दोनशें चवदा रुपये एक आणा, या बेरजेपुरती गैरहजिरी साधून बाकी साडेआठशें रुपये हजिरीस आरमारकरी लोक लागतील, त्याचा ऐवज सरकारांतून एकसाला मजुरा दिल्हा जाईल ह्मणोन, महिपतराव कृष्ण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

७०५–( ९७३ ) किल्ले कोथळागडचे पायथळालगत मौजे मालेगांव तर्फ अंदरमावळ येथील रान आहे तें राखोन अडचण ठेविल्यास किल्याचे उपयोगी, याजकरितां हैबतराव माणकेश्वर यांस आज्ञा केली आहे, त्यास ते रानाची हद्द नेमून देतील, त्याप्रमाणें रान राखणें. शेतेंपोतें कोणास करूं न देणें, त्या रानापैकीं किल्याचे कारसाईस, चुडी व ओंडे घेत जाणें ह्मणोन, संभाजी भावे हवालदार व [illegible]रकून किल्ले मजकूर यांचें नांवें. सनद १.

सीत समानीन
मया व अलफ
जिल्काद ११

परवानगी रूबरू.

७०६–( १०२३ ) गणपतराव शिर्के हवालदार जंजिरे वसई यांणीं विनंति केली कीं, कोटांतील पाणी वाईट, व हवा सर्द, नेहेमींच राहिल्यानें आजार लागतो, यास्तव किल्याबाहेर सुभा आठा चोहोंरोजीं येऊन जाण्याविशीं आज्ञा असावी ह्मणोन; त्याजवरून किल्यांतील हवा सर्द, याजमुळें

इहिदे तिसैन
मया व अलफ
जमादिलावल १६

---

( 705 ) The forest at Málegaum in Andar-Mával, which lay at the foot of the fort of Kothalágad, was ordered to be preserved as being necessary for the safety of the fort.

A. D. 1785-86.

( 706 ) Ganpatrao Sirke, Havâldár of fort Bassein, represented that the climate of the fort was damp, and that water was bad, and requested that he might be allowed to visit the

A. D. 1790-91.

आठा चोहोंदिवशीं सुभा बाजीपुरा येथें येतील त्या दिवशीं, किल्याचे बंदोबस्तास चांगला माणूस ठेऊन, सुभा येऊन, फिरोन संध्याकाळीं किल्यांत जाऊन बंदोबस्त करितील. त्यास सदरहूप्रमाणें करवीत जाणें ह्मणोन, गणपतराव जिवाजी तालुके वसई यांचे नांवें. सनद १.

रसानगी याद.

७०७–( ११९६ ) बापूजी शिंदे याचे नांवें सनद कीं, किल्ले धारवाड येथील दरवाज्याचे परवानगीचा वगैरे तुमचा व बाबूराव साळोखे हवालदार यांचा खटला पडला आहे, त्यास किल्याचें काम नाजूक, तुह्मीं ज्याचें काम त्याचे हातून घेऊन साऱ्यांनीं एकविचारें राहून किल्याचा बंदोबस्त राखावा, तें न होतां तुमचे उभयतांचे कटकटीमुळें दरवाजे किल्याचे वेळचे वेळेस न लावितां, एके दिवशीं बाहेरील दरवाजा उघडा राहून आंतील दोन दरवाजे दोघांनीं लावले. माणसामाणसांत कटकटी होतात, व बाहेरील मनुष्य हवालदाराचे परवानगीवांचून सदरेपर्यंत जातें ह्मणोन हुजूर विदित जाहलें. ही गोष्ट चांगली नाहीं. हल्लीं किल्याचे बंदोबस्ताविशीं.

खमस तिसेन
मया व अलफ
रबिलावल ४

कलमें.

१ तुह्मीं किल्यांत राहून महालचा कारभार करितां; याजमुळें महालांतील वगैरे लोक आंत मनस्वी येतात जातात, याणें किल्याचा बंद राहत नाहीं, यास्तव तुह्मीं बाहेर पेठेंत राहून महालचा कारभार करीत जाणें. किल्यांत तुह्मांस राहणें, तर बाहेर पेठेंत येऊन कारभार करावा. आंत राहून किल्याचें मात्र कामकाज, देखरेख करीत जावी. कलम.

१ किल्यांत लोक येतील जातील त्यांची परवानगी तुह्मीं हवालदार यांस सांगावी. हवालदारांनीं दरवाज्यास सांगत जावी. परभारें तुह्मींच सांगों नये. कलम.

१ किल्यांतील भरतीचे लोकांची रजा व कामगिरी व हजिरी व वांटणी करणें ते हवालदार, व दरकदार, यांस सदरेस बसऊन करीत जाणें, त्यांचे इतल्याखेरीज न करणें. कलम १.

---

town of Bájipoorá once a week for change. Permission was granted, but he was directed to return to the fort in the evening.

( 707 ) A dispute having arisen between Bápuji Scindiá, the officer of the fort of Dhárwár, and Báburao Sálokhe, Hávaldár of the fort, regarding their respective control over the fort, the following instructions were issued:—

A. D. 1794-95.

1 To prevent too many people frequenting the fort, Bápuji should transact business of his mahál outside the fort, though he might continue to reside in the fort.

1 Permission to admit men in the fort should be communicated by Bápuji to the Havaldár, and not to the gate-keepers direct.

१ दरवाजे व कोठ्याच्या किल्या हवालदार याजवळ ठेवीत जाव्या, दरवाजे व कोठ्या उघडणें व लावणें तें वेळचे वेळेस तुह्मीं हवालदारास परवानगी सांगोन करवीत जाणें. कलम.

१ हशमनीस व हशमाचे फडणीस पेशजींपासून किल्यांत राहून दरकाचें कामकाज करितात, त्याप्रमाणें हल्लीं किल्यांत राहातील. दरकाचें काम ज्याचे त्याचे हातून घेत जाणें. कलम १.

५

एकूण पांच कलमें लिहिलीं असेत, सदरीलप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, मशारनिल्हे यांचे नांवें. सनद १.

रसानगी, त्रिंबकराव नारायण परचुरे कारकून निसबत दप्तर.

७०८–( ११२७ ) बाल सावंत भिरवडेकर हवालदार किल्ले पारगड याचे नांवें सनद कीं, तुह्मांस किल्ले मजकूरचा हवाला सांगोन पाठविलें, त्यास तुह्मीं लोक घेऊन गेलां ते साळशी वगैरे तालुक्यांतील किल्यांत उपयोगी नाहींत, यास्तव तुह्मांस मात्र किल्यावर घेऊन लोक माघारे लाविले, ह्मणोन किल्लेकरी यांणीं विनंतिपत्र पाठविलें. ऐशास साळशी वगैरे तालुक्यांतील लोक ठेविले असतील ते दूर करून स्वदेशी कलानिधि तालुक्यांतील चांगलें माणूस ठेऊन त्रिंबकराव येशवंत मामलेदार यांस दाखवणें. मशारनिल्हे हजिरी घेऊन करार करतील, ते लोक नेमणुकेप्रमाणें किल्यावर नेऊन अलंग नोबत, चौकीपहारा चांगला राखणें ह्मणोन.

खमस तिसेन मया व अलफ रविलाखर ६

सनद १.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दप्तर.

---

1 Orders regarding leave, muster, and duties of the men in the fort should not be passed by Bápuji except in the presence of the Havâldár and the Darakdárs, and with their consent.

1 The keys of the gates and stores should remain with the Havâldár, and he should open the gates and doors under Bápuji's order.

( 708 ) Bál Sávant Bhirwadeker was appointed Havâldár of the fort of Párgad. He took some men from Sálshi with him. The fort-officers admitted him, but sent his men away as being unfit for service in the fort, and reported the fact to Government. Bálá Sávant was directed to select for employment residents of the province ( in which the fort was situated ), as also residents of Táluká Kalánidhi, and to enlist them after they are inspected and approved by the Mámlatdár, Trimbakrao Eshwant.

A. D. 1794-95.

# ३ मुलकी खातें.

## (अ) जमिनीची पाहणी व जमाबंदी.

७०९–(४०) रामराव जिवाजी चिटणीस यांजकडे मौजे खोजेवाडी तालुके सातारा हा गांव आहे, त्यास तिगस्तां जिल्हेदाराच्या वगैरे उपद्रवाकरितां वोस पडला होता, त्यास वासुदेव अनंत, व हुजूर मामलेदार गंगाधर शामराव यांजकडे कारकून पाठऊन पांचसाला कौल आणविला. लावणी होईल त्याप्रमाणें हिसेरसीद घ्यावा असें असतां, सालमजकुरीं दोन्ही मामलती तुह्मांकडे जाहल्या आहेत, त्यास तुह्मीं जास्ती ऐवज घेऊं ह्मणतां ह्मणोन, यांणीं हुजूर विदित केलें, त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी ज्याप्रमाणें गांवास कौल दिला आहे, त्याप्रमाणें वाजवी वसूल घ्यावा. जास्ती उपद्रव न करणें ह्मणोन, हैबतराव भवानी-शंकर यांचे नांवें. पत्र १.

अर्बा सबैन मया व अलफ सफर ५

रसानगी यादी.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

७१०–(१९२) कृष्णाजी माधवराव व भिवराव येशवंत उपनाम पानसी, गोत्र मुद्गल, सूत्र आश्वलायन, महाजन व आउटके, मौजे बेलवाडी, तालुके कर्डे सरकार जुन्नर, यांणीं हुजूर कजबे पुणें येथील मुक्कामीं विनंति केली कीं, मौजे मजकूर येथील हरदू वतनें आपलीं, त्यास आउट-कीचे वतनाचें बलुतें पेशजीं मोगलाई अमलांत गांवची बटाई होत होती, तेव्हां सारे

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

---

## III. LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

### (A) Survey and assessment of land.

(709) The village of Khojewádi suffered, in the year before the preceding, oppression at the hands of the holder of the Zillá Amal and others, and became consequently desolate. A kowl was consequently granted promising for 5 years the levy of revenue in proportion to the area brought under cultivation. It being represented that Haibatráo Bhawáni Shankar intended to recover a larger revenue, he was directed to abstain from doing so.

A. D. 1773-74.

### FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

(710) There was during the Government of the Mogals in Belwádi in Tarf Karde in Sarkár Junner, a watan called Outki, the holder of which measured the produce of the whole village which was collected together, and which furnished the basis for

A. D. 1774-75.

गांवचा माल एकजागें जमा होऊन आउटकीयाचे हातें मालाची मोजणी होऊन, बलुतें पावत होतें. अलीकडे गांवची खंडणी होते, मालाची मोजणी होत नाहीं, त्यामुळें बलुतें पावत नाहींत, यास्तव मौजे मजकूरचे मोकदम व समस्त पांढरी मिळोन आउटक्याचे, बलि(लु)त्याचे ऐवजीं गांव निजबत जमीन परतनें आठ दर परतनी(स) बिघे नवप्रमाणें बहात्तर बिघे जमीन आपल्यास इनाम देऊन सन इसन्ने सबैनांत पत्र करून दिल्हें आहे, त्याबरहुकूम सगुणाबाई शिंदे यांजकडे मौजे मजकूरची जहागीर इनाम आहे, त्यांणीं आपलीं पत्रें करून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें चालत आहे. त्यास स्वामींनीं कृपाळु होऊन सरकारांतून करार करून देऊन, पत्रें करून दिलीं पाहिजेत म्हणून; त्याजवरून मनास आणितां यास मौजे मजकूरचे आउटकीचे वतनाचें बलुतें गांवची बटाई होत नाहीं. खंडणी होते, याजमुळें पावत नाहीं, याजकरितां यास तुम्हीं बलुत्याचे ऐवजीं जमीन जिराईत चावर.

॥१८ गांवकरी पांढर जमीन.

।२४ भाडाचें थळ, शिरगांवचे वाटेवर पावणें दोन दोऱ्या आहेत, त्यापैकीं बिघे चोपन.

---

॥१२

एकूण अर्धा चावर बारा बिघे जमीन साऱ्या व पट्या तुम्हीं द्यावयाच्या करून गांव निजबत जमीन इनाम आउटक्याचे, बलुत्याचे, ऐवजीं यांस देऊन पत्र करून दिल्हें; व सगुणाबाई शिंदे जहागिरीचे अमलदार यांणीं आपलीं पत्रें करून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें सरकारांतून जमीन यांजकडे करार करून दिल्ही असे, तरी सदरहूप्रमाणें अर्धा चावर बारा बिघे जमीन गांव निजबत इनाम मौजे मजकूरपैकीं याचे दुमाला करून देऊन यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालविणें म्हणोन. छ. २ रबिलावल. सनदा, पत्रें.

२ सनदा.

१ नांवची.

१ मोकदम वरयाल मौजे मजकूर यास.

---

२

२ चिटणिसी. पत्रें.

१ देशाधिकारी, लेखक वर्तमान व भावी, तालुके कर्डे सरकार जुन्नर यांस.

---

the assessment of the land-revenue. The services of the watandár, it is stated, were not required during the Maratha Government as the revenue was fixed independently of the produce.

१ देशमुख व देशपांडे तालुके मजकूर यांस.

२

४

रसानगी यादी. सनद किल्ले पुरंदर.

७११–( २१३ ) रामजी बिन गावजी गलडा दिमत केसो कृष्णाजी निसबत हुजूर हशम यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे उंदीरगांव, तर्फ बेलापूर, परगणें संगमनेर, येथें आपलें बागाईत बिघे ८८ आठ व जिराइती बिघे ८१६ सोळा, येणेंप्रमाणें जमीन आहे, त्यास तात्याजी नाईक शुक्रे सराफ मौजे मजकुरीं आहेत, यांजपासून मुद्दल रुपये ४५ पंचेताळीस कर्ज घेऊन नाईकास बागाइतांत व जिराइतांत सरकत दिल्ही. सरकारसारा वारून बाकी राहील त्याचा तिसरा वांटा तक्षीम दिल्ही, त्यास दोन वर्षांनीं व्याजाचा हिशेब वगैरे उसाचें बीज ऐसें करून शंभर रुपयांचें फेरखत करून घेतलें. बोलीप्रमाणें चार सालें भरलियावर नाईक मशारनिल्हेकडे आपले रुपये ३०१॥ तीनशें दीड रुपया वाट्याचा वगैरे जिनसाचा येणें, त्यास आपले शंभर रुपये वजा करून बाकीचे रुपये देणें, व खत देणें ह्मणोन बोलत असतां, ऐकत नाहीं. धटाईच्या गोष्टी सांगतो. यास्तव आपण समस्त गांवकरी यांस साक्ष ठेऊन परागंदा जालों आहें ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरी वाजबी मनास आणून जाजती ऐवज घेतला आहे तो माघारा देवणें. त्यापैकीं चौथाई घेऊन सरकार हिशेबीं जमा करणें ह्मणोन, नरसिंगराव बल्लाळ यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सीत सबैन मया व अलफ जमादिलावल ३

---

(711) Rámji bin Gáwaji of Undirgaum, in Tarf Belápur of Parganá Sangamner, obtained a loan of Rs. 40 from Tátyáji Naik Shukre, and gave him his land consisting of 8 bighás of Bágáyat and 16 bighás of Jiráyat on condition that out of the net proceeds thereof, after paying Government assessment, ⅓ should be taken by the creditor and ⅔rds left to the owner. After 2 year's interest was calculated, a fresh account was struck including items on account of seed &c., and a new document for Rs. 100 was passed by Rámji. At the end of 4 years, Rámji told his creditor that the land-produce of his share was Rs. 301-8, and that he should return him the amount after deducting the Rs. 100 due to him. He refused. Rámji applied to the Peshwá, communicating the facts and informing that he had for the above reason left the village. Orders were issued for the balance due to Rámji being restored to him.

A. D. 1775-76.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

७१२-( २८८ ) मौजे चिंचोडी, तर्फ कडे, परगणे पाडें पेडगांव येथील जहागीर तालुके पट्याकडे व मोकासा विठ्ठल यशवंतराव खासनिस यांजकडे, व बाबती साहोत्र्याचा अमल राजश्री पंतसचिव यांजकडे, त्यांस पेशजीं सरकारांतून मौजे मजकूरचे वांटणीचा तह करून दिल्हा आहे, त्याप्रमाणें आजपर्यंत सुरळीत चालत आलें. आलीकडे दोन वर्षे पंतसचिव यांजकडील बाबतीचे कमाविसदार यांणीं खलेल करून परगणे मजकूरपैकीं निंबाळकरांकडे गांव आहेत तेथील तह निमे जहागीर व निमे स्वराज्य पैकीं, निमे बाबतीचा साहोत्रा, व निमे मोकासा आहे, त्या तहाप्रमाणें मौजे मजकूरचा ऐवज जाजती मागतात, त्यास पेशजीं तीन साला जमेची वांटणी सरकारांतून करून दिल्ही आहे, ते मनास आणून त्याप्रमाणें तह करार करून दिला पाहिजे व मागील दोन सालांचे जमावसूल बाबतीचे, पंतसचिव यांजकडून, गांवकरी यांस करून देविले पाहिजेत ह्मणोन, बाळकृष्ण केशव तर्फ पटा यांणीं हुजूर विदित केलें; त्याजवरून कैलासवासी नानासाहेब यांणीं सन सबा व सन समान व सन तिसा खमसन एकूण तीन साला जमेची वांटणीचा तह सन सितेनांत करून दिला आहे तो पाहून त्याप्रमाणें खेरीज सरदेशमुखी दरसदे आकारास.

सीत सबैन मया व अलफ रबिलाखर १५

रुप्ये.

७५ जाहगीर तालुके पटा.

 ५० ऐन जहागीर.

 २५ कसर सरकार.

 ——

 ७५

२५ स्वराज्य चौथाई.

 १७॥= मोकासा विठ्ठल येशवंतराव खासनीस, दिंमत हुजुरांत याजकडे.

 ५॥।=॥ बाबती व साहोत्र्याचा अमल पंतसचिव यांजकडे.

 ४।=॥ बाबती.

---

FROM JANÁRDAN APPÁJIS DIARY.

( 712 ) In certain villages in Parganá Páde Pedgaum, the Jahágir Amal was fixed at 50 per cent of the revenue, and the remaining 50 per cent was स्वराज्य ( Swarájya ) of which half was Sáhotra and half Mokásá. In Chinchodi, another village in the said Parganá, the practice was different, but the wahiwátdars of Pant Sachiv attempted to levy Sáhotrá at the above rate. The matter was taken to Government, and the following division of the revenues was fixed.

A. D. 1775-76.

१॥ साहोत्रा.

———

५॥।=॥

१।≈॥ निम चौथाई बाबूराव सितोळे निसबत शाहाजी भोसले याजकडे.

———

२५

———

१००

एकूण शंभर रुपयांची वांटणी पेशजींप्रमाणें करून हें पत्र सादर केलें असे, तरी मौजे मजकूरचे जमाबंदीचा ठराव होईल, त्याचा वसूल सदरहू वांटणीप्रमाणें जिकडील तिकडे देत जाणें; व मागील दोन सालांचे जमावसूल बाबतीचे राहिले आहेत, ते करून द्याव-याविशीं सनदा व पत्रें छ. ४ रबिलावल.

२ सनदा.

१ मौजे मजकूरचे मोकदम यांस कीं, सदरहू वांटणीप्रमाणें जिकडील तिकडे अमल देत जाणें ह्मणोन.

१ पंतसचिव यांस कीं, सालमजकुरीं पेशजींची वांटणी पाहून त्याप्रमाणें बाबती साहोत्र्याचा ऐवज घेत जावा ह्मणोन.

———

२

१ माधवराव शिवदेव कमाविसदार निसबत पंतसचिव यांचे नांवें. चिट-णिसी पत्र.

———

३

रसानगी यादी.

---

Rs. 75 Jahágir.

50 Net Jahágir.
25 Kasar.

———

75

25 Swarájya Chauthái.

17-10 Mokásá.
5-14-6 Bábti and Sáhotrá.
4-6-6 Bábti.
1-8 Sâhotrá.

७१३–( ३६७ ) मोरो बापूजी यांचे नांवें सनद कीं, बाळाजी जनार्दन भानू खोत मौजे इलणें, तर्फ केळशी, तालुके सुवर्णदुर्ग, यांणीं विनंति केली कीं, मौजे मजकूरची खोती आपली आहे त्यास अलीकडे बांधेकरी खोती चालवीत होते, त्यास साल गुदस्तांपासून आमची खोती पूर्ववत्-प्रमाणें आपल्याकडे सरकारांतून चालती केली आहे; त्यास सालवारी पाहणी करून जमाबंदी ठरेल त्याप्रमाणें सरकारांत वसूल घ्यावा ह्मणोन; त्यावरून पाहणी करून जमाबंदी ठरेल त्याप्रमाणें मौजे मजकूरचा वसूल सरकारांत घ्यावयाचा करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी मौजे मजकूरची सालमजकुरीं पाहणी करून, पाहणीमुळें जमाबंदी ठरेल त्याप्रमाणें वसूल घेणें ह्मणोन.

सबा सबैन
मया व अलफ
जिल्हेज ३

सनद १.

रसानगी यादी.

७१४–( ३६९ ) मौजे राजापूर परगणे वाण, येथील जागिरीचा अमल सरकारांत आहे, व मोकासा बाबती सरदेशमुखीचा अमल पंतप्रतिनिधि यांजकडे आहे, त्यास लावणीची तर्तूद न पाहतां कमाविसदारांनीं सालोसाल जमाबंद्या भारी केल्या; व आफ्तीमुळें गांवांत जीवन राहिलें नाहीं, यास्तव सरकारांतूत बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे. मौजे मजकूरचे पाटील कुळकर्णी यांणीं हुजूर येऊन अर्ज केला, त्याजवरून मौजे मजकूरचे लावणीचें कामकाज सालमजकुरीं सरकारांतून तुह्मांस सांगितलें असे, तरी इमानें इतबारें वर्तोन, गांवची लावणी करून, आकार चौकशीनें करणें. मौजे मजकूरचे अमलाचीं वगैरे कलमें.

सबा सबैन
मया व अलफ
जिल्हेज ४

1–7–6 Chanthai.

100

The Sardeshmukhi was to be levied in addition to the above.

( 713 ) At the request of Báláji Janárdan Bhánu, Khot of Mouze Ilaṇe in Tarf Keḷshi of Táluká Suwarṇdurg, orders were issued for fixing the assessment after a survey of the lands in the village, and for the levy of the assessment thus fixed.

A. D. 1776-77.

( 714 ) The Jahágir Amal of the village of Rájápur in Parganá Wáṇ, belonged to Government and the Mokásá, Bábti and Sardeshmukhi Amal to the Pant Pratinidhi. The Kamávisdàrs in former years settled the revenue of the village without taking into account the extent of cultivation thereof, and owing to this cause and in consequence of scarcity the village was reduced to poverty. The Páṭil and Kuḷkarṇi having represented the fact to Government, Narsingrao Ballál was appointed to arrange for the cultivation of the village lands and the following instructions were issued to him.

A. D. 1776-77.

दिगांबर महादेव कमाविसदार परगणे मजकूर व तुम्हीं मिळोन गांवचे जरीब करून पड जमीन, जिराईत बागाईत, निवडून वहित जमीन आहे, त्यांत गांवकरी यांनीं मामुल धारा मोडून, कमी कौल देऊन, नुकसानी सरकारची केली असेल, त्याची चौकशी करणें. पड जमीन व वहित जमिनीचे लावणीचा बंदोबस्त करून गांवकरी यांचे गुजारतीनें कमाल जमेचे आकार बमोजीब सालबंदी इस्तावा चौकशीनें ठराऊन, अखेरसालीं सरकारांत आणून समजावणें, त्याप्रमाणें पेस्तर सालापासून इस्तावा बांधून दिल्हा जाईल. सालमजकूरची जमाबंदी तुम्हीं उभयतां मिळोन करून, आकार होईल त्यापैकीं, जागिरीचा ऐवज दिंगाबर महादेव याजकडे देऊन, मोकासा बावती सरदेशमुखीचा ऐवज पंतप्रतिनिधि यांजकडे. कलम १.

जमाबंदी पैकीं दहक वजा करून, बाकी बेरजेपैकीं हिसा प्रतिनिधि यांस पावत होता, त्यास दहक वजा न करितां कच्चे आकाराचा हिसा पंतप्रतिनिधि यांस देत जाणें. कलम १.

वेठ बेगार सरकारची सालाबाद असेल त्याप्रमाणें देत जाणें. कलम १.

मौजे मजकुरीं बाकी असेल त्याची चौकशी करून, दार नादार निवडून हुजूर समजावणें. कलम १.

महाल मजकूरची नेमणूक. रुपये.

१५० कारकून.
३० प्यादा.

———

१८०

एकूण एकशें ऐशीं रुपये करार केले असेत, पैकीं निमे पंतप्रतिनिधि यांजकडील ऐवजीं वजा करून घेणें, बाकी निमे सरकारांतून मजुरा पडतील. कलम १.

गांवास बीज तगाई देऊन हंगामशीर उगऊन घेणें. कलम १.

---

1 Narsingrao should, in conjunction with the Kamávisdár of the Parganá, make a survey of the village distinguishing cultivated from uncultivated lands and Jiráyat from Bágáyat. These officers should further inquire whether any loss of revenue was caused by the village officials giving kowls for the cultivation of lands at lower rates. They should then fix the revenue, commencing with a reduced figure and gradually increasing it till the maximum was reached. The arrangement arrived at should be reported to Government at the end of the year, and a kowl would then be issued fixing the revenue for the successive years. The revenue for the current year should be fixed by Narsingrao and the Kamávisdárs, the Jahágir Amal being given to the latter and the Mokásá and other Amals to Pratinidhi,

एकूण साहा कलमें करार केलीं असेत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, नरसिंगराव बल्लाळ यांचे नांवें. सनद, १.

येविशीं. सनदा पत्रें ३.

२ सनदा.

१ दिंगाबर महादेव कमाविसदार परगणे मजकूर, यांस कीं, मौजे मजकूरचे लावणीचें कामकाज सालमजकुरीं सरकारांतून नरसिंगराव बल्लाळ यांस सांगोन, आकार होईल त्यापैकीं पंतप्रतिनिधि यांस दहक वजा होऊन, सालाबाद हिसा पावतो; त्यास दहक वजा न करितां कच्चे आकाराचा हिसा द्यावा; व जागिरीचे अमलाचा वसूल तुह्मांकडे त्यांणीं द्यावा. याप्रमाणें करार केला असे ह्मणोन. सनद.

१ मोकदम मौजे मजकूर यांस अभयपत्र कीं, तुह्मीं बेवसवसा कुळें परागंदा जालीं असतील, तीं गांवांवर आणून आबादी करून सुखरूप राहणें ह्मणोन.

---

२

१ जमीदार परगणे मजकूर यांस चिटणिसी. पत्र.

---

३ ४

रसानगी यादी.

७१५–( ३७५ ) परगणे वरणगांव येथील जागिरीचा अमल नवाबाकडे आहे, त्यास जागिरीचा व स्वराज्याचा अमल येणेंप्रमाणें वीतपशील. रुपये.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज १६

७० हिसा जागिरदार.

४२॥ स्वराज्य.

---

1 Forced labour for Government purposes should be exacted as usual.

1 In regard to past arrears of revenue inquiry should be made as to the solvency or otherwise of the defaulters, and a report made to Government.

1 Grain should be advanced to rayats as Tagái for seed purposes and duly recovered at the proper season.

( 715 ) The Jahágir of Pargaṇá Waraṇagaum belonged to the Nawáb and the Swarájya Amal to Government. The proportion of these Amals was as under—

A. D. 1776-77.

३० मुकासा व बाबती.
१२॥ सरदेशमुखी.

४२॥

११२॥

एकूण एकशें साडे बारा रुपये आकारास सत्तर रुपये जागीर व साडे बेताळीस रुपये स्वराज्य देखील सरदेशमुखी, तह असतां तहाप्रमाणें स्वराज्याचा अमल तुह्मीं घेत नाहीं, जाजती उपसर्ग करितां, ह्मणोन हुजूर विदित जालें; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी मुदामत तहाप्रमाणें स्वराज्याचा अमल घेणें, जाजती उपसर्ग न देणें ह्मणोन. पत्रें.

१ विनायक रघुनाथ कमाविसदार बाबती सरदेशमुखी परगणे मजकूर यांस.
१ रामराव निंबाजी यांस मोकाशाचे अमलाविशीं.
१ नारो कृष्ण यांस.
१ जमीदार परगणे मजकूर यांस.

४

चिटणिसी.

७१६–( ५२५ ) तर्फ नागोठणें, व तर्फ अष्टमी, व तर्फ सिमाल तालुके अवचितगड, येथील जमीदार हुजूर पुरंदरचे मुक्कामीं येऊन अर्ज केला कीं, दुतर्फा मामलेदारांचा तर्फ मजकूरचे रयतेस नवीन उपसर्ग लागतो, यामुळें रयत तजावजा होऊन मुलकाची आबादी होत नाहीं, येविशीं-

समान सबैन
मया व अलफ
सफर ६

---

Rs. 70 Jahágir
42½ Swarájya.
30 Mokásá and Bábti.
12–8 Sardeshmukhi.

112–8

( 716 ) The Jamidárs of Tarfs Nágothṇe, Ashṭmi, Simál in T. Avachitgaḍ represented: that owing to the oppression of the Mámlatdárs of Government and the Mámlatdár of the Sudhágaḍkar who had concurrent jurisdiction over the Tarf, the rayats had left their villages and the country had suffered. The following instructions were therefore issued.

A. D. 1777-78.

चा बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणून, हुजुरून बंदोबस्त करून दिल्हा असे, त्याप्रमाणें दुतर्फा मामल[त]दारांनीं चालवावें, कलमें बीतपशील येणें-प्रमाणें.

जोशी व उपाध्ये रयतेच्या लग्नास पाठवणी पहिली घेत होते, त्यापेक्षां अधिक घेतात, त्यास पेशजीच्या चाली-प्रमाणें घेतल्यानें रयतीस हलकें पडेल ह्मणोन, त्यास पहिले चालीप्रमाणें लग्नास घ्यावें. आडऊन ती घेऊं लाग-ल्यास तुह्मीं ताकीद करणें. कलम १.

तोतयाचे दंग्यामुळें कित्येक गांव दुतर्फा सरकारांत जप्ती करून, पिकाच्या मळण्या केल्या. निमे रयतीस देऊन निमे राजभाग सरकारांत घेतला. सरखेल यांजकडील घटी सरदेशमुखीचा ऐवज त्यांचा त्यांस पावला नाहीं, याजकरितां आह्मांवर तलब करितील ह्मणोन, ऐशास दुतर्फा गांवची जप्ती करून अर्धेल आली तो वाटा निमे निमे घेतला. सरदेशमुखीचा हिसा सरकार व सुधागडकरी याचे अमलपैकीं व त्यांणीं

तर्फ नागोठणें येथील स्वार बैसबड, व बुरुंडी या दोहों स्वारींची जमीन सरकारतर्फेस पिकल्यास नव दाहा वर्षे उगवितात. सालमजकुरीं सरकारांतून पा-हणी होणार, त्यास ज्या स्वारीची जमीन, त्या स्वारीकडे असावी ह्मणोन, त्यास तुह्मीं येविशींची चौकशी करून, जिकडील ज-मीन, तिकडे लावणें. कलम १.

रयतीस वेठ बिगार बहुत पडत्ये, या-मुळें कीर्द होत नाहीं. वेठीचे उपद्रवामुळें रयत परागंदा होत्ये, शेतगी होत नाहीं. खोतांपासून नुकसान भरून घेतात, त्यास येविशींचा बंदोबस्त करून दिल्हानें मुलुक आबाद होईल ह्मणोन; त्यास वेठ बिगार सरकारकामास अगत्याअगत्य लागेल, ती जमीदाराचे गुजारतीनें शिस्त करून घेणें. कलम १.

1 The village astrologers and priests should not levy Páthavani ( tax on marriage ) at more than the former rates.

1 During the disturbance of the Impostor, the crops of the villages were attached, and half the produce was given to the cultivator, and the remaining half was taken by Government and the Sudhágadkar. The Ângriá demanded payment of his Sar-deshmukhi right from the rayats. The payment should be made out of the share received by Government and the Sudhágadkar.

1 Owing to the exaction of forced service, the cultivators had to leave their villages, and cutivation had decreased. This resulted in a loss of revenue which the Khots had to make good. Forced service should in future be required from the cultivators, only when absolutely necessary for the purposes of Government and under the supervision of the Jamidárs.

आपले वांट्यापैकीं सरदेशमुखास द्यावा, तो न देत, सबब रयतीस सरदेशमुखी तगादा करितात तो करूं न देणें. कलम १.

वसुलास प्यादे महालींहून तितर्फा सरकार व सुधागड, व आंग्रे यांजकडून जातात, त्यांचे पोटाचा उपद्रव रयतीस फार लागतो, त्याची नेमणूक करून द्यावी ह्मणोन, त्यास वसुलास प्यादे मुलकांत तितर्फा जातील; त्यास वेळेस निठवेंभर तांदूळ व एक पैसा द्यावा, जाजती घेऊं न देणें. कलम १.

मुंबईहून गलबतें सावकारी नागोठणेंयाचे बंदरीं येतात, त्यास मागील चालीशिवाय दर गलबतास दोन नारळ मामलेदार सरकारांत घेतात, त्याप्रमाणें सुधागडकरीही सावकारांजवळ मागतात. यामुळें बंदर मजकुरीं कजिया होतो ह्मणोन, ऐशास नारळ घ्यावयाची चाल नवी केली आहे, त्यास दुतर्फा नारळ घेऊं नये. कलम १.

तर्फ मजकूरची रयत कर्जदार जाली आहे, त्यास कर्जेदाराची निकड होत्ये. आणि द्यावयासी मवसर नाहीं. मुदती फुरसदीनें घेणें, ह्मणोन आज्ञा असावी. ऐशास दार नादार कुळें असतील, त्यांचे कर्जेदारांस हप्ते करून देणें. कलम १.

तर्फ मजकुरीं सागवानी झाडें तोडावयाची मनाई आलीकडे केली आहे, त्यास वरकसी धारा गांवगन्ना आहे, त्या धाऱ्याचे ऐवजीं रान तोडून वरकस करावा तरी सागवानी झाडें तुटतात. या अडचणीमुळें वरकस होत नाहीं. धारा भरून द्यावा लागतो ह्मणोन. ऐशास सागवानी रान भारी असेल तितकें मात्र राखावें, वरकड असेल तें रयेतीनें तोडावें. कलम १.

1 In view of the indebtedness of the rayats, the debts due by them to money-lenders should be recovered by instalments.

1 Peons whether of Government, or Sudhágaḍkar, or the Ángriá, visiting the villages for the recovery of revenue should receive one Niṭwe ( ½ seer ) of rice and one pice at a time, but no more.

1 2 Cocoanuts were levied by the Mámlatdár for Government from every trading ship coming from Bombay to port Nágoṭne in excess of the fixed rates. The levy should be discontinued.

1 In the Tarfs, orders were formerly issued to prevent the cutting of timber. This prevented the cultivation of Warkas land on which assessment had already been imposed. Valuable timber-forests should be preserved. Timber elsewhere should be left open for cutting.

Orders were issued accordingly to the Government Mámlatdár as also to the Mámlatdár of Sudhágaḍ.

एकूण आठ कलमें लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. नवीन उपद्रव रयतीस एकंदर न लावणें. येविशीं सुधागडकरी यांस ताकीद करून सदरील अन्वयें वर्तवणें ह्मणोन, कृष्णाजी रामचंद्र यांस. पत्र १.

सदरील अन्वयें आत्माराम रघुनाथ तर्फ सुधागड यांस. पत्र १.

२

चिटणिसी.

७१७-( ६४९ ) प्रांत भिंवडी येथील पहाणी सालमजकुरीं जाहलियाविना जमाबंदी समजणार [ नाहीं, ] याजकरितां पाहणी करावयाविशीं, व पाहणीमुळें भोजनखर्च वगैरे सात आठशें रुपये लागतील, त्याविशीं आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन तुह्मीं विनंति केली; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी पाहणीमुळें सरासरी जमा जाजती साधेल, असें असल्यास रयतेस जलेल न करितां राजी रोखानें पाहणी इतबारानें करणें. पाहणीमुळें चार पांचशें रुपये भोजनखर्च वगैरे लागेल, तो लावणें. प्रांत मजकूरचे हिशेबीं तुह्मांस मजुरा पडेल ह्मणोन, गोविंद राम यांचे नांवें. सनद १.

समानीन मया व अलफ जिल्काद २७

रसानगी यादी.

७१८-( ७७३ ) तालुके विजयदुर्ग येथील मुलकी जमाबंदीचा मक्ता सन अर्बा सबैनांत, सन समान सबैनपावेतों पंचसाला करून दिल्हा होता, तो पुरल्यावर पाहणी व्हावी, ते जाहली नाहीं. मागील मक्त्याचे शेवटील सालचे बेरजेप्रमाणें सालेसाल उगवणी होत आहे, याजकरतां पाहणी करून जमाबंदी करावी, ह्मणोन दोन तीन वर्षे रयतेचें बोलणें आहे;

सलास समानीन मया व अलफ सवाल १२

---

( 717 ) The officer of Pránt Kalyán Bhiwandi represented that the Jamábandi of the province could not be fixed without inspection of the lands, and asked sanction to the expenditure of Rs. 700 or 800 on account of diet-money to officers making the inspection. He was ordered to make the inspection, if it was calculated to raise the revenue, and to take care that the inspection was honestly made, and that no oppression was caused to the rayats. Rs. 400 or 500 were sanctioned for expenditure as diet-money.

A. D. 1779-80.

( 718 ) The term of the 5 years settlement of revenue in Vijayadurga expired in A. D. 1777-78. No fresh inspection of land and settlement of revenue was however made, though asked for by the rayats, and the old rates continued to be levied.

A. D. 1782-83.

परंतु पाहणी जाहली नाहीं. सालमजकुरीं रयतेनें सुभा येऊन गवगवा फार केला, सबब बागाइतास गीर्दवारी बसविली आहे, तरी बागाइताची व जिराइताची पाहणी करावयाची आज्ञा जाहली पाहिजे, ह्मणोन तुह्मांकडील कारकुनांनीं विनंति केली; त्याजवरून मनास आणतां पेशर्जीचे मक्त्यास फार वर्षे जाहलीं, याजकरितां सालमजकुरीं पाहणी करावयाचा करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी बागाईत व जिराईत, व नक्त-बाब यांची वाजबीचे रीतीनें कोठें गुंजावीस न ठेवतां व रयतेवर जलल न होतां हंगामी पाहणी करणें. गुदस्त बेरजेस सरासरीमुळें कमी न आणतां जाजती साधतां साधेल तें साधून हुजूर आणून समजावणें. समजोन जमाबंदीचा ठराव करून दिला जाईल ह्मणोन, गंगाधर गोविंद यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

७१९–(८६८) तालुके शिवनेर येथील जमीदार व पाटील कसबे आळें येथें जाऊन बसले होते, त्यांजकडे तालुके मजकुरींहून कारकून पाठवून त्यांणीं आपलें हरद्र सांगितलें, त्याचा मजकूर तुह्मीं हुजूर लेहून पाठविला तो विदित जाहला ऐशास.

खमस समानीन मया व अलफ सफर २०

---

The rayats complained to the Subhá. A survey was therefore ordered with instructions not to allow the assessment to fall below the preceding year's Jamábandi, and to take care that it did not press heavily on the rayats.

(719) The Páṭils in Táluká Shivner and the Jamidárs being dissatisfied removed to village Aleṇ. The Kamávisdár sent his kárkun to get them back. They stated their grievances and asked for redress. Their grievances were:—

A. D. 1784-85.

1 Crops had partially failed owing to want of rain. The Jamidárs and Páṭils prayed that the Jamábandi be fixed after inspection.
2 Old debts were due from the rayats to the Sáwkárs. Permission should be given to these being paid after enquiry for the produce of the land.
3 The customary Haks of the Jamidárs should be paid. The Kamávisdár reported the facts to the Peshwá with the result that the first prayer was granted. In regard to the second, it was ordered that interest at exhorbitant rates should not be allowed, and that the amount reasonably due might be recovered by instalments from the net produce of the lands. In regard to the 3rd, information as to the extent of the Haks claimed

was asked for.

मागील वोढणीचें कर्ज गांवगन्ना रयतेकडे सावकारांचें थकलें आहे, त्याचे हिशेब पाहून वाजबी देणें आहे, त्यास ऐवज नाहीं, असें समजलियावर कच्चे उत्पन्नापैकीं ऐवज लाऊन देऊं ह्मणोन तुह्मीं कबूल केलें आहे, त्यास गांवसंमंधें वाजबी देणें सावकराचें असेल, त्याची चौकशी करून, ज्याचें व्याज मनस्वी असेल तें देऊं नये, रीतीचें व्याज करून कर्जाचा ऐवज ठरेल तो हप्तेबंदीनें कच्चे उत्पन्नापैकीं लाऊन देणें. कलम १.

जमीदार आपले हक्काचें बोलणें सुदामत प्रमाणें हक्क आह्मांस पावतो, त्याप्रमाणें द्यावा ह्मणोन बोलूं लागले; त्यावरून सरकारांत विनंति करून सुदामतप्रमाणें हक्क नेमून घेऊं ह्मणोन तुह्मीं कबूल केलें; त्यास सुदामत हक्क जमीदार काय घेतात, त्याची यादी हुजूर लिहून पाठवणें, समजोन आज्ञा करणें ती केली जाईल. कलम १.

साल मजकुरीं पर्जन्याचे आहीमुळें पिकास कमती आहे, त्याची पाहणी करून आकार होईल त्याचा वसूल घ्यावा, ह्मणोन जमीदार व पाटील यांचे बोलणें, त्याप्रमाणें कबूल करून समजाऊन आणून सुभाहून पाहणीस कारकून व महालकरी व जमीदार पाठविले आहेत. येविशींचे चौकशीस सरकारांतून कारकून पाठवावा ह्मणोन लिहिलें; त्यास सरकारांतून कारकून पाठवावयाचा नाहीं. तुह्मीं तालुके मजकुरींहून चौकशी करून कोणाची रुरवात न धरितां, रयतीस जलेल व सरकारनुकसान न होतां, व दुसरे कोणाची दरज न चाले ऐसी पाहणी करून जमाबंदीचा ठराव करणें. कलम १.

एकूण तीन कलमें लिहिलीं आहेत, सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, बाळाजी महादेव यांचे नांवें. सनद १.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे.

७२०—( १०२९ ) खारापाट तर्फ वासी, व तालुके पेण, परगणे सांकसे येथील जमिनीचा धारा पेशजीं दर बिघा दहा मण भात घ्यावयाचा शिरस्ता होता, त्यास दहा मण धारा घेतलियानें जमाबंदी जरब होऊन, उगवणी आह्मांस न होय, याकरितां पाहणी करून सवाई सूट द्यावी. येविशीं रयतेचा अर्ज सरकारांत बहुत दिवस होता, परंतु सूट पडली नाहीं; त्यावर सन

इहिदे तिसेन मया व अलफ. सवाल १

(720) The Government demand on a bighá of land in T. Wási and Tarf Pen in Parganá Sánksi was 10 maunds of rice. This being complained against as exhorbitant,

A. D. 1790-91.

इसमें सबैनांन त्रिंबक विनायक यांणीं पाहणी केली, ते समई सवाई सूट द्यावयाविशीं अर्ज केला, तेव्हां त्यांणीं सवाई पैकीं निमसवाई दर बिघा एक मण सूट देऊन नऊ मण धारा ठरविला, त्यास सवाईपैकीं निमसवाई सूट न दिल्हियानें रयत बहुत नातवानीखालीं येऊन बाकीदार जाहाली. धारा जरब त्याची उगवणी होत नाहीं, यास्तव हल्लीं तालुके अवचितगड, व तालुके आतुरवलीत येथील खारी लगत्या आहेत, त्यास सवाई सूट सरकारांतून पडत आहे, त्याप्रमाणें आह्मांस द्यावयाची आज्ञा जाहली पाहिजे, ह्मणोन अर्ज केला; त्यावरून मनास आणितां तालुके अवचितगड, व तर्फ आतुरवलीत येथील खारी लगत्या आहेत, त्यांस सवाई सूट पडत्ये त्याप्रमाणें यांस पडावी, त्यापैकीं निमसवाई सूट दिल्ही आहे, त्याणें निभावणी होत नाहीं. रयत बहुत नादारीस येऊन बाकी फार राहूं लागली. जिरायताची व मिठागराची कीर्द हीच रयत करित्ये, त्याची निभावणी जाहली पाहिजे, यास्तव आबादीवर नजर देऊन सवाईपैकीं निमसवाई सूट पेशजीं पडली आहे, बाकी निमसवाई दर बिघा एक मण प्रमाणें सूट पडली नाहीं. ते सन तिसा समानीनापासून सूट द्यावयाचा सरकारांतून ठराव करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सन तिसा समानीनचा निमसवाईचा आकार सूट खर्च लिहिणें. सन तिसेनापासून जमेंत अजी वजा करणें ह्मणोन, भास्कर लक्ष्मण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

७२१–( १०५७ ) गोपाळराव राम यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे कर्जे तालुके सातारा येथील निमें गांवची कमावीस आह्मांकडे आहे, त्यास मौजे मजकुरीं तीस बिघे जमीन पाठस्थळ आहे; त्या जमिनीस कार्तिक मार्गशीर्ष पावेतों पाटाचें पाणी पुरतें, दोन पिकें होतात, याजकरितां सरकार धारा दर बिघा रुपये दहाप्रमाणें आकार होतो, त्यास सन इहिदे तिसेनांत पर्जन्य कमी पडला, पाट अगदीं चालला नाहीं, याजमुळें जमीन नापीक जाली, सबब सदरहू तीस बिघ्यांस दर बिघा रुपये पांच प्रमाणें सूट द्यावयाची आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र तुह्मांस लिहिलें असे, तरी मुलुक शिरस्ता पाहून चौकशी करून तीस बिघ्यांस सूट देणें ह्मणोन, कृष्णराव अनंत मुक्काम सातारा यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सलास तिसेन मया व अलफ सफर १५

---

the assessment was reduced to 9 maunds, and was now after fresh complaints reduced to 8 maunds.

(721) There were 30 bighás of Páṭasthal garden-land in mauze Karje in Táluká Sátárá, which produced two crops. The land bore assessment at Rs. 10 per bighá. The crops however failed in this year owing to scarcity of water, and remission was ordered to be granted as usual.

A. D. 1792-93.

# ३ मुलकी खातें.

## ( ब ) साऱ्याचा वसूल, सूट व हप्तेबंदी.

७२२-( २७ ) गोपाळराव भगवंत कमाविसदार परगणे इंदापूर, यांचे नांवें सनद

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

कीं, परगणे मजकूर येथील खरीफ व रबीचें पीक आफ्तीमुळें गेलें; त्याची पाहणी सरकारांतून करून, त्या अन्वयें वसूल घ्यावा, ह्मणोन परगणे मजकूर येथील पाटील परस्थळीं टेंभुर्णीस गेले आहेत, त्यांस आणून, शेताची पाहणी करून, वसूल चालीस लागला पाहिजे, ह्मणोन तुह्मीं विनंतिपत्र लिहिलें; त्यास गांवगन्ना तुह्मीं हिंडून, शेतचें शेत पाहून आफ्तीमुळें पीक गेलें असेल, त्याचा अजमास करून, तितका ऐवज तकूब ठेऊन रयतीस दमदिलासा देऊन, बाकीचा ऐवज बेहड्याप्रमाणें वसूल घेणें. तकूबचा आकार होईल तो हुजूर लेहून पाठवणें, त्याचा फडशा हुजूर होईल. वसुलाची ढील न करणें. सदरहू लिहिल्याअन्वयें चौकशी केल्यास विशेष तोटा येणार नाहीं ह्मणोन. छ. ३ सवाल. सनद १.

रसानगी यादी.

७२३-( ५२७ ) तर्फ नागोठणें, व तर्फ अष्टमी, व तर्फ सिही महाल, तर्फ

समान सबैन मया व अलफ सफर ८

अवचितगड येथील जमीदार हुजूर पुरंदरचे मुक्कामीं येऊन अर्ज केला कीं, दुतर्फा मामलेदारांचा तर्फ मजकूरचे रयतीस नवीन उपसर्ग लागतो, याजमुळें रयत तजावजा होऊन मुलकाची आबादी होत नाहीं, येविशींचा बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणून हुजूरून बंदोबस्त करून दिल्हा असे, त्याप्रमाणें दुतर्फा मामलेदारांनीं चालावें कलमें बीतपशील.

---

## III LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

### ( B ) Recovery, remission, and postponement of revenue.

( 722 ) Gopálrao Bhagwant Kamávisdár of Parganá Indápur represented that, owing to drought, the Kharip and the Rabi crops had failed. He was directed to visit the villages and make a field to field inspection, to suspend the collection of the revenue where the crops had failed, and to encourage the rayats. He was ordered not to be remiss in collecting the rest of the revenue, according to the Behedá. It was ordered that if careful inspection was made, much loss of revenue would not result.

A. D. 1773-74.

( 723 ) At the request of Jamidárs of Tarf Nágotne, Ashtami, and Sihi Mahál in T. Awachitgad, in which a Mámlatdár of Government and a Mámlatdár of Sudhágadkar had concurrent jurisdiction, the following instructions were issued.

A. D. 1777-78.

गल्लेपट्टीचा वसूल मागील शिरस्ता मार्गशीर्ष, पौष, माघमासीं घेत होते. अलीकडे गैरहंगामीं वसूल रयतीस लावितात, यामुळें भारी पडतें. भातावर रुपये दर खंडीस आठ नऊ घेऊन द्यावे लागतात ह्मणोन, त्यास मार्गशीर्ष, पौष दोन महिन्यांमध्यें पैसा वसूल घेत जाणें. अगोदर न घेणें. कलम १.

किल्याच्या नेमणुका आलीकडे जाजती पडतात. डोईओझ्यानें किल्यास भात न्यावयासी भारी पडतें, याजमुळें रयतीस शेतकीचा खप होत नाहीं; ऐशास किल्याचे बेगमीस गल्ला त्रिंबक विनायक याचे कारकीर्दीप्रमाणें रयतीकडून पोहचाऊन घेणें. जाजती न घेणें. कलम १.

घरटिपेस तितर्फा कारकून मुलकांत जातात, त्यांस शिध्याचा खर्च खोत पाटील दरघरास एक पैसा, व अच्छेर तांदूळ जमा करून शिधा द्यावा, ऐसी चाल असोन,

चवथाई गल्याचे तसरे दर खंडीस रुपये पंधराप्रमाणें द्यावे लागतात. मागील चाल वसुलाची, फाल्गुन, चैत्र, वैशाख पावेतों घेत होते. हल्लीं गैर हंगामीं वसूल लावितात, याजमुळें दर खंडीस दहा अकरा रुपये घेऊन द्यावे लागतात, याकरितां रयतीस भारी पडतें, त्यास पौष वद्यापासून अखेर सालपावेतों हप्तेबंदीप्रमाणें वसूल घेत जाणें. कलम १.

घरटिपेचा वसूल गैर हंगामीं दुतर्फा लागतो, यामुळें रयेतीस भारी पडतें, त्यास अश्विनमासीं वसूल घरटिपेचा घेत जाणें. अगोदर न घेणें. कलम १.

बारीक तांदूळ सरकारांत घेतात, त्याची सवाई रयतीस मजुरा देतात, अशी चाल आहे, त्यास आलीकडे तांदूळ घेतात, त्यास सवाई मजुरा देत नाहीं ह्मणोन; ऐशियास बारीक तांदूळ घेऊं नये. घेतल्यास सवाई प्रमाणें मजुरा देत जाणें. कलम १.

1 The revenue in kind was formerly recovered in the months of Márgashirsh, Poush, and Mágh. The Mámlatdárs now made demands for the same in other months. The rayats had consequently to suffer. The recovery should therefore be made in the months of Márgashirsh and Poush alone.

1 Similarly the cash payment to be made by the rayat for a quarter of his rent in kind, at Rs. 15 per khandi, was ordered to be recovered in instalments from the latter half of Poush to the end of the year.

1 The rayats were required to take rice on their head to the fort. This imposed a good deal of trouble on the rayats and interfered with their pursuits. It was ordered that the rayats should be called upon to take to the fort only so much rice as was actually required for the support of persons in the fort.

1 House-tax should be recovered in Ashwin and not before.

आलीकडे कारकून दर घरास जेवणाचे ऐवजीं अडीच तीन आणे घेतात, यामुळें रयतीस भारी पडतें ह्मणोन; ऐशास पोटखर्च ज्या गावीं कारकून वस्तीस राहतील त्या गांवापासून घ्यावा. नक्त व पोटगी सारें गांवापासून घेऊं न देणें. कलम १.

गांवगन्ना महारास राबणूक पडल्ये, त्यास पहिली चाल, सालांत दोन आठवडे राबणूक घेऊन, पोटास शेर द्यावा, ऐसी चाल होती. हल्लीं राबणूक भारी पडते, व पोटास शेरही देत नाहीं, याजमुळें कितेक गांवचे महार परागंदा जाले आहेत ह्मणोन; ऐशास राबते माहार पंधरा दिवस सालीना राबऊन पोटास देणें. जाजती न घेणें. कलम १.

तर्फ मजकुरीं कारसाई व वेठ बिगार वगैरे शिरस्ते, व खंड गुन्हेगारीचा ठराव जमीदाराचे विद्यमानें जीवन माफक होई. आलीकडे होत नाहीं, यामुळें दुतर्फा मामलेदारांचा कजिया होऊन कलह वाढतो. आमची व कुळांची छळणूक होत्ये ह्मणोन; त्यास तुह्मी जमीदाराचे विद्यमानें घेणें. जाजती जलेल न करणें. कलम १.

पेंढा दर खंडीस पन्नास घ्यावयाचा शिरस्ता पहिल्यापासून चालत आहे, त्यास आलीकडे बेमोईन घेतात. शिरस्तेप्रमाणें घेतल्यास भारी पडणार नाहीं ह्मणोन; त्यास सुदामतप्रमाणें पेंढा घ्यावा, जाजती घेऊं नये. कलम १.

जमीदारास पेंढापाल पडत होता, त्यास आलीकडे दोन वर्षे पाल पडत नाहीं; ह्मणोन; त्यास त्रिंबक विनायक याचे कारकीर्दीचे चालीप्रमाणें घेणें. जाजती न घेणें. कलम १.

तर्फ मजकूरची रयत बैल व टोणगे वहायास घेतात. व मोहतर्फा खूम उदमास घेतात, व गौळी खूम ह्मैसी कोण्ही घेतात.* त्यास कैलासवासी आपासाहेब यांणीं तह करून दिल्हा आहे कीं, सदरहूस जकात माफ, असें असतां सांप्रत जकातदार जकातीचा तगादा करितात ह्मणोन; त्यास तीन वर्षांपूर्वील चाल असेल त्याप्रमाणें चालवणें. नवीन करूं न देणें. कलम १.

---

1 Kárkuns of Government, the Sudhágadkar, and the Ángriá, visiting the villages for the purpose of enumerating houses, levied from the owner of each house $2\frac{1}{2}$ or 3 annas on account of food expenses, while formerly every house-owner in the village, where a kárkun halted, had to pay to the Khot, for the kárkun's food charges, one pice and half a seer of rice only. The former practice should be adhered to.

1 Rice of a fine quality should not be collected as revenue. If this be done, a deduction of $\frac{1}{4}$ the quantity due should be allowed in consideration of its superior quality.

1 Rice-straw should be levied at the rate of 50 bundles per khandi of rice.

एकूण कलमें अकरा सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें, नवीन उपद्रव रयतीस एकंदर न देणें. येविशीं सुधागडकरी यांसही ताकीद करून सदरहूप्रमाणें वर्तवणें ह्मणोन, कृष्णाजी रामचंद्र यांस. पत्र १.

येविशीं आत्माराम रघुनाथ तर्फ सुधागड यांस. पत्र १.

२

चिटणिसी.

७२४–( ५२८ ) कृष्णराव बळवंत यांची स्वारी कर्नाटकांत सन मजकुरीं जात होती, तेव्हां मौजे जेजुरी तर्फ करेपठार, प्रांत पुणें, येथें फौजसुद्धां मुकाम होता, त्यास सरकारच्या कारखान्यास दाणा, रतीब व वैरण मौजे मजकुराकडून पावले आहेत, मजुरा देणें, त्याप्रमाणें तुह्मांस हिशेबीं मजुरा पडेल ह्मणोन, रामचंद्र नारायण यांस. सनद १.

समान सबैन मया व अलफ सफर १६

परवानगी रूबरू.

७२५–( ५५० ) परगणे लोहोनेर व खारी वेलूरपाले येथील सालमजकूरचा ऐवज तालुके धोडपचे वेहेड्यास लाऊन दिल्हा, त्याप्रमाणें तुह्मांस वरात दिल्ही आहे, त्यास महालीं रबीचे पिकास व अफूस धक्का बसला, यास्तव कमी येईल ह्मणोन, वासुदेव नारायण व जगदीश वेंकटेश

समान सबैन मया व अलफ रबिलावल २२

---

1 The Mahárs were formerly required to render menial service for two weeks only in this (the) year; and during this period they received some corn for their maintenance. Service for a longer period was now demanded from them, while even the usual allowance was not paid to them. The Mahárs had consequently absconded from the villages. The old practice should be followed.

1 The requisition for forced service should be made through the Jamidárs. Fines &c. should also be inflicted with their cognizance.

**(724)** Krishnarao Balwant, while proceeding with an army to Karnátic in the current year, encamped at Jejuri. A set off was allowed to the villagers in the revenue-demand for the provisions supplied to him.

A. D. 1777-78.

**(725)** This Sanad shows that poppy was cultivated in Parganá Lóhoner and Khári Welurpále.

A. D. 1777-78.

कमाविसदार परगणे मजकूर यांणीं हुजूर विनंति केली; त्याजवरून परगणे मजकूरचा ऐवज सालगुदस्तां तालुके मजकुराकडे देविला आहे, त्याप्रमाणें सालमजकुरीं रुपये ४०००० चाळीस हजार तूर्त देविले असत, तरी सालमजकूरचे ऐवजीं ऐवज पावला असेल तो वजा करून बाकी ऐवज राहिला असेल तो घेणें. पुढें सरसुभेदार जमाबंदी ठरावितील त्यांत पावला ऐवज वजा करून बाकी राहील तो मग घेणें ह्मणोन, बाजीराव आपाजी यांचे नांवें.

सनद १.

येविशीं सर्वोत्तम शंकर यांस सनद कीं, सदरहू महालीं तुह्मी जाऊन, चौकशीनें जमाबंदी करून, त्यापैकीं महाल मजकूर वगैरे नेहमीं खर्च वजा करून बाकी राहील तो ऐवज धोंडपंकडे देवणें ह्मणोन. १

---

२

७२६–( ६५७ ) गोविंदराम कमाविसदार प्रांत कल्याण भिंवडी यांचे नांवें

*समानीन* चिटणिसी. पत्रें.
*मया व अलफ*
*जिल्हेज ७*

१ प्रांत कल्याण भिंवडी येथील पाहणी बाजीराव रामचंद्र यांणीं सन समान सबैनांत करून सरसुभा समजाविलें कीं, पाहणीप्रमाणें उगवणी होणार नाहीं, यास्तव रयतीस मोघम सूट द्यावी, त्याजवरून महालावर मोघम सूट देऊन सालबंदी लाऊन दिल्ही, त्यास सूट दिल्हाप्रमाणें रयतीस मजुरा पडली, किंवा दर मापानें खोताकडे राहिली. ते व आणखी कितेक कलमें पाहणीसंमंधें वगैरे अंतस्थ घेऊन सरकार नुकसानी केली असेल ते व, परभारें मनस्वी रयतीवर पट्या करून, हरतऱ्हेनें ऐवज साधून, दरम्याने महालकरी वगैरे यांणीं घेतला असेल, त्याची चौकशी पुरतेपणें कळेल तशी वाजबीचे रुईनें करून सदरील अन्वयें ज्याजकडे ऐवज लागू होईल त्याजपासून रूरयात न धरितां वसूल घेऊन ऐवज प्रांत मजकूरचे हिशेबीं जमा करणें ह्मणोन. पत्र.

---

( 726 ) The Kamávisdár of Pránt Kalyán Bhiwandi represented to the Sar Subhá in Samán Sabain that the revenue fixed after inspection could not be realized, and recommended that remissions be granted. The recommendation was accepted. The new Kamávisdâr Govindrao Rám was now directed to make inquiries on the following points.

A. D. 1779-80.

1 Whether the rayats received the remission, or whether the amounts were appropriated by the Khots.

१ कुंभाराचीं वधुवरें घोड्यावर बसऊन वरात मिरवूं नये. येविशीं कासार, सुतार, यांचा व कुंभारांचा कजिया होता, तो सरकारांतून मनास आणून कुंभाराचीं नवरानवरी घोड्यावर बसवावीं याप्रमाणें ठरलें, सबब कुंभारापासून नजरेचा ऐवज एकसाला सरकारांत घेतला, त्याप्रमाणें प्रांत मजकूर येथील कुंभारावर हुजुरून वरात जाली आहे, त्यास तेथील कुंभार गरीब, व दोन चार वर्षे प्रांतांत दंगा जाला, याजमुळें कांहीं परागंदा जाले, कांहीं आहेत ते खराब, याजकरितां येविशीं आज्ञा जाली पाहिजे, ह्मणोन तुम्हांकडील कारकुनांनीं हुजूर विदित केलें; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी मुलुक शिरस्तेप्रमाणें नजरेचा ऐवज घेणें ह्मणोन. पत्र.

७२७–( ६६० ) मौजे मजकूरचे पाटिलांनीं हुजूर येऊन अर्ज केला कीं, मौजे मजकुरावर वालुसरा पडोन पिकें गेलीं, याजकरितां सरकारांतून नजर मोजब्यास कारकून देऊन भोंवरगांवचा पडोसा पाहून पिकें गेलियाची चौकशी केली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून गोविंद लक्ष्मण कारकून शिलेदार यांस सरकारांतून नजर मोजब्यास पाठविले असेत, तरी हे व तुह्मीं मिळोन भोंवरगांवचा पडोसा पाहून पिकें गेल्याची चौकशी करून, कुळारगवार समजूत पाहून जाबता आकारून, मशारनिल्हे बरोबर हुजूर पाठऊन देणें ह्मणोन, धोंडो केशव कमाविसदार मौजे पाडळी, संमत कोरेगांव, प्रांत वाई यांचे नांवें. सनद १.

समानीन मया व अलफ जिल्हेज १६

रसानगी यादी.

७२८–( ७०६ ) महादाजी धोंडदेव साठये कुळकर्णी पेठ बाजार, माखजन, तर्फे संगमेश्वर, तालुके रत्नागिरी यांणीं हुजूर विदित केलें कीं, सालगुदस्तां बाळाजी गोपाळ थोरात, वस्ती पेठ मजकूर याणें सरकारांत समजाविलें कीं, गोविंद बल्लाळ साठये कुळकर्णी, पेठ मजकूर यांणीं आपले

इसन्ने समानीन मया व अलफ साबान ९

1 Whether the officers who made the inspection received bribes and thereby caused loss in the public revenue; whether the officers of the Mahál unauthorizedly levied extra cesses on the rayats for their use. He was further directed, in case any wrongful misappropriations were discovered, to recover the amount misappropriated from the person concerned.

( 727 ) At the request of the Pátil of Pádali, a kárkun was sent to make a rough inspection of the crops of the village, which were alleged to have been damaged and the Kamávisdár was directed to report the result of his inspection.

A. D. 1779-80.

( 728 ) Báláji Gopál Thorát complained that Govind Ballál Sáthaye Kulkarni of Peth Bájár, Mákhjan, in Tarf Sangameshwar in Táluká Ratnágiri caused a peon to torture

A. D. 1781-82.

लेकास सरकारचे बाकीकरितां प्याद्याकडून नाशिकास चाप लाविले, 'असें समजाऊन आपणांस पंचवीस रुपये मसाला करून हुजूर आणिलें, व रत्नागिरीचा कारकून साक्षीस होता, त्यांची साक्षी सुभाचीं बखरें आणविली, त्यावरून मनास आणितां पंचाइत मसें ठरलें कीं, कुळकर्णी यांणीं बाकीची पटी सरकारचे प्याद्याजवळ करून दिल्ही, चाप तो प्याद्याजवळ नव्हताच. प्याद्यांनीं थोराताचे मुलास कोइंडी लाविली. ती कुळकर्णी यांणीं लावावयास सांगितली नाहीं; परंतु कोइंडी ज्या समई प्याद्यानें लाविली, तेव्हां कुळकर्णी जवळ होते, आणि सोडविलें नाहीं, हा दोष ठेऊन कुळकर्णी व आपली असामी रत्नागिरीस होती ते जप्त करून कुळकर्णाचें उत्पन्न व मुशाहिरा व असामीचें वेतन सरकारांत जमा करणें ह्मणोन, सुभा सनद जाऊन जप्ती जाली आहे. ते मोकळी करावयाची आज्ञा जाली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी पेठ मजकूरचें कुलकर्ण व कुळकर्णियाची असामी थोराताचे कजियाकरितां सरकारांत जप्त केली होती, ती हल्लीं रदबदलीमुळें मोकळी केली असे, तरी कुळकर्णाचे वतमाची व असामीची जप्ती मोकळी करून पूर्ववत्प्रमाणें कुळकर्णाचें व असामीचें कामकाज घेऊन, असामीचें वेतन सालमजकुरापासून देत जाणें ह्मणोन, महिपतराव कृष्ण तालुके मजकूर यांचे नांवें चिटणिसी पत्र १.

७२९-( ७२९ ) रामचंद्र पवार यांणीं हुजूर विदित केलें कीं, परगणे बाहाळ व परगणे बोरनार येथील जहागीर आपल्याकडे सरंजामास सरकारांतून आहे, व सरदेशमुखी परगणे बाहाळ येथील महादाजी निळकंठ यांजकडे आहे, त्यास पेशजीं परगणे मजकूरची खंडणी एकेजागा जहागीरदाराचे कचेरींत होऊन तहशील परभारें अंमलदार करीत होते, याजमुळें गांवगन्ना खर्च

इसन्ने समानीन मया व अलफ. जिल्काद १८

Báláji's son with an instrument of torture called ( châp ) for the recovery of Government revenue. Mahádji Dhondeo Sáthaye ( Báláji's relative ) was called to the Huzur, and an inquiry was made. It was found that another kind of torture called ( Koindi ) and not the one complained of was inflicted by the peon, and that the Kulkarni though present at the time did not interfere. The Kulkarna Watan and the emoluments of the office of kárkoon which Mahádji held was therefore attached. The attachment was through intercession now removed.

( 729 ) It was found that the system of collecting revenue separately by the different Amaldàrs besides being expensive led to oppression. The late Peshwá Mádhavráosáheb therefore issued orders to the effect that the collections should be received in one place at the office of the Jahágirdár and should then be distributed among themselves by the several Amaldárs. Rámchandra Powár, the Jahágirdár of Parganá Báhál and Bornár, represented that

A. D. 1781-82.

पडोन, माहालची खराबी होत होती, याजकरितां कैलासवासी माधवरावसाहेब यांणीं तह करून देऊन पत्रें करून दिल्हीं कीं, जाहगीरदाराचे कचेरींत एक जागा वसूल अमलदारांनीं हिसेरसीद ऐवज घ्यावा, याप्रमाणें चालत असतां सरदेशमुख यांणीं सन अर्बा सबैनांत दादासाहेब यांस गैरवाका समजाऊन पत्रें आणून सदरील तह मोडून, महालीं निराळी तहसील करूं लागले, याजमुळें महालची खराबी होऊन लावणी कमी होऊं लागली, याजकरितां पेशजीं कैलासवासी माधवरावसाहेब याणीं तह करून दिल्हा आहे, त्याप्रमाणें एकेजागा जहागीरदाराचे कचेरीस तहशील होऊन हिसा सर्वत्रांनीं घ्यावा, येविशीं ताकीद जाहली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी तीर्थस्वरूप कैलासवासी रावसाहेब यांणीं पेशजीं पत्रें करून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें तुह्मीं हरदू महालाचे अमलदारांस व जमीदारांस ताकीद करून जहागीरदाराचे कचेरीस एकेजागा तहसील होऊन हिसेरसीद ऐवज जहागीरदार, मुकासी व बाबतीवाले, व सरदेशमुख घेत तें करणें. तीर्थस्वरूप कैलासवासी रावसाहेब यांचे पत्राप्रमाणें वहिवाट करवणें ह्मणोन, नारो कृष्ण सरसुभा, प्रांत खानदेश यांस चिटणिसी. पत्र १.

सदरील अन्वयें तहविशीं. पत्रें ८.

४ परगणे बहाळ येथील तहाविशीं.

१ जमीदार परगणे मजकूर यांस.

१ रामाजी महादेव कमाविसदार, मुकासा जफ्ती सोमवंशी परगणे मजकूर यांस.

१ बाळजी भोसले यांजकडे मुकाशापैकीं हिसा आहे त्याविशीं.

---

४

३ परगणे बोरनार येथील तहविशीं.

१ जमीदार परगणे मजकूर यांस.

१ सुलतानजी धायभर यांजकडे मुकासा आहे त्याजविशीं.

१ जनार्दन गोपाळ कमाविसदार बाबती सरदेशमुखी पैकीं मजकूर यांस.

---

३

---

these orders were, on a misrepresentation by Mahádaji Nilkanth the holder of the Sardeshmukhi amal, revoked by Dádásáheb, that this revocation had resulted in a decrease of cultivation, and that revenue had suffered. He therefore prayed that the previous orders be again enforced. His prayer was granted.

१ रामचंद्र पवार यांस पत्र कीं, सदरील तह्प्रमाणें वहिवाट करीत जाणें ह्मणोन.

८ ९

नऊ चिटणिसी पत्रें दिल्हीं असेत.

७३०–( ७९३ ) परगणे बोरनार येथील बाबती व सरदेशमुखीचा अमल सरकारांतून जनार्दन गोपाळ यांजकडे आहे, त्यास महालाची जमाबंदी एकेजागां होऊन वांटणी जमीदारांनीं करावी; आणि परभारी ज्यांची त्यांणीं तहसील करावी, असें असतां तुह्मीं कचेरीस हिसा देतां, ह्मणोन हुजूर विदित जाहलें; त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी पेशजींप्रमाणें ज्यांचा हिसा ते परभारी तहशील करितील, त्यास तुह्मीं दिक्कत न करणें ह्मणोन, रामचंद्र पवार यांचे नांवें. पत्र १.

सलास समानीन
मया व अलफ
जमादिलावल २७

येविशीं जमीदार परगणे मजकूर यांस पत्र कीं, तुह्मीं मशारनिल्हेसीं रुजू होऊन बाबती सरदेशमुखीचे अमलाचा वसूल यांजकडे सुरळीत देणें ह्मणोन. पत्र १.

२

चिटणिसी.

( या सनदेंतील हुकूम मागच्या सनदेंतील हुकुमाच्या अगदीं उलट आहे. )

७३१–( ८४८ ) मौजे कुरकवाडें तर्फ चिकणें, परगणें नंदुरबार, हा गांव बदलोन जमाबंदीचा पैका देत नाहीं, त्याचे पारिपत्यास वामनाजी हरी कमाविसदार परगणे मजकूर, दिंमत तुकोजी होळकर, हे गेले असतां गांवकरी यांणीं गोळी वाजऊन घोडीं माणसें जाया केलीं, तोफा खेरीज पारिपत्य होत नाहीं, यास्तव कुकरमुंडेंपैकीं तोफा देवाव्या ह्मणोन वामनाजी हरी यांणीं लिहिलें; त्याजवरून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी ठाणें घ्यावयास कुकरमुंडें

खमस समानीन
मया व अलफ
साबान ३

( 730 ) The practice in Parganá Bornár was for the Jamidárs to do the Jamábandi of the revenues of the Mahál and to settle the amounts due to the several Amaldárs. The collections were then to be made by each Amaldár separately. The Jahágirdár of the Parganá, however, collected himself the amount due to Government on account of certain Amals, and paid it to their Kamávisdár. He was directed to conform to the old practice. ( This is at variance with the order contained in the preceding entry. )

A. D. 1782-83.

( 731 ) The villagers of Kurakwáḍe in Tarf Chikaṇ in Parganá Nandurbár revolted and refused to pay Government revenue. Wámnáji Hari, the Kamávisdár of Tukoji

A. D. 1784-85.

पैकीं तोफा २ दोन दारू गोळे सरंजामसुद्धां, व शंभर माणूस मशारनिल्हेकडे कुमकेस देविलें असे, तर देऊन दारूगोळ्याची किंमत व तोफांस खर्च लागेल तो मशारनिल्हेपासून घेणें. ठाणें हस्तगत जालियावर तोफा व माणूस कुकरमुंढेयास नेणें ह्मणोन, नारायणराव यादव तर्फ कुकरमुंढें यांस. सनद १.

रसानगी यादी.

समान समानीन मया व अलफ रबिलावल १८

७३२-(९६५) कृष्णराव गंगाधर यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. परगणा नाशिक येथें सालमजकुरीं मघांचा पर्जन्य पडला, अलीकडे आजपावेतों पर्जन्य नाहीं, ब्राह्मण अनुष्ठानास लाविले आहेत, महर्गता बहुत जाहली, आफ्तीमुळें रयतीस आधार नाहीं. साल गुदस्तांचे जमा वसूल होऊन बाकीचा वसूल घ्यावयाचा त्यास खरीफाचें पीक गेलें आहे. याजकरितां आफ्तीची चौकशी करावयाविशीं आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन लिहिलें; त्यास परगणा मजकूर येथील आफ्तीची चौकशी करावयाविशीं सर्वोत्तम शंकर यांस आज्ञा केली असे, तरी त्यांजकडील कारकून, व तुह्मीं मिळोन गांवगन्ना कुळारगवार आफ्तीची चौकशी करून, जाबता हुजूर पाठवणें. समजोन फडशा केला जाईल ह्मणोन. सनद १.

परवानगी रूबरू.

---

Hoḷkar, proceeded against them, but the villagers took to arms, and repulsed him with loss. Two cannon-pieces and 100 men were therefore lent to assist him in reducing the village to submission.

A. D. 1787-88.

(732) Krishṇarao Gangádhar reported that there was a scarcity of rain in Parganá Násik in this year, that Brahmins were engaged in invoking the deity for rain, that grain had become very dear, and that the rayats could hold out no longer. He asked permission to inquire into the extent of the scarcity, (in order that the revenue collectors might be regulated accordingly). Sarwottam Shankar was directed to make the investigation.

# ३ मुलकी खातें.

## ( क ) शेतकीस उत्तेजन.

### ( १ ) तगाई.

७३३–( ३०४ ) परगणे सरभुवन, प्रांत गुजराथ, हा महाल फौजेचे पायमल्लीनें खराब जाहला, रयतेचीं घरेंदारें जळालीं, लावणी होत नाहीं, ह्मणोन हुजूर विदित जाहलें; त्यावरून हे सनद सादर केली असे, तरी परगणे मजकूरचे रयतीस तगाई देऊन महालची लावणी करणें, मामलतीची घालमेल जाहल्यास तुमचा ऐवज तगाईचा होईल तो व्याजसुद्धां ज्याकडे मामलत होईल त्याजकडून देविला जाईल ह्मणोन, चिंतामण हरी यांस. सनद १.

सब्बा सबैन मया व अलफ जमादिलावल ८

परवानगी रूबरू.

७३४–( ६७३ ) घनश्याम त्रिंबक यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं विनंतिपत्रें पाठविलीं तीं पावलीं, त्याचे जाबसाल येणेंप्रमाणें.

समानीन मया व अलफ रबिलावल १०

बापूजी होळकर हिंदुस्थानांतून देशीं येतां, व तुकोजी होळकर, व महादजी शिंदे गुजराथेंत जातां, महालोमहालीं मुक्काम करून घासदाणा वगैरे ऐवज घेतला, त्याची याद पाठविली ती पावली, त्यास पायमाली फौजे-

---

# III LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

## ( C ) Encouragement to Cultivation.

### ( 1 ) Tagái.

( 733 ) The Pargaṇá of Sarbhuwan in Gujerath having suffered by the inroads of armies, the area of cultivation decreased. Orders were therefore issued to the Mámlatdár to encourage cultivation by making Tagái grants to the rayats.

A. D. 1776-77.

( 734 ) Bápuji Hoḷkar while returning from Hindustán and Tukoji Hoḷkar and Mahádaji Scindia while proceeding to Gujerath levied Ghásdáṇá from the Mahâls through which they passed. Ghanashám Trimbak informed Government of this fact. He was asked to report after inquiry and in consultation with the Sar Subhedár the loss sustained by the rayats on account of the movements of the army. He further informed Government that owing to 4 halts of the Hoḷkar and Scindia in Pargaṇá Ner, the Pargaṇá was pillaged and was lying desolate, and the rayats had absconded. He was directed to give letters of assurances to the rayats, Pâtils, and Jamidárs, to grant Tagái, and to see that cultivation prospered.

A. D. 1779-80.

मुळें जाहली त्याची वगैरे चौकशी सरसुभाचे विद्यमानें करून लेहून पाठवणें, व पेस्तर लावणीचा बंदोबस्त करणें. कलम १.

परगणा नेर येथें होळकर व शिंदे यांचे मुक्काम चार होऊन परगणा लुटून बेचिराख केला, घरें मोडून नेलीं; यामुळे रयत परागंदा जाहली आहे, त्यास रयतीस व मोकदमांस व जमीदार यांस अभयपत्र व तगाई पेस्तर लावणीबद्दल द्यावयाकरितां आह्मांस खातरजमेचें पत्र द्यावयाची आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन लिहिलें; त्यास रयतीस व मोकदमांस व जमीदारांस अभयपत्रें, व तगाईविशीं तुह्मांस अलाहिदा पत्रें सादर आहेत, तरी तुह्मी दिलभरंवसा देऊन परगणा मजकूरची आबादी करणें. कलम १.

७३५–( १०८२ ) परगणे नेवासें वगैरे मंहाल येथील रयत साल गुदस्तां आसीमुळें परागंदा होऊन, खानदेश व वऱ्हाड प्रांतें गेली, व कांहीं गांवीं राहिली, त्यांचे बैल गुरें मयत जाहलीं; त्यास महालची लावणी जाहली पाहिजे याजकरितां रयतेचें बोलणें कीं, इस्ताव्याचें भरसाल, त्याप्रमाणें लावणी होत नाहीं, सबब कमती कौल करून द्यावा, व तगाई पोटगी द्यावी, ह्मणजे लावणीचा बंदोबस्त होऊन रयत मुलकावर गेली आहे, ते आणून आबादी करूं, येविशीं बोलण्यास दहा पांच गांवचे पाटील पुण्यास आले होते, त्यांची खातरजमा केली कीं, सरकारांत विनंति करून कौल व तगाईचा बंदोबस्त करून घेतों, याप्रमाणें त्यांस सांगोन महालीं रवाना केलें. येविशीं कौल व तगाई द्यावयाची आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन तुह्मीं विनंति लिहिली; ऐशास सुभाऊन चौकशी करून रयतेस कौल देऊन लावणीचा बंदोबस्त राखणें; व तगाई कार्याकारण पाहोन, तुह्मी रयतेस देऊन, तो ऐवज हंगामी त्यांजकडून वसूल करून घेणें ह्मणोन, मोरो हरी, दिंमत रामचंद्र नारायण यांचे नांवें छ. १७ जिल्हेज. सनद १.

अर्बा तिसेन मया व अलफ मोहरम १४

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

---

( 735 ) Some of the rayats of Parganá Newáse &c. left their homes in the preceding year owing to scarcity, and went to Khándesh and Berárs. Those who remained lost their cattle. The Pátils of several villages therefore came to Poona and requested Moro Hari in the service of Rámchandra Náráyan that unless kowls were granted reducing the assessment, and unless Tagái was given, the village-lands could not be brought under cultivation. Moro represented the matter to Government. The concession asked for was allowed to be granted.

A. D. 1793-94.

## ३ मुलकी खातें.

### ( क ) शेतकीस उत्तेजन.

### ( २ ) पडीत जमिनीच्या लागवडीकरितां व बागाईत वाढविण्याकरितां विशेष प्रकारची सवलत.

### नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

७३६--( ७४ ) विरेश्वर हरी कमाविसदार, कसबे नारायणगांव, प्रांत जुन्नर यांचे नांवें सनद कीं, कसबे मजकूर येथील धरण सन सलास सबैनांत नदीस पाणी येऊन फुटलें, याजमुळें बागाईत पडलें, सबब साल-मजकुरीं धरणाचे कामाबद्दल पांच हजार रुपये द्यावयाची नेमणूक केली असे, तरी पाया पक्का घालून वरचें काम व्हावयास दिवसगत लागेल, सबब पाया जाहल्यावर दगड माती लांकडें वगैरे लाऊन, पाणी तुंबऊन, पाट चालता करून, बागाईत पेशजींप्रमाणें करणें. गांवचा ऐवज तूर्त वसूल यावयाचा नाहीं, सबब हुजुरून सदरहू पांच हजार रुपये द्यावयाचे, करार केला असे, तरी ऐवज घेऊन धरणाचें काम चौकशीनें करणें, म्हणोन. छ. २४ जमादिलावल. सनद १.

खमस सबैन
मया व अलफ
जमादिलाखर २९

रसानगी यादी.

७३७--( ९५ ) तालुके अंजणवेल येथें पेशजीं बागाईत होतें, आलीकडे पीक कमी जाहलें, सरकारदस्त भारी पडतो, येणेंकरून रयत नाउमेद होऊन सालेसाल बागाईत कमी होतें, त्यास स्वामींनीं कृपाळु होऊन नक्की शिरस्ता व माफीचा कौल कांहीं सईल करून दिल्हियास रयत उ-

खमस सबैन
मया व अलफ
साबान ६

---

## III LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

### ( C ) Encouragements to cultivators

### ( 2 ) Special concessions for the cultivation of waste tracts and the spread of irrigation, Kowls &c.

### FROM NÂRO APPÂJI'S DIARY.

( 736 ) A dam at Nárâyangaon in Prânt Junner having been washed away in A. D. 1772-73, no Bágáyat crops could be grown. Sanction was given to the construction of a solid dam at a cost of Rs. 5,000.

A. D. 1774-75.

( 737 ) At the request of Náro Anant Parchure, Mahájan of Guhágar, the following terms were offered for the encouragement of cultivation in Táluká Anjanwel.

A. D. 1774-75.

मेदवार, होऊन कीर्द करील; व दगड सडा आहे त्ये जागा झाडें व गवत कांहींच होत नाहीं, तेथें बाहेरून माती आणून घालून, नूतन जमीन शेत होये; व डोंगरांतील दगड फोडून वोढा नाला असेल त्यास माती घालून नूतन शेत होय ऐसें करावयास रयत उमेदवार आहे, याकरितां जो कोणीं उमेद धरून, नूतन जमीन तयार करील, त्यापैकीं निमे राहील त्यास वीस वर्षे माफी होऊन पुढें कमधारा पांच वर्षे घेऊन मग शिरस्तेप्रमाणें धारा घ्यावयाचा करार करून दिल्हियास आबादी होईल, व दर्यागर्के खाजणी जमिनीस बांधबंदिस्त करून नूतन शेत होय ऐसें करावयास रयत उमेदवार आहे, याकरितां जो जमीन तयार करील, त्यास त्या जमिनीपैकीं चौथाई जमीन इनाम व बंदिस्तीस खर्च मेहनत लागेल, त्याचा अजमास पाहोन माफी सालें, व इस्ताव्याचा कौल दिल्यास नवसाध्य ठिकाणाची लावणी होऊन, कीर्द महामुरा होईल ह्मणोन, नारो अनंत परचुरे महाजन कसबे गुहागर यांणीं हुजूर किल्ले पुरंदर येथील मुक्कामीं येऊन विनंति केली; त्याजवरून मनास आणितां बागाइताची लावणी व नवसाध्य ठिकाणें जमिनीवर पूर्वीं शेतें जाहलीं नाहींत; व नवीन व्हावयास असाध्य ते जमिनीची कस्त मेहनत चांगली करून तेथें शेतें करितील, त्यांस कीर्द महामुरीवर नजर देऊन बागाइताची व नवसाध्य ठिकाणांची सदरीलप्रमाणें उस्तवारी करून बागाइताची लावणी व शेतें करितील, त्यास माफी व इस्तावा शिरस्ता येणेंप्रमाणें.

---

1 Should any person bring an entirely rocky ground under cultivation by covering it with earth, and by providing embankments around it, half the land shall be given to him in Inám, and the remaining half shall be continued rent-free for 20 years, and at reduced rates for 5 years more, and shall after that period be subjected to full assessment.

1 Should any person reclaim salt-land by providing embankments, one fourth of the land shall be given to him in Inám and the remaining portion shall be continued rent-free and at reduced rates, for such periods as upon a consideration of the money and labour spent, may seem fit.

1 Should any person plant the following trees, no tax shall be levied on their account for the number of years specified below.

| | |
|---|---|
| 1 Cocoanut trees | 18 or 20 years, |
| 1 Betel-nut trees | 15- Do— |
| 1 Undaṇi trees | 12- Do— |

After the lapse of the above period, the following levies shall be made.

1 For each cocoanut tree o-4 Annas and a load of loppings,

तालुकियांत सडा आहे त्ये जागा बाहेरून माती आणून नूतन जमीन मेहनतीनें रयत करील, व डोंगरांतील दगड फोडून वोढा नाला असेल त्यास माती घालून नूतन शेत होय ऐसें करावयास रयत उमेदवार आहे, त्यास उमेद धरून जो करील त्यास त्या जमिनीपैकीं निमे जमीन इनाम देऊन बाकी निमे राहील त्यास माफीसालें वीस होऊन, पुढें पांच वर्षे कमधारा घेऊन, मग शिरस्तेप्रमाणें धारा घ्यावयाचा करार केला असे, तरी सुभाहून तकवियत कौल देऊन जमीन तयार करवणें, तयार जाहल्यावर मोजणी करून जाबते लिहोन हुजूर पाठवीत जाणें, ते पाहून त्यापैकीं निमे जमिनीचीं इनामपत्रें हुजुरून करून दिल्हीं जातील. बाकी निमे जमीन राहील, त्याचा सदरीलप्रमाणें माफी सालें व कमधाऱ्याचा कौल पाठऊन, पुढें शिरस्तेप्रमाणें धारा घेत जाणें. कलम १.

तालुके मजकुरीं दर्यागर्क खाजणी जमिनीस बांधबंदिस्त करून नूतन शेत होय असें रयत उमेद धरून करील, त्यास त्या जमिनीपैकीं चौथाई जमीन इनाम देऊन, बाकी तीन तक्षिमा जमीन राहील त्यास माफी सालें, व इस्तावा खर्च मेहनतीचा अजमास पाहून, शिरस्तेप्रमाणें दर घ्यावयाचा करार केला असे, तरी

बागाइताचा शिरस्ता लावणीचे सालापासून माफीसालें.

| नारळ माडास. | सुपारीस. |
|---|---|
| सालें. | सालें १५ |
| उमर व पुलणवट | उंडणीस सालें १२ |
| नारळ फड जमिनीस | तांबड जमिनीस |
| १८ | २० |

यासी माफी सालें भरल्यावर सरकार दस्त दरझाडास पटी बाबसुद्धां नक्त. रुपये.

| | |
|---|---|
| नारळ माडास दस्त. | सुपारीच्या झाडास रुपये ‌८ |
| नारळ माडास रुपये ।· | |
| भंडार माडास रुपये १ | उंडणीच्या झाडास रुपये ‌८= |
| झांप दर माडास सुमार १ | |

एकूण शिरस्ता माफीचा नारळ माडास उमर, व पुलणवट जमिनीस सालें अठरा व तांबड जमिनीस सालें वीस, व सुपारीस सालें पंधरा, व उंडणीस सालें बारा, येणेंप्रमाणें माफी सालें भरल्यावर दस्त दरसाल दर झाडास नारळ माडास पावला व भंडार माडास एक रुपया व सुपारीस एक आणा व उंडणीस तीन आणे पट्टी बाबसुद्धां, नक्त माडास ऐन जिन्नस झांप सुमार एक, याप्रमाणें करार केला असे, तरी श्रमसाहस करून बागाईत नवकीर्द करील, त्यास साल मजकुरापासोन सदरहूप्रमाणें सुभाहून कौल जे सालीना घेईल त्यास देऊन, बागाइ-

---

1 For each cocoanut tree used by Bhandáris Rupee 1–Do.
1 For each betelnut tree. 0–1
1 For each Undani tree 0–3

सुभाहून तपशिलवार कौल देऊन जमीन तयार करवणें, तयार जाहल्यावर मोजणी करून जाबते लिहोन हुजूर पाठवीत जाणें. ते पाहून त्यापैकीं चौथाई जमिनीचीं इनामपत्रें हुजुरून दिल्हीं जातील. बाकी तीन तक्षिमा जमीन राहील, त्याचीं माफी सालें व इस्तावियाचा कौल सुभाहून देऊन, पुढें शिरस्तेप्रमाणें धारा घेत जाणें.

कलम १.

ताची आबादी करऊन, सालेसाल बागाइत होईल, त्याचा झाडा हुजूर समजावीत जाणें. कलम १.

एकूण तीन कलमें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी गांवगन्नाचे खोत वगैरे सुभा आणून सदरील प्रमाणें जमिनीची लागवड करवणें ह्मणोन, कृष्णाजी विश्वनाथ यांचे नांवें. सनद १.

मोकदमानी, व रयानी, तर्फ गुहागर वगैरे महालानिहाये यांस कीं, मेहनत करून जमिनीची लागवड व बागाइताची लावणी करणें, सदरहूप्रमाणें कौल पाठऊन उगवणी करून घेतली जाईल ह्मणोन. १

—

२

रसानगी यादी.

७३८—( १०९ ) तालुके सुवर्णदुर्ग येथें पेशजीं बागाईत होतें, आलीकडे पीक कमी जाहलें, सरकारदस्त भारी पडतो, येणेंकरून रयत नाउमेद होऊन सालेसाल बागाईत कमी होतें. त्यास स्वामींनीं कृपाळु होऊन नक्की शिरस्ता व माफीचा कौल कांहीं सहल करून दिल्यास रयत उमेदवार होऊन कीर्द करील, व दगड सडा आहे तो जागा झाडें व गवत कांहींच होत नाहीं. तेथें बाहेरून माती आणून घालून व डोंगरांतील दगड फोडून ओढा नाला असेल त्यास माती घालून नूतन शेत होय असें करावयास रयत उमेदवार आहे, याकरितां जो कोणीं उमेद धरून नूतन जमीन तयार करील, त्यापैकीं निमे जमीन इनाम देऊन, बाकी निमे राहील त्यास वीस वर्षें माफी होऊन, पुढें कमधारा पांच वर्षें घेऊन, मग शिरस्तेप्रमाणें धारा घ्यावयाचा करार करून, दिल्हियास आबादी होईल; व दर्यागर्के खाजणी जमिनीस

खमस सबैन मया व अलफ रमजान १७

---

( 738 ) Concessions similar to those granted to the rayats of Tálukâ Anjanwel ( vide Sábán 6 of this year ) were granted to the inhabitants of Tálukâ Suvarṇadurg.

A. D. 1774-75.

बांधबंदिस्त करून नूतन शेत होय, असें करावयास रयत उमेदवार आहे, याकरितां जो जमीन तयार करील, त्यास त्या जमिनीपैकीं चवथाई जमीन इनाम, व बंदिस्तीस खर्च मेहनत लागेल त्याचा, आजमास पाहून माफी सालें व इस्ताव्याचा कौल दिल्यास नवसाध्य ठिकाणांची लावणी होऊन, कीर्द महामुरा होईल ह्मणोन, गोविंद केशव बिवलकर खोत व कमाविसदार कजबे दाभोळ, तालुके पंचनदी, व महादाजी बल्लाळ पेंडसे महाजन मौजे मुर्डी व बाळाजी चिंतामण दातार महाजन कजबे आंजर्लें, व बाबाजी बल्लाळ साठे चौघुले कजबे मजकूर, तालुके केळशी यांणीं हुजूर किल्ले पुरंधर येथील मुक्कामीं येऊन विनंति केली; त्याजवरून कीर्द महामुरीवर नजर देऊन, बागाइताची व नवसाध्य ठिकाणाची सदरहूप्रमाणें उस्तवारी करून बागाइताची लावणी व शेतें करितील त्यांस माफी इस्तावा व शिरस्ता येणेंप्रमाणें.

तालुकियांत सडा आहे त्ये जागा बाहेरून माती आणून नूतन जमीन रयत मेहनतीनें करील, व डोंगरांतील दगड फोडून, ओढा नाला असेल त्यास माती घालून नूतन शेत होय असें करावयास रयत उमेदवार आहे, त्यास उमेद धरून जो करील त्यास त्या जमिनीपैकीं निमे जमीन इनाम देऊन, बाकी निमे राहील त्यास माफी सालें २० वीस होऊन पुढें पांच वर्षे कमधारा घ्यावा, याप्रमाणें करार केला असे, तरी तालुके मजकुराहून तकवियत कौल देऊन जमीन तयार करवणें; व त्या जमिनीचे मोजणीचे जाबते सुभाहून हुजूर पाठवाल त्यापैकीं निमे जमिनीचीं इनामपत्रें करून देऊन, बाकी निमे जमीन राहील त्याचा सदरहूप्रमाणें माफी सालें व कमधाऱ्याचा कौल पाळून पुढें शिरस्तेप्रमाणें धारा घेत जाणें. कलम १.

तालुके मजकुरीं दर्यागर्के खाजणी जमिनीस बांधबंदिस्त करून, नूतन शेत होय असें रयत उमेद धरून करील, त्यास

बागाइताचा शिरस्ता व लावणीचे सालापासून माफी सालें.

| नारळ माडास सालें. | सुपारीस सालें १५ |
|---|---|
| उमर व पुळणवट जमिनीस सालें १८ | तांबड जमिनीस सालें २० |

फणस व उंडणीस सालें १२

यासी माफी सालें भरल्यावर सरकारदस्त दर झाडास पटी बाबसुद्धां नक्त.

रुपये.

| दस्त नारळ माडास नक्त. | सुपारीच्या झाडास रुपये ॥ |
|---|---|
| नारळ माडास रुपये ·।· भंडार माडास रुपया १ | फणस व उंडणीच्या झाडास ॥= |

झांप दर माडास सुमार १.

एकूण शिरस्ता माफीचा नारळ माडास उमर व पुळणवट जमिनीस सालें अठरा व तांबड जमिनीस सालें २० वीस व सुपारीस सालें १५ व फणस व उंडणीस सालें बारा येणेंप्रमाणें माफी भरल्यावर दस्त दरसाल दर झाडास नारळ माडास

त्या जमिनीपैकीं चवथाई जमीन इनाम देऊन बाकी तीन तक्षिमा जमीन राहील त्यास माफी सालें व इस्तावा खर्च मेहनतीचा आजमास पाहून, शिरस्तेप्रमाणें दस्त घ्यावा ह्मणोन; त्याजवरून सुभाहून तकवियत कौल देऊन जमीन तयार करवणें, तयार जाहल्यावर त्या जमिनीची मोजणी करून, खर्च मेहनतीचा आजमास पाहून जमिनीचे मोजणीचे जाबते हुजूर पाठवाल त्यापैकीं चवथाई जमिनीचीं इनामपत्रें करून देऊन, बाकी तीन तक्षिमा जमीन राहील त्याचीं माफीसालें व इस्ताव्याचा कौल तालुकेयाहून देऊन, जाबते हुजूर पाठवणें, त्याप्रमाणें पाळलें जाईल. कलम १.

पावला व भंडार माडास एक रुपया व सुपारीस एक आणा व फणस व उंडणीस तीन आणे, पटी बाबसुद्धां नक्त व माडास ऐन जिन्नस झांप सुमार एक, याप्रमाणें करार केला असे, तरी सुभाहून कौल देऊन श्रम साहस करऊन बागाइताची आबादी करवणें. कलम १.

एकूण तीन कलमें सदरहूप्रमाणें करार करून दिलीं असेत, तरी गांवगन्नाचे खोत वगैरे सुभा आणून, त्यांस कौल देऊन, जमिनीची लागवड व बागाईत यांची लावणी करऊन सदरहूप्रमाणें कौल पाठऊन उगवणी करून घेत जाणें ह्मणोन, मोरो बापूजी यांचे नांवें. सनद १.

मोकदमानी व रयान महालानिहाय तर्फ मजकूर यांस कौल कीं, जमिनीची लागवड करणें, व बागाइताची लागवड करणें. सदरहूप्रमाणें कौल पाठऊन उगवणी करून घेतली जाईल ह्मणोन. कौल.

---

२

रसानगी यादी.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

७३९–(४५४) महादाजी बापूजी खोत महाजन मौजे शेडवई नारगोली, तर्फ नातूपालवण, तालुके सुवर्णदुर्ग, यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे मजकुरीं बागाइत पूर्वीं माहामूर होती, त्यास पेशजीं भालेराई जाहली, तेव्हां ब्राह्मण परागंदा होऊन गेले, त्यास सवाशें वर्षें जालीं; बागाइत

सबा सबैन मया व अलफ रबिलाखर २६

---

FROM JANARDAR APAJI'S DIARY.

(739) Mahádji Bápuji, Khot Mahájan of Mauze Shedwái Nárgoli, Nátupalwán, in Táluká Suwarṇadurg, represented that formerly there was considerable canal-irrigation in the

A. D. 1776-77.

जमीन जंगलमर्के पाणीपाटसुद्धां जाहली आहे, याजकरतां सरकारांतून तकवियत कौल दिल्यास पाट चालता करून बागाईत करावयास उमेदवार आहों ह्मणोन; त्याजवरून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी हल्लीं हे मौजे मजकुरीं पाट चालता करून बागाईत करणार याजकरितां तकवियत कौल सुभाहून मुलुकशिरस्तेप्रमाणें देऊन अमदानी करवणें ह्मणोन, मोरो बापूजी यांस छ. ३ रबिलाखर. सनद १.

रसानगी यादी.

७४०–( ८४९ ) कसबे नारायणगांव निसबत गोविंद गणेश येथील धरण बांधावयाचें काम लाविलें आहे, यास चुन्याचे चाकाचे व गाड्याचे बैल बांधावयास पडळ पाहिजे, याजकरितां सरकारचीं कुरणें मौजे कावळे व गंगापूर व सिनोली येथें आहेत, त्या कुरणांपैकीं वांसे हरजिनसी सुमारें ३०० तीनशें देविले असत, तरी सदरहू वांसे कापून नेतील, त्यास नेऊं देणें ह्मणोन, शिवराम रघुनाथ यांस. सनद १.

खमस समानीन मया व अलफ साबान ५

रसानगी यादी.

७४१–( ८७८ ) पांडुरंग बल्लाळ उपनाम अचवल, गोत्र भारद्वाज, सूत्र आश्वलायन वास्तव्य मौजे आंपगांव, तर्फ सानोळें, प्रांत कल्याण भिंवडी, यांणीं हुजूर कसबे पुणें, येथील मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, कसबे दहिवलें, परगणे मजकूर, सरकार बागलाण, प्रांत खानदेश, येथें नदींतील धरणाचा जुना बंधारा होता तो फुटला, त्याजमुळें कसबे मजकूरचा आकार कमी होतो, त्यास बंधारा बांधल्यास सरकार किफायत होईल. बंधाऱ्याचे बंदिस्तीस अजमासें एकतीसशें बासष्ट रुपये लागतील, त्यापैकीं अडीच हजार रुपये सावकारापासून कर्ज घ्यावें लागेल. त्यास पांच बिघे जमीन व बाकीचें काम रयतेपासून आंगमेहनतीनें घ्यावें लागेल, सबब मोकदम यांस पांच बिघे जमीन एकूण दहा बिघे जमीन, बंधाऱ्यामुळें बागाइती तयार होईल. त्यापैकीं इनाम करार दिल्यास बंधारा तयार करूं ह्मणोन, गणेश दादाजी कमाविस-

खमस समानीन मया व अलफ जमादिलावल २

---

village, that about 125 years before the Brahmins left the village, and that since then the lands and the acqueducts had been overgrown with the jungle. He prayed that Kowl might be given to enable him to bring the land again under Bágáyat cultivation. His request was granted.

( 740 ) A dam was being constructed at Kasbá Náráyangaum.

A. D. 1784-85.

( 741 ) The old dam of the river at Dahiwle in Parganá Dahiwle in Sarkár Bágláṇ was damaged. Its repair was estimated to cost Rs. 3,162. The Kamávisdár proposed to obtain by loan Rs. 2,500 for the purpose from a banker and to exact service

A. D. 1784-85.

दार, परगणे मजकूर, यांणीं सरकारांत विनंति केली; त्याजवरून बंधाऱ्याचे बंदिस्तीस ज्या सावकारापासून कर्ज घ्याल त्यास पांच बिघे जमीन, व रयतेपासून आंगमेहनतीनें काम घ्यावें, सबब मोकदम यांस पांच बिघे जमीन, एकूण दहा बिघे जमीन बंधाऱ्यामुळें तयार होईल. त्यापैकीं इनाम करार करून दिल्ही जाईल ह्मणोन, मशारनिल्हेस सन सलास समानीनांत सनद सादर जाहली, त्याजवरून त्यांणीं यांजपासून अडीच हजार रुपये कर्ज घ्यावयाचें करार करून, धरणाचें काम यांस सांगितलें, त्यास अडीच हजार रुपयांचें काम असतां दोन हजार बहात्तर रुपयांत किफायतीनें करून, बाकीचें काम रयतेकडून करून, धरण तयार केलें, त्यास धरणामुळें जमीन बागाइती तयार जाहली आहे, त्यापैकीं पांच बिघे जमीन स्वामींनीं कृपाळु होऊन कराराप्रमाणें इनाम देऊन भोगवटियास पत्रें करून दिल्हीं पाहिजेत ह्मणोन; त्याजवरून मनास आणतां धरणाचे बंधाऱ्याचे कामाबद्दल अडीच हजार रुपये पांडुरंग बल्लाळ यांजपासून कर्ज घ्यावयाचें करार करून, काम यांसच गणेश दादाजी कमाविसदार, परगणे मजकूर, यांणीं सांगितलें, त्यास यांणीं किफायतीनें दोन हजार बहात्तर रुपयांत काम केलें, हें जाणून, यांजवर कृपाळु होऊन, धरणाचे बंधाऱ्याचे बंदिस्तीमुळें बागाइती जमीन तयार जाहली आहे, त्यापैकीं यांस इनाम जमीन बिघे ५ साल गुदस्त सन अर्बा समानीनापासून. स्वराज्य व मोगलाई, एकूण दुतर्फा, देखील सरदेशमुखी दरोबस्त, कुलबाब कुलकानू, हल्लीं पट्टी, पेस्तर पट्टी, जळ, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधि, निक्षेप सहित, खेरीज हक्कदार करून, इनाम तिजाई सुद्धां, नूतन इनाम सरकारांतून करार करून दिल्ही असे, तरी सदरहू पांच बिघे जमीन कसबे मजकूरपैकीं बागाइती थळांतील चतु:सीमापूर्वक यांचे दुमाला करून देऊन, यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें, इनाम चालविणें ह्मणोन, भोगवटियास सनदा व पत्रें.

३ सनदा.

१ नांवाची.

१ मोकदम कसबे मजकूर यांस.

१ गणेश दादाजी कमाविसदार, परगणे दहिवलें यांस कीं, सदरहू पांच बिघे जमिनीचा आकार होईल, तो सालगुदस्त सन अर्बा समानीनापासून मशारनिल्हेचे नांवें इनाम खर्च लिहीत जाणें ह्मणोन.

---

३

from the rayats for the rest of the amount, and asked for the grant of some Inams to the banker for the loan and to the Mokadam of the village for forced service. His request was granted.

२ चिटणिसी. पत्रें.

१ देशमुख व देशपांडे, परगणे मजकूर यांस.

१ देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी, परगणे मजकूर यांस.

२

५

पांच सनदा व पत्रें दिल्हीं असत. रसानगी याद.

७४२–( ९२२ ) वेदशास्त्रसंपन्न सदाशिव दीक्षित दात्ये यांणीं हुजूर विदित केलें कीं, आपल्यास कसबे खेड येथें ठाणें थळपैकीं जमीन इनाम सरकारांतून दिल्ही आहे, त्यास मौजे नवलकेयाकडून बोढा कसबे मजकूरचे शिवारांत आला आहे, त्यास आपण नवीन धरण बांधून इनाम शेतांत पाणी आणणार, याजकरितां कोणी अडथळा करील, त्यास ताकीद जाहली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी दीक्षित नवीन धरण बेवारसी या बोढ्यास बांधून आपले शेतांत पाणी आणितील, त्यास कोण्ही मुजाईम होईल त्यास ताकीद करणें ह्मणोन, विनायक पांडुरंग कमाविसदार कसबे मजकूर यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सीत समानीन मया व अलफ जमादिलाखर १३

सदरील अन्वयें मोकदम कसबे मजकूर या गांवास चिटणिसी. पत्र १.

२

## ३ मुलकी खातें.

### ( क ) शेतकीस उत्तेजन.

### ३ इतर उपाय.

७४३–( ५२४ ) तालुके रत्नागिरी येथील रयेतीस धान्य नाहीं, सालगुदस्तां कोठीचा गल्ला दिल्हा होता, यामुळें बचाव जाला, सालमजकुरीं देतां नये, रयतीच्या बचावास्तव सावकारी महागिरीकर बोलाऊन आणून सांगितलें कीं, गल्ला कोठून आणाल, तेथून घेऊन येणें. जकातीचा पैका

समान सबैन मया व अलफ सफर ५

( 742 ) Sadáshiv Keshao Dátye was permitted to construct a water-course from a rivulet for irrigating his field in Khed.

A. D. 1785-86.

III LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

( C ) Encouragement to cultivators.

( 3 ) Other Measures ( continued ).

( 743 ) There being scarcity of grain in the Taluká of Ratnágiri, it

पडों देणार नाहीं, याप्रमाणें बोलोन महागिऱ्या बाहेर घातल्या आहेत, जकातीचा आकार पांच सातशें रुपये अजमासें होतील, येविशीं आज्ञा जाली पाहिजे ह्मणोन, तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें, त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी गल्ल्याची आबादी करवणें. जकातीचा आकार पांच सातशें रुपये होईल, तो एकसाला सालमजकुरीं माफ करून मजुरा दिल्हा जाईल ह्मणोन, सदाशिव केशव यांचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

७४४–( ६५८ ) परगणे देहेर गोरठ व तालुके कोरकडा, प्रांत कल्याण भिवडी, येथील सन इसन्ने सबैनांत पाहणी होऊन, त्रिंबक विनायक यांणीं जमाबंदी ठरावली, त्या पाहणींतील कुळें, त्रिंबक, व रतनगड, तालुकियांत गेलीं आहेत, याजमुळें हे दोन्ही महाल खराब पडोन सरकार नुकसान जालें, हें वर्तमान सालमजकुरीं गोविंद राम मामलेदार, प्रांत मजकूर, यांणीं सरकारांत निवेदन केलें, त्याजवरून तुह्मांस पत्रें सादर जालीं कीं, सदरहू कुळें महालचे महालीं पाठवणें, नाहीं तर त्या कुळांचा धारा कल्याणचे मामलेदार बांधून देतील, त्याप्रमाणें तुह्मीं आपले तालुकियाकडे जमा धरणें, असें असतां त्याप्रमाणें न केलें; आणि तुह्मीं आपलेकडील कमाविसदारांस पत्रें कुळें रजाबंद करून नेतील तीं नेऊं देणें, याप्रमाणें पत्रें दिल्हीं, त्यास कुळाचे रजाबंदीचा प्रकार तरी, जें कूळ प्रांत मजकुरीं पन्नास रुपयांची जितकी जमीन करीत होतें तें कूळ तिकडे जाऊन तितकी जमीन पंचवीस रुपयांत करितें. उक्तें कूळ तिकडे नवें जातें तें तिकडील कमाविसदारास नफ्यांत मिळतें, हें जाणोन सहल कौल देतात, तेव्हां कूळ राजी होऊन कसें येईल ? दोन्ही तालुके सरकारचे; याजकरितां येविशीं आज्ञा जाली पाहिजे; ह्मणोन प्रांत मजकूरचे मामलेदाराकडील कारकुनांनीं हुजूर

समानीन मया व अलफ जिल्हेज ७

A. D. 1777-78.

was supplied in the preceding year from the Government stores. The scarcity continued in the current year, but the Government stores were unable to supply the demand. Traders were therefore encouraged by the officers of Ratnágiri to import grain by sea from other places, on promise of remitting the octroi duty payable on the import, amounting to about Rs. 500 or 600. The promise was ratified by Government.

A. D. 1779-80.

( 744 ) The lands of the Pargaṇa Deher Gorath and Tarf Korkadá in Piánt Kalyáṇ Bhivandi were inspected and their Jamábandi was fixed in A. D. 1771-72 by Trimbak Vináyak. Some of the tenants assessed at the Jamabandi left the province and went into the Talukás of Trimbak and Ratangad. Their lands remained uncultivated and the public revenue suffered. Govind-Rám, Mámlatdár of Kalyáṇ brought this fact to the notice of the Govern-

विनंति केली, त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी प्रांत मजकूरचे दोनही महालांतील कूळ तुह्यांकडील हरदू तालुकियांत गेलीं आहेत, तीं महालचे महालीं आणितील, त्यांस ताकीद करून लाऊन देणें. कुळें येत नसलीं तरी, इसन्नेत पाहणी जाली आहे, त्याप्रमाणें कल्याणचे मामलेदार त्या कुळाची जमा बांधून देतील, त्या बमोजीब कुळारगवार जमा धरून, वसूल घेणें. [ये]विशींचा बोभाट फिरोन येऊं न देणें ह्मणोन, धोंडो महादेव यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

---

## ३ मुलकी खातें.

### ( ड ) बिगर हुकूम लागवड केल्याबद्दल शिक्षा.

७४५-( २३४ ) मौजे शेळकेवाडी, तर्फ सातारा, येथें हुजुरातेकडील कुरण आहे, त्या कुरणापैकीं जमीन विसाजी दादाजी यांणीं वहित केली आहे, त्याचा वसूल सरकारचे कोठीस दरमाहाकडे येतो; त्याखेरीज मौजे मजकूरचा कुळकर्णी कुरणांतील जमीन दरम्यान वाहतो, त्या जमिनीचा वसूल सरकारांत देत नाहीं, मध्येंच दाबून खातो, त्याचा वसूल जमीन वहित केल्यापासून आजपावेतों सरकारचे कोठीस दरमहाकडे देविला असे. तरी सदाशिव गोविंद यांचे विद्यमानें कुळकर्णी मजकूर यास तुह्मीं ताकीद करून ऐवज होईल तो वसूल देवणें; व पुढें

सीत सबैन मया व अलफ साबान ९

---

ment. Dhondo Mahádeo, the officer of Trimbak and Ratangad, was therefore directed to send the tenants back to Kalyán or to fix the rent to be levied from them at the amount specified by the Mámlatdár of Kalyán. Dhondo Mahádeo in his instructions to his Kamávisdár directed that the tenants, if willing, might be allowed to go to Kalyán. The Kalyán Mámlatdár again represented the matter to Government, and pointed out that as tenants obtained lands in Trimbak and Ratangad at less rent, it was not possible that they would willingly come back to Kalyán. He further added that both the tracts belonged to Government and prayed that orders might again be issued to the officers of Trimbak and Ratangad. His request was complied with.

## III LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

### ( D ) Punishment for unauthorized cultivation.

( 745 ) It was found that the Kulkarni of Shelkewádi in Tarf Sátára used unauthorizedly to cultivate land out of the *kuran* free of assessment. Assessment was now ordered to be recovered.

A. D. 1775-76.

सालमजकुरापासून आकार होईल, त्याप्रमाणें मशारनिल्हेचे गुजारतीनें कोठीस ऐवज देत जाणें ह्मणोन, कुळकर्णी यास ताकीद करणें ह्मणोन, कृष्णराव अनंत यांचे नांवें. पत्र १.

येविशीं मौजे मजकूरचे मोकदम व कुळकर्णी यांस. पत्रें २.

१ मोकदमास.

१ कुळकर्णी यास.

२

तीन पत्रें. रसानगी यादी.

## ३ मुलकी खातें.

### ( ई ) पिकाची नुकसानी भरून देणें.

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

७४६–( ३६ ) कजबे सुपें, परगणे मजकूर, येथें सालमजकुरीं खासास्वारीचा मुकाम जाहला, ते समईं कजबे मजकूर येथील शेताची पायमली जाहली, त्याची चवकशी आनंदराव त्रिंबक सुभेदार, परगणे मजकूर, यांनीं करून हुजूर समजाविली, त्यापैकीं एक हिसा ऐवज हुजुरून पावला, बाकी रयत भाग दोन हिसे रुपये ८२४।।।‸ पैकीं सूट रुपये २४।।।‸ बाकी रुपये ८०० आठशें रुपये तुह्मांकडून कजबे मजकूर येथील सालमजकूरचे खंडणींत रयतेस मजुरा देविले असेत, तरी सदरहू आठशें रुपये आनंदराव त्रिंबक सुभेदार, परगणे मजकूर यांचे विद्यमानें ज्याचे त्यास पावते करणें ह्मणून, महिपतराव कवडे यांचे नांवें सनद छ. २२ सबैन.

सनद १.

रसानगी यादी.

---

## LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

### ( E ) Compensation for crops damaged.

A. D. 1773-74.

( 746 ) The Peshwá having encamped during the current year at Kasbá Supe, crops were damaged. Valuation of the damage was made by Ánandrao Trimbak Subhedár of the Pargana. One third of the amount was paid direct from the Huzur and the remaining ⅔rds which are described as the rayat's portion of the produce, were ordered to be refunded to the parties concerned.

## ३ मुलकी खातें.

### ( फ ) पीक.

७४७—( ५९७ ) पीलखान्याकडे हत्तीस मौजे कुंभारवलण, परगणे सुपें, येथील उसाचें थळ खरेदी करून ऊस हत्तीस चारिला, त्यास दर पांडास किंमत रुपये ८ आठ करार केली असे, तरी तुह्मीं थळाची मोजणी करून मोजणी होईल त्याची किंमत सदरीलप्रमाणें प्रांत पुणें पैकीं देणें ह्मणोन, रामचंद्र नारायण मामलेदार यांचे नांवें. सनद १.

तिसा सबैन मया व अलफ रबिलावल २९

परवानगी रूबरू.

थळाचा आजमास दोन अडीच पांड होईल असें आहे, त्यास मोजणीमुळें कमजवाद काय भरेल त्याप्रमाणें सदरहू वर दर लिहिला आहे, त्याप्रमाणें हिशेब करून पैका देणें ह्मणोन, सनदेंत लिहिलें असे. छ. ६ रबिलावल.

---

## ३ मुलकी खातें.

### ( ग ) गांवठाणाकरतां दिलेल्या जमिनी.

७४८—( ६६९ ) कसबे वोतूर, तर्फ मजकूर, प्रांत जुन्नर, येथें गांवांत वस्तीमुळें घरांची दाटी बहुत जाली आहे, आणखी कितेक लोक घरें बांधणार, त्यांस जागा पाहिजे, यास्तव गांवचे पूर्वेस मिरासदाराची जमीन आहे, त्यापैकीं साठ बिघे जमीन घरें बांधावयास देणें, त्याचे मुबदला गतकुळी जमीन मिरासदारास लाऊन देणें, जमीन घराखालीं जाईल, त्याचा धारा वरकड जमिनीवर साधून घेणें ह्मणोन, रामचंद्र शिवाजी यांस अलाहिदा सनद सादर जाली आहे, तरी साठ बिघे जमीन मिरासदाराची गांवचे पूर्वेकडील घरें बांधावयास नेमून देऊन, त्याचे

समानीन मया व अलफ मोहरम ३०

---

LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

( F ) Yield of crops.

( 747 ) Sugar-cane crop in a field was purchased for feeding elephants. The price settled was Rs. 8 per Pánd.

A. D. 1778-79.

LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

( G ) Grant of new sites for building purposes.

( 748 ) The population of Kasbá Otur in Pargaṇa Junner being over-crowded, and building site being much in demand, 60 bighas of Mirás land to the east of the village was ordered to be added to the existing site. The mirásdar whose land was

A. D. 1779-80.

मुबदला गतकुळी जमीन मिरासदारास लाऊन देणें ह्मणोन, मोकदम कसबे मजकूर याचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सदरील अन्वयें देशमुख व देशपांडे, प्रांत जुन्नर यांचे नांवें. पत्र १.

२

७४९–( ८०६ ) मौजे गोऱ्हें बुदरुख, तर्फ कर्यात मावळ, येथें गावांत राहावयास गांवकरीयांस अडचण होते, याजकरितां मौजे मजकुरीं सरकारची शेरी आहे, त्यापैकीं तीन विघे जमीन वसाहतीबद्दल सरकारदस्त गांवकरी यांजपासून घेऊन दिल्ही पाहिजे ह्मणोन, खंडोजी व रंगोजी पाटील खिरीड मौजे मजकूर यांणीं हुजूर अर्ज केला; त्याजवरून मौजे मजकुरीं सरकारची शेरी आहे, त्यापैकीं गांवकरी यांस वसाहतीबद्दल जमीन विघे ८३ तीन विघे जमीन दर बिघा रुपये दीड प्रमाणें रुपये ४॥ साडे चार रुपये सरकारदस्ताचे गांवकरी यांजपासून घ्यावयाचे करार करून देविली असे, तरी सदरील तीन विघे जमीन चौकशी करून वसाहतीबद्दल नेमून देणें; आणि साडे चार रुपये दरसाल गांवकरी यांजपासून घेत जाणें ह्मणोन, नारो महादेव यांचे नांवें. सनद १.

अर्बा समानीन मया व अलफ रजब २६

रसानगी यादी.

## ३ मुलकी खातें.

### ( ह ) जंगल.

७५०–( ५८ ) मौजे तळवडें, निसबत राजश्री मोरो बाबूराव येथील कुळब्यांचीं घरें जळालीं, सबब वासे रायवळ सुमार ७५० सातशें पन्नास देविले असेत, तरी मौजे चास, तर्फ चाकण, येथील कुरणापैकीं नेमून देणें ह्मणोन, केसो कृष्ण यांचे नांवें छ. ७ रविलावल. सनद १.

अर्बा सबैन मया व अलफ रविलावल २२

रसानगी यादी.

---

taken, was given in exchange a piece of land equal in extent to the land taken up out of the Gatkuli land in the village. The assessment on the land transferred to the village site was ordered to be assessed on the remaining lands of the village.

( 749 ) The village site of Gorhe Budruk in Tarf Karjat Máwal being insufficient for the wants of the people, 3 Bighás of land from the Government *sheri* was given for building purposes and the assesssment thereon viz. Rs. 4–8 was ordered to be recovered from the villagers.

A. D. 1783-84.

## III LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

### ( H ) Forest and trees.

( 750 ) The houses of the Kunbis of Mouze Talawade having been

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

७५१–( ६९ ) बाळाजी कृष्ण यांचे नांवें सनद कीं, कुरणाचें कामकाज सालमजकुरीं तुम्हांकडे सांगोन करार कलमें येणेंप्रमाणें.

खमस सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

सरकारांत खासगीकडे द्यावें.

| १ गवत पुले. | सुमार. |
| --- | --- |
| १५००००० | पुणियांत आणून द्यावे. |
| १५००००० | पांच सहा कोशीं कुरणांत पंधरा लक्ष गवताच्या गंजी घालोन ठेवाव्या. पागा उष्ट्रखाना, वगैरे यांच्या चिठ्या खासगीकडून होतील त्यांस द्यावे. |
| ३०००००० | |

पुण्यासभोंवतीं पंधरा वीस कोशीं कुरणें सरकारचीं व लोकांचीं आहेत; तीं जप्तींत ठेऊन तेथें तुम्हीं आपले कुण्यें बसवणें. कलम १.

सरकारचे कुरणांत व लोकांचे कुरणांत गवत व लांकडें जळाऊ व इमारतीचीं लाकडें व वेळू व सायाचीं पानें वगैरे जें निघेल त्यांत लोकांचे कुरणांपैकीं गवत व सर्पण ज्याचें कुरण त्याचे संसाराचे खर्चापुरतें सरकारांतून नेमणूक करून द्यावी, त्याप्रमाणें त्यांस द्यावें. बाकी सरकारांत द्यावयाचें तें व सरकारचे कुरणाचें मिळोन

---

A. D. 1773-74. burnt by fire, orders were issued to give them 750 beams from the kuraṇ of Mauze Chás in Tarf Chákaṇ.

( 751 ) Báláji Krishṇa was appointed to the Mámlat of the Kuraṇs, A. D. 1774-75. and the following instructions were issued to him.

1 He should deliver to Government in Poona 15 lakhs of bundles of grass, and should keep a similar quantity ready for Government use in Kuraṇs within a radius of 5 or 6 Kos from the City.

1 He should take in his charge all the Kuraṇs existing within a radius of 15 to 20 Kos from Poona whether belonging to Government or private individuals, and keep his own men to manage them.

1 He should deliver to Government in Poona 1600 *Khandies* of fuel and 150 *Khandies* of coal.

1 Out of the timber, fuel, grass, bámboos, leaves, and other produce realized in a private Kuraṇ, a quantity sufficient to meet his annual wants should be given to the owner. The rest should belong to Government and should be sold excepting

तीस लक्ष सदरहूप्रमाणें द्यावे.

१ लाकडें जळाऊ व कोळसे चाळीस शेरी मणानें वजन पक्के पुणियांत द्यावें.

खंडी.

१६०० लाकडें.

१५०० ऐन.

१०० माप वर्तोळा.

१६००

१५० कोळसे दीडशें खंडी.

१७५०

साडे सतराशें खंडी. सदरहूप्रमाणें द्यावें.

२ कलम १.

कारकून व कुरण्ये निसबतीस ठेवावे, त्यांची नेमणूक सालीना.

रुपये.

२००० कारकून असामी आठ एकूण.

१२०० प्रत असामी ४ एकूण, दर ३०० प्रमाणें.

८०० प्रत असामी ४

सरकारांत खर्चास लागेल तें द्यावें. बाकी फरोक्त करून पैका होईल तो हुजूर आणून समजवावा. येणेंप्रमाणें. कलम १.

लोकांचे कुरणांची जप्ती होईल, त्यापैकीं कदाचित् रजबदलीमुळें कुरण कोणास दिलें, तरी त्याचे संसारउपयोगापुरतें गवत व सर्पण द्यावयाचें तें वजा जाऊन बाकी गवत व सर्पण त्याजकडे जाजती जाईल, त्यांची किंमत फरोक्ताचे निरखाप्रमाणें करून होईल ते मजुरा पडेल. येणेंप्रमाणें. कलम १.

बेपारी यांचे बैल किरकोळ कुरणांतून लाकडें तोडून भरून आणतील, त्यास दर बैली पाव रुपया, व पाहून जाजती साधेल तें, व गौळी वगैरे कुरणांत चारणी करतील, त्यांजपासून बनचराईचा पैका घेऊन सदरहू ऐवजाचा हिशेब सरकारांत समजवावा. येणेंप्रमाणें. कलम १.

गवत व सर्पण व पान साख्या व वेळू वगैरेयाची चिठी सरकारांतून खासगीकडे होईल. खासगी चिठी तुम्हांवर होईल, त्याप्रमाणें तुम्हीं द्यावें. हिशेब देणें

such portion as may be required for Government purposes, and the proceeds credited to Government.

1 In case any of the private Kurans were through favour released from attachment, full allowance would be made to the Mamlatdár for the value of the forest produce (minus the portion required for his daily use) thus lost to him.

1 An establishment consisting of 8 Kárkuns, 175 foresters at a cost of Rupees 12,450 was sanctioned for the purpose.

1 A duty should be levied from all the traders carrying wood on bullocks, at the rate of 4 annas for every Rupee.

1 Forced labour would be supplied as usual.

1 Accounts should be rendered to Government.

एकूण, दर २००
प्रमाणें.

२०००

१०४५० कुरण्ये आकरमाही शिरस्ता.

५५०० प्रत असामी १०० दरमहा दर असामी[स] रुपये ५ प्रमाणें रुपये ५०० एकूण.

४९५० प्रत असामी ७५ दरमहा दर असामी[स] रुपये ६ प्रमाणें, रुपये ४५०

१०४५० १७५

१२४५०

एकूण बारा हजार चारशें पन्नास रुपये सालीना नेमणूक करून दिली असे, खर्च करणें, जाजती करूं नये. कलम १.

गाड्यांचे वोंगणास तेल सरकारांतून सालाबाद पावतें, त्या शिरस्तेप्रमाणें पावेल, व बेगारी गवत कापण्यास वगैरे सालाबाद खासगीकडे जिकडून पावत होते, त्याप्रमाणें तुम्हांकडे देविले जातील. कलम १.

कावडे व डोईभारे लोकांस ज्या कुरणांत पावतात, त्याच्या चिठ्या सालाबादप्रमाणें खासगीकडून होतील, व गवत कुरणांतून कापून आणावयाचें, व कापलेलें तो सरकारांत द्यावा. पर्जन्यामुळें जें कुरणांत गवत निघालें नाहीं, तरी ज्या सालीं पर्जन्य पडोन गवत निघेल, त्या सालाप्रमाणें गवताचा आकार पुले सुमारीचा होईल तो मजुरा पडेल. सारांश जें निघेल तें सरकारचें. कलम १.

द्यावयाचें, त्याच्या चिठ्या हुजुरून समजानें होतील, त्याप्रमाणें द्यावें. कलम १.

कलमें लिहून दिलीं आहेत, त्याचा पुस्तपन्हा सरकारांतून केला जाईल. येणें-प्रमाणें. कलम १.

एकूण दहा कलमें करार करून दिलीं असत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें. साल-मजकुरीं कमाविशीनें मामलत सांगितली असे, तरी कच्चा कारभार सरकारांत इमानें इत-बारें आणून सालमजकुरीं समजवावा, तोटा नफा सरकारचा. पेस्तर सदरहू कलमें लिहिलीं आहेत, त्याप्रमाणें पुरवल्यास मक्तयानें मामलत करून दिली जाईल ह्मणोन. छ. ८ रबि-लाखर. सनद १.

रसानगी याद.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

७५२–( ३९४ ) वेदमूर्ति रामचंद्र पाध्ये सावेरकर यांचें घर मौजे कशेळी, तर्फ राजापूर येथें आहे, त्यास यांचे आगरांत दोन फणसाचीं झाडें उपळलेलीं आहेत, तीं हे आपलें घर बांधणार याजकरितां यांचीं यांस घरास बांधावयास देविलीं असे[त], तरी देणें ह्मणोन, तर्फ विजयदुर्ग निसबत गंगाधर गोविंद यांचे नांवें. छ. १४ जिल्काद. सनद १.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

रसानगी यादी.

७५३–( ४२४ ) साल मजकुरीं वारेझोडीनें बागायती दस्ती झाडें कांहीं मोडलीं आहेत, त्यांची चौकशी करून मोडल्या झाडांचा दस्त कमी करावयाची आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन; त्यास ज्या गांवीं मक्त्यापैकीं दस्ती झाडें मोडलीं असतील त्या गांवीं मक्त्या आलीकडे नवीं झाडें जाहलीं असतील त्यांची चौकशी करून दस्त जमा धरणें, आणि झाडें मोडलीं असतील त्यांचा दस्त कार्याकारण कमी चौकशी मुळें होईल तो कमी करणें ह्मणोन. कलम् १.

सबा सबैन मया व अलफ सफर २

---

FROM JANÂRDAN ÂPÂJI'S DIARY.

( **752** ) Permission was given to Râmchandra Pádhye Sáwerkar of Kasháḷi in Tarf Rájápur to cut down two dead jack-trees in his Âgar ( field ) for building purposes.

A. D. 1776-77.

( **753** ) Some tax–bearing trees having been destroyed by a hurricane, permission was given to remit the revenue realized from them, and to assess the tax on trees which inquiry might show to have been newly planted.

A. D. 1776-77.

७५४–( ५३६ ) शिवराम रघुनाथ यांचे नांवें सनद कीं, सरकारचे कुमाचें कामकाज पेशजीं बाळाजी कृष्ण ठोसर यांजकडे सन समस सबैनांत होतें, ते समईं त्यांणीं सरकारचीं रानें, बहुली वगैरे लकडवाल्यांस लाकडें जळाऊ आणावयासी देऊन, त्यांजपासून सरकारांत रानव्याचे पेशजीं दर बैलीं चवलप्रमाणें घेत गेले, त्याप्रमाणें सरकारांत घेत आहेत, त्यास सरकारचे रानांत लाकडें नाहींत, सबब राजश्री पंत सचिव वगैरे लोकांचे रानांतून रानवा देऊन लाकडें आणतील, त्यास दर बैलीं चवलप्रमाणें घ्यावयाचा मना केला असे, तरी त्यांजपासून न घेणें. सरकारचे रानांतून लाकडें लकडवाले वगैरे आणितील त्यांजवळून दर बैलीं चवलप्रमाणें शिरस्ते बरहुकूम घेत जाणें म्हणोन. छ. २४ जिल्काद.

समान सबैन मया व अलफ सफर २६

सनद १.

रसानगी यादी, पुरंधर.

---

## ३ मुलकी खातें.

### ( आय् ) मामलेदार, कमाविसदार, जमीनमहसुलाचे मक्तेदार व खोत.

७५५–( ३१ ) विश्वासराव रामचंद्र यांचे नांवें सनद कीं, परगणे बोदवाड, प्रांत खानदेश, येथील मामलत सालगुदस्तांप्रमाणें सालमजकुरीं तुम्हांकडे करार केली असे. परगणे मजकूर येथील देहे ५४ एकूण तनखा.

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

एकूण.

---

( 754 ) The fee for bringing wood from Government forest was 2 annas per bullock.

A. D. 1777-78.

## III LAND REVENUE AND ITS ADMINISTRATION.

### ( I ) Mámlatdárs, Kamávisdárs, Farmers of land revenue, and Khots.

( 755 ) The Mámlat of Parganá Bodwád in Pránt Khándesh was farmed to Vishwásrao Rámchandra for 4 years for Rupees 44,001 every year. The instructions issued to him were as follows:—

A. D. 1773-74.

1 The establishment should consist of

Rs. 500 Kamávisdár.
250 Mujumdár.
200 Fadnis.

एकूण तेवीस कलमें करार केलीं असेत. सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, छ. ४ साबान. सनद १.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

७७८–( ४५८ ) विजय रघुनाथ सेतुपति राजे संस्थान श्रीरामेश्वर यांणीं घोडीं रास ६ सहा लष्करास जाण्यास कारवानांपासून पुण्यांत खरेदी केलीं आहेत, त्यांची किंमत रुपये २५५० दोन हजार पांचशें पन्नास रुपयांस घेतलीं आहेत, त्यांचे जकातीचा आकार यांस माफ केला असे, तरी सदरहूचे जकातीचा आकार मशारनिल्हेचे नांवें माफ खर्च लिहिणें. सदरहू जकातीचे ऐवजीं यांजपासून पैका घेतला असेल तो माघारा देऊन, तगादा न करणें म्हणोन, भिकाजी विश्वनाथ कमाविसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर यांचे नांवें छ. २३ रबिलाखर. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रबिलाखर २६

रसानगी यादी.

७७९–( ७५२ ) जकात बंदर पेण, पंच महाल, परगणे सांकसे, प्रांत कल्याण भिवंडी येथील फडणिसी बाजीराम यास पेशजीं सांगोन सनद सादर जाली आहे, त्यास तुम्ही फडणिसीची कैद कानू चालों देत नाहीं, म्हणोन हुजूर विदित जाहलें; त्याजवरून फडणिसीच्या कैद कानूच्या बंदोबस्ताचीं कलमें.

इसने समानीन मया व अलफ जमादिलावल १९

---

( 778 ) Vijay Raghunáth Sedupati Raja of Sansthán Shri Rámeshwar purchased 6 horses for Rs. 2,550 from a caravan at Poona. The amount of octri leviable on the purchase was ordered to be remitted.

A. D. 1776-77.

( 779 ) The duties of the office of Fadnis of octroi at fort Pen were fixed as under:—

A. D. 1781-82.

( 1 ) The settlement of the fixed sum to be levied from any trader on account of octroi, should not be made without the consent of the Fadnis.

( 2 ) The accounts of octroi on exported goods should remain with the Fadnis.

( 3 ) All correspondence regarding octroi should be conducted and all orders regarding credit and debit should he issued by the Fadnis.

( 4 ) The octroi farms being abolished and the revenue being departmentally managed, writing work should be done by the Fadnis.

( 5 ) The Fadnis should be prompt in his work and should issue notes or passes without delay.

जमा व खर्च कीर्दीस लिहिल्याशिवाय जमाखर्चाची वहिवाट करूं नये. कलम.

उभे मार्गाचा टिपेचा खरडा अमदानीचा व रवानगीचा फडणिसाकडे असावा. व चिठ्या यांच्या दाखल्यानें व्हाव्या. कलम १.

मीठ पावगी यांचे हिशेब कुलकर्णी यांणीं फडणिसाचे विद्यमानें करून कमाविसदारास समजवावे. कलम १.

मागील वहिवाट इस्तकबिल कार्तिकमासापासून जाली आहे, त्याची दखलगिरी यांस करून द्यावी. कलम १.

फडणिसांनीं कामकाजाविशीं व लिहिण्याविशीं बोभाट पाडूं नये, व चिठ्ठीचपाटीविशीं माणसाची खोटी करूं नये; वरचेवर लिहून देत जाणें. कलम १.

उदमी यांच्या खंडण्या करणें, त्या फडणिसीचे दाखल्यानें कराव्या, यांचे दाखल्याशिवाय करूं नये. कलम १.

जळमार्गाची लावणी, अमदानी, व रवानगीची चिठ्ठी यांचे दाखल्यानें करीत जाणें. कलम १.

जकातीसंमंधें कागदपत्र, व जमाखर्चाची चिठ्ठी फडणिसांनीं लिहावी. रवानगीची चिठ्ठी निमक कुळकर्णी यांणीं लिहावी. तारीख फडणिसांनीं घालावी. कलम १.

इजारेयानें जकाती होत्या, सबब फडणिसाचे हातून लिहिण्याचें काम चालत नव्हतें, हल्लीं कमाविसीनें जकाती आहेत, याजकरितां लिहिण्याचें काम दरोबस्त फडणिसाचे हातून घेणें; व दरकदाराचे विद्यमानें कारभार करीत जाणें. कलम १.

एकूण सदरहू नऊ कलमें लिहिल्याअन्वयें फडणिसाचे हातें कुल लिहिण्याचें कामकाज घेत जाणें. येविशींचा फिरोन बोभाट येऊं न देणें ह्मणोन, कृष्णाजी चिमणाजी, व उद्धो दादाजी कमाविसदार, जकात प्रांत कल्याण भिंवडी, यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

७८०—( ९०३ अ ) उद्धो दादाजी, व आपाजी विश्वनाथ कमाविसदार जकात प्रांत कल्याण भिंवडी यांस सनद कीं, कृष्णाजी विठ्ठल यांस जकात प्रांत मजकूर येथील जमेनिशी सरकारांतून सन इसन्ने समानीनांत सांगितली, त्यास दरकसंमंधें लिहिण्याविशीं जमीदाराची व यांची कटकट पडली होती, त्याची चवकशी करितां जमेनिसानें लिहिण्याचीं कलमें ल्याहावीं. बीतपशील.

सीत समानीन मया व अलफ जिल्हेज २९

( 780 ) Krishnáji Vithál was in A. D. 1781–82. appointed Jaménís of octroi in Pránt Kalyán. A difference however arose between him and the Jamindárs regarding the former's duties. The following order was therefore issued to Udhao Dáji and Appáji Vishwanáth, Kamávisdárs of octroi in the Pránt, and they were ordered to get the work done accordingly.

A. D. 1785-86.

( 1 ) The Jaménis shall ascertain the amount of octroi to be levied, under the orders of the Mámlatdár and in the presence of the

टीप घेणें, ते जमीदारास बरोबर घेऊन मामलेदाराचे विद्यमानें जमेनिसानें घेऊन ठिकाणवार टीपखर्डा ल्याहावा. दुसरा दाखल्याचा खर्डा जमीदारांनीं घालावा. कलम १.

जकातीचे पोटचिठ्ठी कोणमक्त्यानें कोणी करील त्याचे ठरावाची यादी जमेनिसांनीं ल्याहावी, एकुणात मजमदारांनीं करावी, मामलेदारांनीं करार करावा, फडणिसानें सनद ल्याहावी. कलम १.

बंदरींहून वाणी बैल भरून जातात, त्यांजला रसानगी चिठ्ठी सरकारची लागत्ये, त्यास ज्या ठिकाणीं जसी मुदामत चाल ल्याहावयाची असेल, त्याप्रमाणें तेथें जमीदारांनीं ल्याहावी, त्यास फडणिसानें तेरीख घालून वर मजमदारानें निशाण करावें, मामलेदारानें मोर्तब करून ठाण्यास चिठ्ठी द्यावी. ज्या ठिकाणीं दरकदार चिठ्ठी लिहीत असतील, त्या ठिकाणीं दरकदारांनीं लिहून जमीदारांचे गुजारतीनें ठाण्यास द्यावी. कलम १.

कुळाची खंडणी होणें ते शिरस्तेप्रमाणें अथवा कौलप्रमाणें आह्मीं लिहीत असतों वगैरे, कुळाचे हिशेब करितों, समई नसल्यास मामलेदारही करितात, ह्मणोन जमीदारांनीं लिहून दिल्हें आहे. ऐशास जमीदाराचे टीपखर्डे अलाहिदा पडोन, रुमालही वेगळे लिहितात, त्यापक्षीं जमीदाराचे गुजारतीनें दर दाम ठरवावा. खंडणी होणें ते सरकारची महाल दर महालीं अथवा अहद बंदर तहद घाट पार हुंड्याची लिहिणें ते जमेनिसांनींच ल्याहावी. त्या खंडणीवर मजमदारांची एकुणात व मामलेदाराचा करार, फडणिसीकडे बार होऊन मामलेदारांनीं दप्तरीं ठेवावी, त्याची नकल ठाण्यास देणें, ती जमेनिसांनीं लेहून द्यावी, एक नकल दाखल्यास जमीदारांनीं आपल्याजवळ लिहून घ्यावी. कलम १.

कुळास कौल देणें तो जमेनिसांनीं ल्याहावा, त्यावर फडणिसाची तेरीख, व मजमदाराचें निशाण, व मामलेदाराचें मोर्तब करून, कौल द्यावा. कलम १.

---

Jamidár, and shall prepare rough memorandum thereof on the spot, another memorandum being prepared by the Jamidár.

(2) The Jaménis shall write the draft agreement setting forth the conditions on which a subcontract of the octroi farm is given. The Mujumdár shall enter the totals and when the agreement is approved by the Mámlatdár, the Fadnis shall write the *sanad*.

(3) Passports to traders carrying bullock-loads from forts shall be written either by the Jámidárs or by the Darakdárs as may be customary at the particular post. In the former case the Fadnis shall date the passports, the Majumdár shall make his mark thereon, and the Mámlatdár shall seal them. In the latter case the passports shall be sent through the Jamidárs.

(4) At the end of the year the Jamènis shall compare his rough

असेरसालीं एकंदर जमेची वहिवाट आकारणें त्यास जमीदारापासून ठिकाणवार हिशेब घेऊन, त्याची चांगली रुजुवात करून, एकंदर हिशेब जमीदारांनीं सरकारांत मामलेदाराजवळ द्यावा. कलम १.

एकूण सहा कलमें करार करून देऊन, हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी सदरील कराराप्रमाणें ज्याचें काम त्याजपासून घेत जाणें म्हणोन, मशारनिल्हेचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

७८१–( ९६३ ) प्रांत पुणें येथील कुणब्यांनीं कीर्दीचे बैल इसवी सन खमस समानीन तागाईत छ. २५ सवाल, सन समान समानीन पावेतों गांवगन्ना खरेदी केले. त्याची किंमत. रुपये.

समान समानीन मया व अलफ सफर ४

३१८॥ सन खमस समानीन बैल सर २३ रुपये.
३३९॥ सन सीत समानीन बैल सर २८ रुपये.
४२१ सन सबा समानीन बैल सर ३९. रुपये.

---

memoranda of receipts with those kept by the Jamidárs and submit a detailed account to the Mámlatdár.

(5) The Jamidárs represent that the amount to be levied from traders is fixed by them according to custom or according to Kowls granted to them, and that in their absence, the work is performed by the Mámlatdárs. As the Jamidárs keep separate accounts of the tax, the rates should be fixed with their cognizance. The memorandum fixing the amount leviable, either for a particular Mahál, or for the whole tract, from the post to the province, above the ghaut should be written by the Jamenis and marked by the Mujumdár, and it should bear the approving endorsment of the Mámlatdár. It should then be given to the Fadṇis for being registered and finally recorded by the Mámlatdár. The copy to be sent to the *Thana* should be made by the Jamenis. The Jamidár should take a copy for reference.

(6) Kowls to traders shall be written by the Jamenis; the Fadṇis shall date them and they shall bear the Jamidár's mark and Mámlatdár's seal.

(781) Bullocks purchased by cultivators in Peánt Poona for purposes of agriculture were exempted from octroi.

A. D. 1787-88.

१५१ छ. २५ सबाल समान समानीन बैल सर ११ एकूण. रुपये.

·१२३० — १०१

एकूण बाराशें तीस रुपयांस एकशें एक बैल घेतले, त्यांचे जकातीचा आकार यांस माफ केला असे, तरी माफखर्च लिहून, जकातीचा तगादा न करणें ह्मणून, कमाविसदार निसबत भिकाजी विश्वनाथ, जकात प्रांत पुणें व जुन्नर, यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

## ४. इतर कर.

### ( ड ) जिनसांच्या खरेदीविक्रीवरील कर.

### ( १ ) लाकडें.

### नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

७८२–( १०१ ) येसाजी शिवदेव प्रांत वसई, यांचे नांवें सनद कीं, श्रीभार्गवराम वस्ती मौजे गोठणें देवाचें, प्रांत राजापूर, येथील देवालयाचे मंडपाबद्दल वगैरे इमारतीस राजश्री लक्ष्मण बल्लाळ हे प्रांत वसई येथें हरएक जागा लाकडें, तुळया वगैरे मिळोन सुमारें २०० दोनशेंपर्यंत खरेदी करतील, त्यास सदरहू लाकडांची तिजाई सरकारांत द्यावयाचा शिरस्ता आहे, ते यांस माफ केली असे, तरी लाकडांची तिजाई न घेणें; आणि सदरहू लाकडें वसईहून राजापूरचे बंदरीं पोहचाऊन देणें ह्मणोन, राजश्री त्रिंबक विनायक यांस सन सलास सबैनांत सनद दिली, त्यास मशारनिल्हेनीं लाकडें खरेदी केलीं नाहीं, हल्लीं लाकडें खरेदी करणार यास्तव हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरहू दोनशें लाकडें खरेदी करतील त्यांची

खमस सबैन मया व अलफ रमजान २९

---

IV Other taxes.

( D ) Taxes on sales and purchases of

( 1 ) Wood.

FROM NÂRÔ APÂJI'S DIARY.

( 782 ) It appears from this sanad that it was usual in Prânt Bassein to take for Government ⅓rd of the quantity of timber purchased by private individuals in that province. In the instance referred to in the sanad the wood being required for a temple was allowed to be carried free of any contribution to Government.

A. D. 1774-75.

तिजाई माफ केली असे, तरी तिजाई न घेणें; आणि लाकडें वसईहून राजापूरचे बंदरीं पोंचाऊन देणें ह्मणोन. सनद १.

रसानगी यादी, छ. १७ रजब.

---

## ४. इतर कर.

### ( ई ) घरपट्टी व ह्मैसपट्टी.

७८३–( ३११ ) कोकणप्रांतीं ब्राह्मणांचीं व परभूंचीं घरें आहेत, त्यास ब्राह्मणांपासून उमरपट्टी न घेतां, परभू लोकांचे घरांस उंबरपट्टी मागतां, ह्मणोन हुजूर विदित जालें. अशास प्रांत मजकुरीं परभू लोकांचीं घरें असतील त्यांजपासून उमरपट्टीचा ऐवज न घेणें, ऐवज घेतला असेल तो माघारा देणें ह्मणोन, कमाविसदारांस सनदा.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाखर २०

१ सरसुभा निसबत विसाजी केशव.
१ प्रांत वसई निसबत विसाजी केशव.
१ तालुके अवचितगड निसबत आबाजी बल्लाळ व भास्कर बल्लाळ.
१ तालुके राजमाची निसबत रामराव नारायण.
१ तालुके रायेगड निसबत गणपतराव कृष्ण.
१ प्रांत राजपुरी निसबत गोविंदराव, व चिमाजी माणकर.
१ तालुके रेवदंडा निसबत आनंदराव शिंदे.
१ तालुके नेरळ निसबत राघो नारायण, व धोंडो बल्लाळ.
१ प्रांत कल्याण निसबत सदाशिव मोरेश्वर, व कृष्णाजी रामचंद्र.

९

रसानगी यादी.

७८४–( ४०३ ) मोरो गणेश बेहरे यांचे घर सातारियांत आहे, त्यास तुह्मीं सरकारचे पट्टीचा तगादा यांचे घरीं मुलामाणसांस केला आहे, ह्मणोन हुजूर विदित जालें; ऐशास तिगस्तां मोरगिरीखालीं मल्लारनिल्हेवर दरवडा पडोन वित्तविषय सर्वस्व गेलें; त्याजवर गुदस्तांही वडुथांत यांचे बंधू

सबा सबैन मया व अलफ मोहरम २

---

IV Other taxes.

( E ) Tax on houses and she-buffaloes.

( 783 ) Orders were issued that houses of Parbhus in Konkan should like those of Brahmins be exempted from taxation.

A. D. 1776-77.

( 784 ) Government was informed that compulsory measures were

होते, तेथें दरवडा पडोन चीजवस्त सर्व गेली, बंधू वारले, याजमुळें बहुत सरावींत आले आहेत, याजकरतां यांजवर कृपाळु होऊन, सरकारची पट्टी माफ करून, हें पत्र तुम्हांस लिहिलें असे, तरी मशारनिल्हेचे घरीं मुलामाणसांस पट्टीचा तगादा न करणें म्हणोन, कृष्णराव अनंत, मुकाम सातारा, यांस चिटणिसी. पत्र १.

समान सबैन मया व अलफ शाबान १२

७८५–( ४९० ) कृष्णाजी विश्वनाथ, तालुके अंजणवेल, यांस सनद कीं, तालुके मजकूर येथील घरठाणीचा मक्ता पेशर्जी करून दिल्हा होता, तो भरोन दोन सालें जाजती जाहलीं, त्यास पाहणी करावयाविशीं रयेत गवगवा करित्ये, म्हणोन तुम्हीं लिहिलें; त्याजवरून सालमजकुरीं घरठाणींची पाहणी करावयाची आज्ञा तुम्हांस केली असे, तरी तुम्हीं पाहणी चौकशीन करणें म्हणोन. सनद १.

रसानगी यादी.

## मुतालिक ह्याचे कीर्दीपैकीं.

समान सबैन मया व अलफ जमादिलावल ४

७८६–( १४ ) सुलतानजी डुबल शिलेदार निसबत आपाजीराव पाटणकर यांणीं कसबे कराड येथें नवा वाडा बांधिला, याजकरितां तुम्हीं सरकारांत नजर मागतां, व नजरेकरितां मशारनिल्हेचे शेत बालपर्वेसीचें जप्त केलें, म्हणोन यांणीं हुजूर विनंति केली; त्यास मशारनिल्हे स्वारीबरोबर चाकरीस आहेत, सबब नवा वाडा बांधला त्याची नजर माफ करून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी नजरेचे ऐवजाकरितां यांचे शेताची जप्ती केली आहे ते मोकळी करून, सदरील नजरेचे ऐवजाचा तगादा न करणें म्हणोन, श्रीनिवास शामराव कमाविसदार, प्रांत कराड, यांचे नांवें. सनद.

रसानगी यादी.

---

A. D. 1776-77.

being adopted for the recovery of house-tax from Moro Ganesh Behare of Satara. As this man was robbed of all his property twice during the past 2 years, the tax was remitted.

A. D. 1777-78.

( 785 ) Two years having elapsed since the expiry of the term for which the amount of house-tax was fixed in Taluka Anjanwel, the rayats pressed the officers of the Taluka for a fresh inspection and assessment of their houses. He was accordingly permitted to inspect and assess the houses.

FROM THE MUTALIK'S DIARY.

A. D. 1777-78.

( 786 ) Sultánji Dubal Shiledár having built a new house at Karáḍ, the Kamávisdár of the place demanded Nazar from him and attached his field for the purpose. As he was serving in camp with the Huzur, the Nazar was ordered to be foregone.

## ४. इतर कर.

### ( फ ) अबकारी.

७८७–( २७० ) बाळाजी गणेश यांचे नांवें सनद कीं, तालुके देवगड येथील भंडारमाडाची वगैरे दारूची बंदी करावयाची आज्ञा केली असे, तरी पेस्तर अवल सालापासून बंदी करणें ह्मणोन. सनद १.

सीत सबैन मया व अलफ मोहरम १

परवानगी रूबरू.

७८८–( २७१ ) गंगाधर गोविंद यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें, लिहिला मजकूर सविस्तर विदित जाहला, तालुके विजेदुर्ग येथील भंडार माडाची सालगुदस्तांपासून बंदी केली होती, त्यामुळें वहिवाटीस जमा कमी आली, ते सालमजकूरचे बेहेड्यास जमा धरिली, यास्तव भंडारमाडाची बंदी मोकळी करावी, किंवा न करावी, ह्मणोन लिहिलें; त्यावरून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सालमजकुरीं अवल सालापासून बंदी असल्यास मोकळी न करणें, मोकळी असल्यास पेस्तर अवल सालापासून बंदी करणें ह्मणोन. सनद १.

सीत सबैन मया व अलफ मोहरम १

परवानगी रूबरू.

७८९–( ८९३ ) सैद अहमद गाडदी निसबत राघो विश्वनाथ यांजकडे फिरंगी गोरे व किरस्ताव जदीद चाकरीस ठेविले आहेत, त्यांस दारू फुलसरा नेहमीं पाहिजे, याजकरितां फिरंगी आपले खर्चापुरती भट्टी लाऊन दारू करितील, त्यांस करूं देणें, अडथळा न करणें. दारूचा हांसील होईल तो सरकारांत घेतला जाईल ह्मणून, घासीराम सावळदास कमाविसदार कोतवाली शहर पुणें यांस. सनद १.

सीत समानीन मया व अलफ रमजान २१

रसानगी याद.

---

## IV Other taxes.

### ( F ) Tax on manufacture of liquor.

( 787 ) The officer of Taluka Dewagad was directed to stop the manufacture of liquor from cocoanut trees from the beginning of the next year.

A. D. 1775-76.

( 788 ) Similar order was issued to the officer of Taluka Vijaydurga.

A. D. 1775-76.

( 789 ) Some Portuguese and some Christians were employed under Sayad Ahmed Khán Gárdi who was serving under Rágho Vishwanáth. They always required liquor for consumption; permission was therefore, given to allow them to distil liquor for their present use. The duty on the manufacture was to be

A. D. 1785-86.

## ४. इतर कर.

### ( ग ) मासे धरावयाचा मक्ता. ( मच्छीमारी. )

७९०—( ७७७ ) मोरो बापूजी यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं हुजूर विदित केलें जे प्रांत साष्टी व वसई येथील मच्छीमार कोळी पेशजीं अंगारकाचे वेळेस कौल घेऊन दर्यांत मासे मारीत; आणि कौलावणीचा पैका देत होते, त्यास सुवर्णदुर्ग तालुका सरकारांत आल्यापासून कौल कोळ्यांनीं घेतला नाहीं. हल्लीं सरकारचे आरमारचे धास्तीनें कोळी यांचें बोलणें आहे कीं, पेशजींप्रमाणें कौलावण घेऊन आपणांस कौल द्यावा ह्मणोन; त्याजवरून कोळी यांस अलाहिदा कौल सादर करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी साष्टी वसई प्रांतांतील कोळी मच्छीमार यांजपासून पेशजीं अंगारकाचे वेळेस पैका घेऊन कौल देत आल्याप्रमाणें सालमजकुरापासून तुह्मीं पैका कौलावणीचा घेऊन तालुके मजकूरचे हिशेबीं जमा धरीत जाणें; आणि दुसरे कौल प्रांतमजकूरचे बंदरोबंदरचे कोळ्यांस सुभाहून लागतील ते देणें. कोळी यांणीं दर्यांत खूट लावून माशाची वहिवाट करतात, त्याप्रमाणें करावी, त्यास सरकारचे आरमारचा उपद्रव लागणार नाहीं ह्मणोन. सनद १.

सलास समानीन मया व अलफ सफर ११

---

## ४. इतर कर.

### ( ह ) कर्जपट्टी.

७९१—( ४२६ ) तालुके चिकोडी व तर्फ मनोली येथें साहुकार व उदमी सुखवस्तु, मातबर गृहस्थ, व पांढरगण वगैरे लोक राहतात, त्यांजपासून जीवनमाफक एक साल कर्जपट्टीचा ऐवज सरकारांत घ्यावयाचा करार करून, चवकशी चिमणाजी महादेव दिंमत रामचंद्र गणेश यांजकडे सांगि-

सबा सबैन मया व अलफ सफर १०

---

levied by Rágho Vishwanáth for Government and Rágho was to be held responsible for the liquor so prepared passing into the hands of persons other than Portuguese.

IV Other taxes.

( G ) Farm of fishery.

( 790 ) The Kolis of Pránt Salsette and Bassein were allowed to exercise the right of fisheries in the sea, on payment of certain fees to Government.

A. D. 1782-83.

IV Other taxes.

( H ) Karjapatti.

( 791 ) The tax of Karjapatti was imposed for one year on the

तली असे, तरी मशारनिल्हे चवकशी करून ऐवजाचा ठराव करून देतील, त्याप्रमाणें तुह्मीं आपले कमाविसदारांस ताकीद करून ऐवजाचा वसूल मशारनिल्हेकडे देविणें ह्मणोन. सनदा.

२ तालुके मनोळी.

१ परशराम रामचंद्र यांस.

१ निळकंठराव शिंदे.

---

२

१ परगणे गोकाकेविशीं धोंडो नरसी कमाविसदार दिंमत व्यंकटराव नारायण यांस.

६ तालुके चिकोडी पैकीं गांव, सरंजामास व कमाविसीनें आहेत त्यांस.

१ परशराम रामचंद्र यांजकडे कमाविस आहे सबब.

१ रामचंद्र नारायण.

१ आबाजी नाईक काबरस.

१ आपाजी शामजी.

१ शेषो नारायण.

१ महादजी शितोळे.

---

६

---

९

रसानगी यादी.

७९२-( ६७८ ) समस्त भोपे सप्तशृंगकर यांचे भोपेपणाचा उत्पन्नाचा ऐवज एकसाला कर्जपट्टीबद्दल सरकारांत घ्यावयाचा, याजकरतां भोपेपणाचे उत्पन्नाची जप्ती करावयास बाजीराव आपाजी, तालुके धोडप, यांस आज्ञा केली आहे, त्यास मशारनिल्हे तुमचे विभागासुद्धां भोपेपणाचा ऐवज सरकारांत जप्त करून घेतील, तुह्मीं दिक्कत न करणें ह्मणोन, देवीसिंग टोके बिश्वासराव यांचे नांवें. पत्र १.

समानीन मया व अलफ जमादिलावल ३

---

A. D. 1776-77. bankers, traders, and gentlemen of independent means, and Chimṇáji Mahádeo was directed to fix the amount of the tax.

( 792 ) A levy called कर्जपट्टी equal in amount to one year's gains was imposed on the worshippers of the Goddess at Saptashringa.

A. D. 1779-80.

समस्त भोपे सप्तशृंगकर यांस पत्र कीं, तुमचा भोपेपणाचे उत्पन्नाचा ऐवज एकसाला जेपट्टीबद्दल सरकारांत घ्यावयाचा, याजकरतां भोपेपणाचे उत्पन्नाची जप्ती करावयास मशारनिल्हे यांस आज्ञा केली आहे, तरी जप्ती करून ऐवज मशारनिल्हे सरकारांत घेतील, यांसी दिकत न करणें म्हणोन. पत्र १.

एकूण दोन पत्रें चिटणिसी दिल्हीं असत.

---

# ४. इतर कर.

## ( आय् ) घासदाणा.

### मुतालिक ह्याचे कीर्दीपैकीं.

७९३–( ९ ) लक्ष्मण व हणमंत गौडा बहाद्दर देसाई परगणे गुत्तल वगैरे यांचे नांवें

समान सबैन मया व अलफ जिल्काद ५

सनद कीं, स्वारी या प्रांतीं आली, त्यास तुह्मांकडे मेजवानीचा ऐवज सालमजकुरीं घ्यावयाचा बीतपशील. रुपये.

१०००१ अश्विन अखेर रमजान.

१०००० कार्तिक अखेर सवाल.

२०००१

एकूण वीस हजार एक रुपया करार केले असत, तरी सदरील हप्तेबंदीप्रमाणें ऐवज सरकारांत भरणा करून पावल्याचा जाब घेणें. जाजती उपद्रव लागणार नाहीं ह्मणून. संनद १.

रसानगी यादी.

सदरील मेजवानी संमंधें सालमजकुरीं सावनूराकडील दुबारा उपद्रव लागणार नाहीं, याप्रमाणें यादिवार कलम लिहिलें असे.

---

IV Other taxes.

( I ) Ghásdáṇa.

( 793 ) The army having come into the Province, Laxman and Hanmant Gawda Bahádar Desái of Párgaṇa Gunṭal and others were directed to remit Rs. 20,001 as a present ( मेजवानी ). They were assured that no further demand would be made upon them from Sáwnoor on the same account in that year.

A. D. 1777-78.

## ४. इतर कर.

### ( जे ) किरकोळ.

७९४–( २५२ ) कसबे राहुरी, तर्फ मजकूर, परगणे संगमनेर, येथील गढी पडली आहे, ते बांधावयाची तुह्मांस आज्ञा केली असे, तरी दीड हजारपर्यंत रुपये लाऊन गढी बांधणें; आणि सदरील ऐवज तर्फ मजकुरीं जमाबंदीशिवाय हरएक ऐवजीं साधून घेणें ह्मणोन, नरसिंगराव बल्लाळ यांचे नांवें.

सीत सबैन मया व अलफ सवाल ९

सनद १.

रसानगी यादी.

७९५–( २५५ ) परगणे मजकूर येथील रयतीपासून व पाटील कुळकर्णी वगैरे यांजपासून एकसाला ऐवज सरकारांत घ्यावयाचा करार. कलमें.

सीत सबैन मया व अलफ सवाल २२

महालचे कमाल आकारावर देखील दुमालेबद्दल मुशाहिरा गांव आहेत; व इनाम गांवसुद्धां दरसदे रुपये १० दहाप्रमाणें घ्यावयाचा करार केला असे याचा हिसा हिसेदार यास देऊं नये. येणेंप्रमाणें. कलम १.

पाटील, कुळकर्णी, चौगुले व शेटे महाजन, यांचा हक्क व मुशाहिरा व इनाम जमिनीचा ऐवज होईल तो एकसाला सरकारांत घ्यावयाचा करार केला असे. येणेंप्रमाणें. कलम १.

एकूण दोन कलमांचा सदरहू लिहिल्याप्रमाणें आकार करून, निकडीनें वसूल करून, ऐवज हुजूर पाठऊन, पावलियाचा जाब घेणें ह्मणोन, अंताजी कृष्ण कमाविसदार, परगणे सिन्नर यांचे नांवें.

सनद १.

परवानगी रूबरू.

---

## IV Other taxes.

### ( J ) Miscellaneous.

( 794 ) The citadel in the village of Ráhuri ( गढी ) having fallen down, sanction was accorded to its being repaired at a cost of Rupees 1,500, the amount being levied from the village in the Tarf of Ráhuri in addition to the Jamábandi.

A. D. 1775-76.

( 795 ) The Kamávisdár of Sinner was directed to make the following levies for one year:—

A. D. 1775-76.

1 ) Ten percent on the Kamál assessment of all the villages in the Párgaṇá ( including Inám and Saranjám villages ) from the rayats.

( 2 ) The Haks, remuneration, and profits from Inám lands, for one year, from the Patels, Kulkarnis, Chaugules, Shetes, and Mahájans.

७९६–( २५६ ) प्रांत खानदेश येथील महालानिहायचे रयतेपासून, व पाटील कुळकर्णी, चौगुले व शेटे महाजन, यांचा हक्क व मुशाहिरा व इनाम जमिनीचा ऐवज होईल तो एकसाला सरकारांत घ्यावयाचा करार करून पेशजीं कमाविसदारांस सनदा सादर जाहल्याच आहेत, त्यास हल्लीं हकाचे वगैरे चवकशीस व दहक रयत निसबत येणें, त्याचे वसुलास हुजुरून राजश्री गोविंद अनंत कारकून यांस रवाना केले असेत, तरी प्रांत मजकूरचे कमाविसदारांस तुह्मीं पत्रें देऊन मशारनिल्हे चवकशी करितील, त्यांसी करूं देणें; व मशारनिल्हेस रोजमरा दुमाही रुपये ४० चाळीस छ. १९ सवालचा, हुजूर पावला आहे, पुढें दुमाहीची तेरीख भरलियावर जोंपर्यंत चवकशीस राहतील तोंपावेतों सदरीलप्रमाणें रोजमरा देत जाणें ह्मणोन, नारो कृष्ण यांचे नांवें.

सीत सबैन मया व अलफ सवाल २२

सनद १.

रसानगी यादी.

प्रांत खानदेशपैकीं सरंजामास महाल आहेत, तेथील रयतीपासून व पाटील कुळकर्णी वगैरे यांजपासून एकसाला ऐवज सरकारांत घ्यावयाचा करार. कलमें.

महालचे कमाल आकारावर देखील दुमालेबद्दल मुशाहिरा गांव आहेत; व इनामी गांवसुद्धां दरसदे रुपये १० दहाप्रमाणें घ्यावयाचा करार केला असे, याचा हिसा हिसेदार यांस देऊं नये. येणेंप्रमाणें. कलम १.

पाटील, कुळकर्णी, चौगुले व शेटे माहाजन, यांचा हक्क व मुशाहिरा व इनाम जमिनीचा ऐवज होईल तो एकसाला सरकारांत घ्यावयाचा करार केला असे. येणेंप्रमाणें. कलम १.

एकूण दोन कलमांचा सदरील लिहिल्याप्रमाणें आकार करून ऐवज घ्यावयाचा. याच चवकशीस हुजुरून राजश्री गोविंद अनंत कारकून पाठविले आहेत, हे चवकशी करून ऐवज ठरावितील, तो निकडीनें वसूल करून वराता होतील, त्यासी मशारनिल्हे यांचे गुजारतीनें ऐवज पावता करणें ह्मणोन. सनदा.

१ आनंदराव भिकाजी यांजकडे महाल.
 १ परगणे सांवर्दे.
 १ परगणे जामनेर.
 १ परगणे बोदवाड.
 ———
 ३

सनद.

(796) Similar orders were issued to the officers of Khándesh.

A. D. 1775-76.

१ खंडेराव त्रिंबक यांजकडे महाल.

 १ परगणे जेमाबाद.

 १ परगणे हातगड.

---

२

सनद.

१ शिवाजी विठ्ठल यांजकडे महाल.

 १ परगणे धुळें.

 १ परगणे सोनगीर.

---

२

सनद.

१ रघुपतराव नारायण राजे बहाद्दर यांजकडे महाल.

 १ परगणे अमळनेर.

 १ परगणे निंबाईत.

---

२

सनद.

१ विश्वासराव त्रिंबक यांजकडे महाल.

 १ परगणे भ्रसवें.

 १ परगणे ठोकडे.

---

२

सनद.

१ सखाराम भगवंत यांजकडे महाल.

 १ परगणे शेंदुरणी.

 १ परगणे नेर.

 १ परगणे चौपाळें.

 १ परगणे एरंडोल.

 १ परगणे सांडस, प्रांत बागलाण.

---

५

सनद.

१ माहादाजी नीळकंठ यांजकडे महाल.

  १ परगणे भडगांव व पाचोरें.
  १ परगणे वरणगांव.
  १ परगणे चिखलवाहाळ.

  ---
  ३

सनद.

१ रामचंद्र पवार यांजकडे महाल.

  १ परगणे बहाळ.
  १ परगणे बोरनार.

  ---
  २

सनद.

१ बळवंतराव धोंडदेव यांजकडे महाल, परगणे चांदसर यांचे नांवें. सनद.

१ तुकोजी होळकर.

  १ परगणे नंदुरबार.
  १ परगणे गाळणें.
  १ परगणे आंबें.
  १ परगणे आडावद.
  १ परगणे थाळनेर.
  १ परगणे उत्राण.
  १ परगणे सलतानपूर.

  ---
  ७

सनद.

१ महादजी शिंदे यांजकडे महाल.

  १ परगणे एदलाबाद.
  १ परगणे यावल.
  १ परगणे लाहोर.

  ---
  ३

सनद.

१ माधवराव रामचंद्र यांजकडे महाल.

१ परगणे झोडगें.

१ परगणे मेहुणबारें.

---

२

सनद.

१ हमीदखान टोके यांजकडे, परगणे डांगरी, यांचे नांवें. सनद.

१ अमृतराव बांडे यांजकडे महाल.

१ परगणे वारसें.

१ परगणे उंबरपाटें.

---

२

सनद.

---

१४

रसानगी यादी.

७९७–( २५८ ) रामचंद्र नारायण यांस पत्र कीं, मौजे देहू, तर्फ हवेली, प्रांत पुणें, हा गांव तुकोबा गोसावी यांच्या वंशाकडे संस्थानाचे खर्चास आहे, त्यास सालमजकुरीं दहक व पाटील कुळकर्णी यांचा हक्क सरकारांत एकसाला घ्यावयाचा करार जाहला आहे, त्यास मौजे मजकूर तुकोबाचे वंशाकडे आहे, सबब दहक व पाटील कुळकर्णी यांचा हक्क माफ केला असे, तरी गांवास तगादा न करणें, वसूल घेतला असेल तो माघारा देणें, ह्मणोन चिटणिसी. पत्र १.

सीत सबैन
मया व अलफ
जिल्काद ५

शिवराव हरी यांस पत्र कीं, मौजे आळंदी, तर्फ चाकण, प्रांत जुन्नर हा गांव श्रीज्ञानेश्वर यांचे खर्चास इनाम आहे, तेथील दहक व पाटील कुळकर्णी यांचा हक्क मुशाहिरा एकसाला सरकारांत घ्यावयाचा करार जाहला आहे, त्यास मौजे मजकूर श्रीकडे आहे, सबब दहक व पाटील कुळकर्णी यांचा हक्क माफ केला असे, तरी गांवास तगादा न करणें, वसूल घेला असेल तो माघारा देणें, ह्मणोन चिटणिसी. पत्र १.

---

( 797 ) The village Dehu and Aḷandi being grants for religious purposes were exempted from the levy called Dahak-Patti.

A. D. 1775-76.

७९८–( २५९ ) श्रीमंत महाराज सौभाग्यवती मातुश्री बाईसाहेब वाडा दुसरा यांजकडे गांव आहेत तेथील दहीयकाचा व पाटील कुळकर्णी यांच्या हकाचा ऐवज सरकारांत घ्यावयाचा मना केला असे, तरी गांवास वसुलाविशीं तगादा न करणें, रोखे केले असतील ते मना करणें ह्मणोन.

सीत सबैन मया व अलफ जिल्काद १७

सनदा.

१ हैबतराव भवानी शंकर यांस प्रांत वाईपैकीं गांवाविशीं.

१ मौजे वेचलें, तर्फ सातारा.

१ मौजे खेड, तर्फ वंदन.

१ मौजे भोसें, संमत कोरेगांव.

३

तीन गांवांविशीं.

१ श्रीनिवास शामराव यांस प्रांत कराड पैकीं गांवांविशीं.

१ मौजे येरवळें.

१ मौजे नागझरी.

२

दोन गांवांविशीं.

२

दोन सनदा. रसानगी यादी.

७९९–( ३३५ ) परगणे वरणगांव, प्रांत खानदेश, येथील जहागिरीचा अमल नवाब निजामअली खान यांजकडे आहे, त्यास तेथील स्वराज्याचा अमल सरकारांत आहे, याजमुळें तुह्मीं दहकाच्या, ऐवजाचा तगादा परगणे मजकुरास केला आहे, ह्मणोन विदित जाहलें; त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी स्वराज्याच्या दहकाचा ऐवज तुह्मीं परगणे मजकुरापासून घेणें.

सबा सबैन मया व अलफ रमजान १४

(798) The villages belonging to the 2nd wife of the Sattara Raja were similarly exempted.

A. D. 1775-76.

(799) The Jahágir Amal of Párgaṇe Waraṇgaon belonged to Nawáb Nizám Alikhán and the Swarájya Amal to Government. Náro Krishṇa, Sar Subhá of Piánt Khándesh was directed to levy Dahak Paṭṭi from the Pargaṇa calculated on the Swarájya Amal on leaving the Dahakpaṭṭi on the Jahágir Amal to be collected by the Nawáb's Kamávisdár.

A. D. 1776-77.

जहागिरीच्या अमलाची दहकपट्टी नवाबाकडील कमाविसदार घेतील, जाजती गैर वाजबी उपद्रव परगणे मजकुरास न करणें म्हणोन, नारो कृष्ण सरसुभा, प्रांत मजकूर यांस

सनद १.

रसानगी यादी.

८००–( ४७३ ) प्रांत गंगथडी येथील सरकारी माहाल व सरंजामी माहाल, दुमाले गांवसुद्धां, व तालुके सोलापूर दुमालेसुद्धां कमाल आकारास रयेत निसबत दर शेंकडा रुपये ·।।· अर्धाप्रमाणें तोफखान्याचे तयारीस बाभळीचे खरेदीबद्दल सरकारांत घ्यावयाचा करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरीलप्रमाणें चौकशीनें आकार करून, एका महिन्या आलीकडे कारखानेमजकुराकडे ऐवज पावता करून पावलियाचें कबज घेणें. सदरीलचा हिशेब हुजूर समजावणें म्हणोन.

समान सबैन मया व अलफ रजब १७

सनदा.

१ सरसुभा प्रांत गंगथडी येथील सरकारी माहाल, व सरंजामी माहाल दुमालेसुद्धां येविशीं नरसिंगराव बल्लाळ यांस.

सनद.

१ तालुके सोलापूर दुमाले गांवसुद्धां येविशीं रामचंद्र शिवाजी यांस.

---

२

परवानगी रूबरू.

८०१–( ४७४ ) श्रीनिवास पंडित प्रतिनिधि यांस सनद कीं, प्रांत कऱ्हाड येथील दुमाले गांवसुद्धां कमाल आकारास रयेत निसबत दर शेंकडा रुपये ·।।· अर्धाप्रमाणें तोफखान्याचे तयारीस बाभळीचे खरेदीबद्दल सरकारांत घ्यावयाचा करार करून आपणांस लिहिलें आहे, तरी श्रीनिवास शामराव यांचे व गंगाधर बाजी दहकाचे कामास तेथें आहेत, त्यांचे गुजारतीनें सदरीलप्रमाणें आकार करून, ऐवज होईल तो कारखाने मजकुराकडे पावता करून पावलियाचें कबज घ्यावें म्हणोन.

समान सबैन मया व अलफ रजब २५

सनद १.

परवानगी रूबरू.

सदरीलची सनद श्रीनिवास शामराव मामलेदार, प्रांत मजकूर, यांस सादर केली होती, त्यास मशारनिल्हेच्यानें वसूल न होय, सबब हल्लीं प्रतिनिधि यांचे नांवें सनद दिल्ही असे.

---

( 800 ) A tax was imposed on the rayats of Pránt Gangathadi and Taluka Sholápoor, including Saranjám and alienated villages at the rate of 0–8 per cent of the Kamál assessment to purchase Bábhul wood for the purposes of the artillery.

A. D. 1777-78.

( 801 ) A similar tax was imposed on the rayats of Pránt Karád and as the Mámlatdár was unable to recover it, its collection was entrusted to Shriniwás Pandit Pratinidhi.

A. D. 1777-78.

८०२–( ५३५ ) परगणे नेवासें येथील दुमाले गांवसुद्धां कमाल आकारास रयत नि-

समान सबैन सबत दरसदे रुपये ·।।· निमप्रमाणें तोफखान्याचे तयारीबद्दल बाभळी
मया व अलफ खरेदी करावयास सरकारांत द्यावयाचा करार करून हे सनद तुह्मांस
सफर २६ सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें दुमाले गांवसुद्धां ऐवज तुह्मीं
वसूल करून, कारखाने मजकुराकडे एक महिन्या अलीकडे पावता करून, पावलियाचें
कबज घेणें; आणि सदरहूचा हिशेब हुजूर समजावणें ह्मणोन,, रामचंद्र नारायण यांचे नांवें
छ. ११ जिल्काद. सनद १.

परवानगी रूबरू, राजश्री सखाराम भगवंत.

रसानगी, गोविंद राम आपटे.

८०३–( ५८६ ) तुह्मांकडे मेंढराचे वनचराईची मामलत सालमजकुरापासून सांगोन

तिसा सबैन मामलत संमंधें मक्ता सालमजकूरचा रुपये ५००१ पांच हजार एक
मया व अलफ रुपया करार केला, यास हप्तेबंदी. रुपये.
सफर १६

२५०० चैत्र शुद्ध १५
२५०१ वैशाख शुद्ध १५

―――――

५००१

एकूण पांच हजार एक रुपया सदरील हप्तेबंदीप्रमाणें सरकारांत भरणा करून जाब
घेणें. खेरीज मामलत संमंधें. कलमें.

---

**( 802 )** It was ordered that a levy at the rate of 8 annas per hundred of the revenue should be made from the villages of Parganá Newáse, ( including alienated villages also ) for the purchase of Babul wood required for the purposes of the artillery.

A. D. 1777-78.

**( 803 )** The Mámlat of grazing fees to be levied from sheep was farmed out to Abáji Jádhao and Krishnáji Appáji for an annual payment of Rs. 5,001. The principal conditions were as follows:—

A. D. 1778-79.

( 1 ) All expenses on account of Shibandi to be borne by the farmers.

( 2 ) Passports for free grazing given by Government; to be respected.

( 3 ) Sheep of Saranjámdárs and persons who had passports should be exempted in case the sheep really belonged to them, otherwise they should be charged at the rate of Rs. 6-4 per hundred goats.

शिबंदी वगैरे खर्च लागेल तो मकिया खेरीज साधून करणें. कलम १.

सालाबाद दस्तकें पागानिहाय व सरंजामी वगैरे यांस सरकारांतून पावतात, त्यांचीं खासगत जीं मेंढरें असतील त्यांची चौकशी करून मजुरा देणें; दस्तकाचे भरतीस कुळारगी मेंढरें जाजती मेळवीत असल्यास त्यांचा वसूल दर शेंकडा रुपये ६। सवा सहाप्रमाणें घेत जाणें. कलम १.

सन सलास सबैनांत सदरील मामलत तुम्हीं करून दहा हजार रुपये सरकारांत रसद दिल्ही, पुढें दंगा जाला याजकरितां मामलत उभविली नाहीं, सबब खिलारी यांजकडे बाकी राहिली असेल ती उगऊन घेणें; व महालानिहायचे कमाविसदारांकडे वगैरे बनचराईचा वसूल गेला असेल तो चौकशी करून घेणें, कमाविसदार ऐवज द्यावयास दिकत करूं लागले तरी हुजूर समजावणें, ह्मणजे त्यांस ताकीद करून ऐवज देविला जाईल. कलम १.

मामलतीचे वसुलास सरकारचे ढलाईत प्यादे लागल्यास घेऊन रोजमरा देत जाणें. कलम १.

मामलत संमंधें ताकीदपत्रें लागतील तीं वाजबी पाहून देविलीं जातील. कलम १.

मामलत कराराप्रमाणें करणें, गैरवाजबी वर्तणूक केल्यास मामलतीची घालमेल केली जाईल. कलम १.

सालाबादचीं दस्तकें पागानिहाय वगैरे यांचीं आहेत, त्याखेरीज सालमजकुरीं नवीन दस्तकें दिल्हास पेस्तरसालीं मकियांत मजुरा पडतील. कलम १.

सालाबाद माहालानिहायचे कमाविसदार वगैरे बनचराईचा ऐवज घेत असतील तो तुह्मीं घेत जाणें. कलम १.

गांवगन्ना रयतीचीं मढर चारणी करितात, त्याची चौकशी करून दर शेंकडा रुपये ·।।· अर्ध रुपयाप्रमाणें घेत जाणें. कलम १.

सरकारचे दस्तकाशिवाय दुसरीं कोणाचीं दस्तकें मागूं नयेत. कलम १.

अहद तापी दक्षणतीर खानदेश बागलाण तहद कृष्णा उत्तरतीर बाळाघाट विजापूरपर्यंत पेशजींचे करा[रा]प्रमाणें अमल करणें. कलम १.

गांवगन्ना मेंढके, खाटीक, धनगर, वगैरे गांवांत असतील त्यांचीं मेंढरें गांवचे गांवीं चारणी करीत असल्यास दर शेंकडा रुपये २ दोनप्रमाणें घेत जाणें. परगांवीं चारणीस गेल्यास दर शेंकडा रुपये ४।। साडे चारप्रमाणें चौकशी करून वाजवी घेत जाणें. कलम १.

---

( 4 ) Sheep belonging to rayats ( cultivators ) to be charged at the rate of 8 annas per hundred.

( 5 ) Sheep belonging to Dhangars, butchers &c. to be charged at the rate of Rs, 2 per hundred for grazing in their village and at the rate of Rs. 4-8 for grazing elsewhere.

एकूण बारा कलमें करार करून दिल्हीं असेत, तरी सदरील लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, आबाजी जाधव, व कृष्णाजी आपाजी यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

८०४–( ६१६ ) मौजे जोरवें, तालुके हवेली संगमनेर, हा गांव शेकोजी मुळे यांचे पागेचे बेगमीस आहे, त्यास लाहीचा उपद्रव फार लागला, सबब मौजे मजकूर येथील व्रतबंधाचे साहित्याबद्दल रुपये पन्नास द्यावयाचे करार केले असत, तरी पन्नास रुपये गांवापासून घेणें. जाजती न घेणें ह्मणोन, नरसिंग बल्लाळ यांस. सनद १.

समानीन मया व अलफ जमादिलावल १९

रसानगी यादी.

८०५–( ६९८ ) परगणे वरणगांव, प्रांत खानदेश, येथें मोगलांकडून सालगुदस्तां जहागिरीची जफ्ती होऊन रयतेस मनस्वी उपद्रव जाहला; व सरकार अमलाची पायमाली जाहली, तेव्हां तुह्मीं कमाविसदार परगणे मजकूर निसबत घन:शाम त्रिंबक यांजपाशीं करार केला कीं, जाजती शिबंदी ठेऊन महालचे ऐवजाची पट्टी महालीं करून देऊं; त्याजवरून कमाविसदारांनीं जाजती शिबंदी ठेऊन रयतेस तसदी होऊं न दिल्ही; व जहागिरदारांशीं एक दोन झुंजे जाहालीं. सरकारअमलाचा बंदोबस्त केला, असें असतां करारप्रमाणें महालीं शिबंदीची पट्टी करून देत नाहीं, ह्मणोन हुजूर विदित जाहलें; ऐशास नवा अमलदार महालीं येऊन रयतेस वगैरे उपद्रव लावीत होता, तेव्हां तुह्मी सरकारचे अमलदारास सांगितलें कीं. शिबंदी ठेऊन महालचा

इसने समानीन मया व अलफ जमादिलाखर २१

( 804 ) The village of Jorwe in Táluká Haveli Sangamner having suffered a great deal in furnishing supplies, it was ordered that Rs. 50 only should be levied from the village on account of contribution for the thread-ceremony of the Peshwa and that no extra demand should be made.

A. D. 1779-80.

( 805 ) The jahágir amal of Pargaṇá Waraṅgam in Khándesh was attached by the Mogals in the preceding year, and the rayat was very much oppressed. The Deshmukh and Deshpánde therefore urged the Government Kamávisdár to enlist additional Shibandi for protecting the people and agreed to raise any additional sum required for the purpose by a levy on the Mahál. The Kamávisdár entertained additional men and succeeded in relieving the people from oppression. The promised levy was not however made and the matter was referred to Government. The Deshmukh and Deshpánde were reprimanded for not collecting from the Mahál the sum spent by the Kamávisdár and were directed to collect the money now.

A. D. 1781-82.

बंदोबस्त करणें, शिबंदीची पट्टी महालीं करून देऊं ह्मणोन, त्याजवरून त्यांणीं शिबंदी ठेऊन बंदोबस्त केला असतां, महालीं पट्टी देत नाहीं हे गोष्ट कार्याची नसे; हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें असे, तरी ऐवजाची पट्टी करून द्यावयाचा करार आहे, त्याप्रमाणें पट्टी करून देणें. दिक्कत न करणें ह्मणोन, देशमुख व देशपांडे, परगणे मजकूर, यांस चिटणिसी. पत्र १.

८०६–( ८३३ ) करीम वल्लद फत्ते महमद यांचे नांवें सनद कीं, चक्कीवडारी, व गाडेवडारी, यांजपासून पालपट्टीचा ऐवज सरकारांत घ्यावयाचा, त्याची कमावीस सरकारांतून तुह्मांकडे सांगितली असे येविशीं. कलमें.

अर्बा समानीन मया व अलफ रबिलावल ९

सालमजकुरीं रसदेचा ऐवज सरकारांत घ्यावयाचा करार केला. १२००० रुपये.

तपशील.

७००० फाल्गुन अखेर.

५००० अखेर सालपावेतों सरकारांतून श्रीनिवास त्रिंबक कारकून शिलेदार यांस दिल्हे आहे, त्यास मशारनिल्हेचे विद्यमानें वसूल होतील त्याचा भरणा सरकारांत करणें. रुपये.

---

१२०००

एकूण बारा हजार रुपयांचा भरणा हुजूर करणें. कलम १.

हिरा वडारी याणें पालपट्टीचा वसूल घेऊन मध्येंच ठेविला असेल, तो त्याजपासून घेऊन बारा हजार रुपयांचे भरण्यांत घेणें, मजुरा पडेल. कलम १.

पालपट्टीचे वसुलाची वहिवाट सरकारांतून तुह्मांस वगैरे तैनात सालीना रुपये.

५०० तुह्मांस घोडे माणसेंसुद्धां.

२०० कारकून तुह्मांकडील यांस.

---

७००

एकूण सातशें रुपये तैनात सालीना करार केली असे, तरी रसदेखेरीज पालपट्टीचे ऐवजीं मजुरा पडेल. कलम १.

वसुलाचे वगैरे कामास प्यादे असामी २५ पंचवीस, एकूण दरमाहा दर असामीस तैनात रुपये ४ प्रमाणें रुपये १०० शंभर रुपये बारमाही शिरस्तेप्रमाणें करार केले असेत, तरी ज्या वेळेस जसें वसुलाचें काम लागेल तसें ठेऊन पालपट्टीचे ऐवजीं खर्च करणें, नेमणुकेखेरीज जाजती शिबंदी ठेविल्यास मजुरा पडणार नाहीं. कलम १.

चक्कीवडारी, व गाडेवडारी वगैरे वडारी लष्करांत येतील, त्यांस परभारा सरकारचा पट्टीविशीं उपद्रव लागणार नाहीं. कलम १.

---

( 806 ) The Kamávis of levying fees from चक्कीवडारी and गाडेवडारी for their tents ( in the camp ) was given to Karim wd. Fate Mahamad and Rs. 12,000 were taken from him.

A. D. 1783-84.

तून श्रीनिवास त्रिंबक कारकून यांस दिल्हे आहे, यांचे विद्यमानें करणें. यांचे दाखल्याशिवाय काम न करणें, गैरवाजबी वर्तणूक केल्यास पारिपत्य केलें जाईल.

कलम १.

एकूण सहा कलमें करार केलीं असेत; तरी सदरीलप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणून.

सनद १.

येविशीं चक्कीवडारी, व गाडेवडारी, वगैरे वडारी महालानिहाय यांचे नांवें कौल कीं, तुह्मांपासून पालपट्टीचा ऐवज सरकारांत घ्यावयाचा, त्याची कमावीस करीम वल्लद फत्तेमहमद यांजकडे सांगितली असे, तरी तुह्मी लष्करांत येऊन पालपट्टीचा वसूल शिरस्तेप्रमाणें मशारनिल्हेकडे देत जाणें, दुसरीकडून तुह्मांस उपद्रव लागणार नाहीं, अभय असे ह्मणून.

कौल ६.

---

७

एक सनद व सहा कौल दिल्हे असेत.

रसानगी यादी.

८०७–( ९९७ ) खासा स्वारी सन समानीनांत कसबे नाशिक, परगणे मजकूर, येथें गेली होती, ते समई कृष्णराव गंगाधर कमाविसदार, परगणे मजकूर, यांचे विद्यमानें खर्च जाहला, त्यापैकीं जिनसांचा तोटा, व लाकूडफाटें व शिदा बेगारी यांस वगैरे किरकोळ खर्च जाहला, त्याबद्दल पट्टी दुमाले वगैरे गांवांवर करून ऐवज घ्यावयाचा करार केला आहे, त्यास तुह्मांकडे परगणे मजकूरपैकीं गांव आहेत त्यांजवर रुपये ३१४३ तीन हजार एकशें त्रेतालीस रुपये पट्टीची वाटणी घातली असे, तरी सदरहू तीन हजार एकशें त्रेतालीस रुपये मशारनिल्हेकडे देणें ह्मणोन.

तिसेन समानीन मया व अलफ मोहरम २३

सनदा.

१ त्रिंबकराव अमृतेश्वर यांजवर पट्टीची वांटणी. रुपये.

५२ मौजे जलालपूर.

१०८ किल्ले बहुला येथील सरंजामास परगणे मजकूरपैकीं देहे ६ सहा आहेत त्यांजवर.

---

१६०

( 807 ) To meet the miscellaneous expenses incurred by the Peshwá in his journey to Násik a cess was levied from Dumálá villages.

A. D. 1788-89.

१ केसो त्रिंबक यांजकडे मौजे मजकूर दसक हा गांव आहे, त्यावर रुपये २१ एकवीस येविशीं.

१ हरी बल्लाळ यांजकडे मौजे पाथरडी हा गांव आहे, त्याजवर रुपये ४७ सत्तेताळीस रुपये येविशीं.

१ खंडेराव त्रिंबक यांजकडे मौजे वेढें हा गांव आहे, त्याजवर रुपये २५ पंचवीस रुपये येविशीं.

१ रघुपतराव नारायण राजेबहादर यांजकडे मौजे वडाळें हा गांव आहे, त्याजवर रुपये ३३ तेतीस रुपये येविशीं.

१ सैद सादक हुसेन पीरजादे यांजकडे मौजे सातपूर हा गांव आहे, त्याजवर रुपये २३ तेवीस येविशीं.

१ देवराव महादेव यांजकडे मौजे चांदोरी हा गांव आहे, त्याजवर रुपये १८४ एकशें चौऱ्याशीं रुपये येविशीं.

१ श्रीराम श्रीधर यांजकडे मौजे हिंगणगांव हा गांव आहे, त्याजवर रुपये ९ नऊ रुपये येविशीं.

१ बाबूराव गणेश यांजकडे मौजे समनेरें हा गांव आहे, त्याजवर रुपये ११ अकरा रुपये येविशीं.

१ माधवराव गंगाधर यांजकडे मौजे पिंपळगांव आहे, त्याजवर रुपये १६ सोळा रुपये येविशीं.

१ रघुनाथ बळवंत यांजकडे मौजे पळसें हा गांव आहे, त्यावर रुपये ३५ पस्तीस रुपये येविशीं.

१ अमृतराव रेणको यांजकडे मौजे एकरूबरें हा गांव आहे, त्याजवर रुपये १६ सोळा रुपये येविशीं.

१ गोपाळराव भिकाजी यांजकडे मौजे पांढुरली हा गांव कमाविसीनें आहे, त्याजवर रुपये ४६ शेताळीस रुपये येविशीं.

१ मोकदम मौजे लाखलगांव यांजवर रुपये ४७ सत्तेताळीस रुपये येविशीं सनद.

१ आनंदराव पवार यांजकडे मौजे करंजगांव हा गांव आहे, त्याजवर रुपये ७१ एकाहत्तर रुपये येविशीं.

१ शिवाजी विठ्ठल यांजकडे मौजे चाटोरी व सायखेड हे दोन गांव आहेत, त्याजवर रुपये १३७ एकशें सततीस येविशीं.

१ मोकदम मौजे जातेगांव यांजवर रुपये २ दोन रुपये येविशीं.

१ किल्ले बितिंगा, तालुके पटा, येथील सरंजामास मौजे मुसरें हा गांव आहे, याजवर ७ सात रुपये येविशीं बाळकृष्ण केशव यांस.

१ परशराम नारायण यांस कीं, किल्ले हर्ष व रामसेज येथील सरंजामास परगणे मजकूर पैकीं देहे २३ तेवीस आहेत, त्यांजवर रुपये २२३ दोनशें तेवीस रुपये येविशीं.

१ धोंडो महादेव यांस कीं, किल्ले त्रिंबक येथील बेगमीस परगणे मजकूर पैकीं देहे २८ अठावीस आहेत, त्यांजवर रुपये २७५ दोनशें पंचाहत्तर रुपये येविशीं.

१ येशवंतराव महादेव यांस किल्ले अलंग व माहानगड, तालुके रतनगड, येथील बेगमीस परगणे मजकूर देहे २२ बेवीस आहे[त], त्यांजवर २०२ दोनशें दोन रुपये येविशीं.

१ गोपाळ बल्लाळ यांस कीं, तालुके कावनई येथील बेगमीस परगणे मजकूर पैकीं देहे ३९. एकूण चाळीस आहे[त], त्यांजवर रुपये ३६६ तीनशें सासष्ट रुपये येविशीं.

१ कृष्णराव गंगाधर कमाविसदार, परगणे नाशिक यांस कीं, परगणे मजकूर येथील सरकारांत महालाकडे वसुली देहे ६६ सासष्ट आहेत, त्यांजवर रुपये ११८७ अकराशें सत्यायशीं रुपये पट्टीची वांटणी घातली असे, तरी सदरहू रुपये गांवाकडून वसूल घेणें ह्मणोन.

---

२३
तेवीस सनदा दिल्या असेत. रसानगी अजमास.

# ५ गांवचे व महालचे वतनदार.

८०८–( १८५ ) बाहिरजी बिन द्वारकोजी येबिन कृष्णाजी पाटील कदम मोकदम व आपाजी बिन भगवंतराव येबिन कृष्णाजी कदम पाटील, मौजे गिरवी, परगणे फलटण, यांचें नांवें निवाडपत्र ऐसाजे; तुमचे भाऊ संताजी बिन हैबतराव कदम पाटील यांणीं हुजूर किल्ले पुरंदरच्या मुक्कामीं येऊन विदित केलें कीं, आमचे वडिलांचा व भिकाजी बिन सुभानजी कदम निमे पाटील

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

---

V Village and District Watandárs.

( 808 ) One of the privileges of the Mokadam Pátil was that a woman from his house was to be invited for dinner at marriage festivals. A woman of the younger branch in the Pátil's family having been invited for dinner at such a festival, the Pátil complained to the Peshwa & the matter was after inquiry decided in his favor.

A. D. 1774-75.

बिरादरभाऊ, यांचे वडिलांचा मौजे मजकूरचे मोकदमी वडीलपणाकरितां कजिया होता, त्याचा निवाडा सन अकराशें चवसष्टीमध्यें मुधोजी नाईक निंबाळकर थोरले यांणीं देशपांडे परगणे मजकूर याचे दप्तरचा दाखला पाहून व मौजे मजकूरचे बारा बलुते यांची साक्ष घेऊन प्राचीन कागदपत्राचे दाखले गोतमुखें मनास आणून निवाडा करितां मोकदमी आमची द्वारकोजी बिन कृष्णाजी कदम पाटील यांची खरी झाली, भिकाजी बिन सुभानजी, व सखोजी बिन द्वारकोजी कदम हे निमेचे पाटील धाकटे. यांणीं धाकुटपणाप्रमाणें असावें; याप्रमाणें निवाडा होऊन त्यांणीं आमचे द्वारकोजी मोकदम व इंद्रोजी कदम पाटील यांस येजीतखत लिहून दिलें, त्याजवरून नाइकांनीं महजर करून आमचे वडिलांस दिल्हा, त्याप्रमाणें आज वीस वर्षे मोकदमीचा भोगवटा घेत आलों, मध्यें सालगुदस्तां भिकाजी मजकुरानें लग्नांत वडील मोकदम याचे घरची सवासीण सांगावी, ते न सांगतां कजिया करून कैलासवासी श्रीमंत नारायणराव पंडित प्रधान साहेब यासी फिर्याद जाहला कीं, आपली मनसुबी करावी, त्याजवरून आह्मी हुजूर येऊन आपले सदरहू कागदपत्र दाखऊन वर्तमान विदित केलें, पुढें सरकारचीं पत्रें भोगवटियास करून ध्यावीं, तों श्रीमंत नारायणराव साहेबांस कैलासवास जाहला, त्याजवर भिकाजीनें स्वसंतोषें पहिल्या निवाड्याप्रमाणें कागद आह्मांस लेहून दिला आहे, तो व पेशजींचें भिकाजी व सकोजींचें यजीतखत, व द्वारकोजीचे नांवाचा महजर आहे, तो साहेबीं मनास आणून सरकारचीं पत्रें भोगवटियास करून दिलीं पाहिजेत; ह्मणोन विनंति करून सदरहूप्रमाणें महजर व यजीतखत व अलीकडील भिकाजीचा कागद आणून दाखविले ते हजीर मजालसीस पंचाईतमतें मनास आणितां, निमे पाटिलकी व दरोबस्त वडीलपण मोकदमी तुमची आहे, व निमे पाटिलकी धाकुटपण भिकाजी, याप्रमाणें खरें जाहलें; त्याजवरून भिकाजीचा धाकटा घरभाऊ आनंदराव हुजूर होता, त्यास सदरहूप्रमाणें कागद दाखवून आज्ञा केली कीं, पुढें विचार काय? तेव्हां त्यांनीं आपले वडिलांनीं मोकदम ह्मणोन साक्ष घातलेले कागदाच्या तालका एक दोन दाखविल्या त्यांत भिकाजीचे वडिलांचें नांव अगोदर व मागनें तुमच्या वडिलांचें नांव लेहून मोकदम म्हटलें आहे, त्याजवरून तुमचे संताजीस पुसलें, त्यांनीं आनंदरायानें तालका दाखविल्या, त्या पलीकडील मौजे ईडणी, परगणे मजकूर, येथील महजदाराची तालीक दाखविली, त्यांत तुमच्या वडिलाची मोकदम ह्मणून साक्ष आहे, त्याजवरूनही पहातां आनंदरायानें महजराच्या नकला दाखविल्या, त्यांत मोकदम एकास ह्मटलें असावें तें नाहीं, दोघांच्याही वडिलांचीं नांवें लिहून पुढें मोकदम असें ह्मटलें आहे, हें अनन्वित, दोघांचे वडिलांस ह्मणावयाची चाल नाहीं, तेव्हां भिकाजीच्या वडिलांनीं अलीकडे काहीं बहिरजीचे वडिलांचे नादारीमुळें मोकदमीचा कारभार केला, त्या समई मोकदम ह्मटलें असेल, परंतु त्या अगोदरचा दाखला मोकदमीचा तुमचा गुदरला, त्याजवरून सर्वही अर्थ पाहतां तूं बहिरजी पाटील मोकदमीस खरा आहेस, तेव्हां सवासीण

ही तुमची सांगावी तर, मौजे मजकूरची मोकदमी दरोबस्त व निमे पाटिलकी व मोकदमी संमंधे हक, उत्पन्न व मानपान, जे असतील ते, निंबाळकराचे महजराप्रमाणें तूं, व तुझे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभऊन सुखरूप राहणें; तूं खरा जाहलास सबब तुझे माथां सरकारची हरकी करार केली ते रुपये ३००१ तीन हजार एक रुपया सरकारांत पोता जमा असेत, ह्मणोन चिटणिसी. पत्र १.

येविशीं सदरहू अन्वयें पत्रें कीं, मौजे मजकुराची मोकदमी दरोबस्त व निमे पाटिलकी व मोकदमी संमंधे हक, उत्पन्न व मानपान व सवाशीण असतील ते यांस, व त्यांचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेनें चालविणें, या पत्राची प्रत लिहून घेऊन हें असल पत्र भोगवटियास परतोन देणें ह्मणोन. पत्रें.

१ श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधि यांस.
१ देशाधिकारी व लेखक वर्तमान, भावी, परगणे फलटण यांस. पत्र.
१ जमीदार परगणे फलटण यांस.
१ कुळकर्णी व समस्त दाहीजण, मौजे मजकूर यांस.

―――
४ ५

## मुतालिक ह्याचे कीर्दीपैकीं.

८०९–( ५ ) मौजे जैतापूर, परगणे कन्नड, येथील कुळकर्ण पूर्वी दिनाजी येशवंत यांचें होतें, त्यांचे पोटीं संतान नाहीं, व भाऊबंदही कोणी नाहींत, तेव्हां वहिणीचा लेक सयाजी बयाजी यास दत्तपुत्र घेऊन वतनास अधिकारी केला, त्याणें वतन अनभविलें; त्याचा पुत्र दिनकर सयाजी याचा पुत्र सयाजी दिनकर हल्लीं वतन करीत असतां देवजी पाटील चौथाईपैकीं चौथाइचा खरीददार याणें राजश्री संभाजी व जोत्याजी जाधवराव यांस गैरवाका समजाऊन वतन जफ्त करविलें आहे; येविशींचें वर्तमान मनास आणून वाजवी माझें वतन मजकडे चालत आल्याप्रमाणें चालविलें पाहिजे, ह्मणोन सयाजी दिनकर याणें हुजूर विदित केलें; त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी देवजी पाटलास बोलाऊन कोणाची रयात न करितां वाजबीचे रुईनें मनास आणून सरकारची हरकी, गुन्हेगारी घेऊन विल्हेस लावणें ह्मणोन, धोंडो महादेव यांचे नांवें. पत्र १.

खमस सबैन मया व अलफ सवाल ७

## FROM MUTÂLIK'S DIARY.

( 809 ) Dináji Yeshwant Kulkarni of Jaitápur in Parganá Kannad having no issue & no Bháubands, adopted his sister's son as his son. The Watan was after Dináji enjoyed by this adopted son.

A. D. 1774-75.

८१०-( २३६ ) परगणे चिमळगें येथील देशमुखी व देशकुळकर्णी यांचें वतन जफ्त केलें आहे, त्यामुळें परगणे मजकूरची लावणी अगदीं पडली, बेरडानें धामधूम केली, सबब सालगुदस्तां वसूल अगदीं आला नाहीं, सालमजकुरीं लावणी पडती, यास्तव वतन जफ्त आहे तें मोकळें केलें असे, तरी देशमुख व देश कुळकर्णी यांचें वतन मोकळें करून सुदामतप्रमाणें त्यांजकडे चालविणें ह्मणोन, नागो राम यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सीत सबैन मया व अलफ साबान १४

८११-( २६० ) कृष्णराव रामचंद्र, व नारो बल्लाळ भुसकुटे, सरमंडलोई, व सरकानगो, सरकार हांडिया व सरमंडलोई सरकार बिजयागड, प्रांत नेमाड, सुभे खानदेश, यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं हुजूर किल्ले पुरंधर येथील मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, सरकार हांडिया येथील सरमंडलोईपणाचें वतन श्रीमंत कैलासवासी नानासाहेबीं आह्मांस देऊन, पत्रें करून दिल्हीं, त्याप्रमाणें वतन आह्मांकडे चालत आहे, त्यास तो मुलूख गोंडवाणी यास्तव तेथें रहावयास जागा मजबूद गढीची असावी, याकरतां कसबे टेंभुर्णी, परगणे मजकूर, सरकार हांडिया येथें पूर्वीं गढी होती, ती जीर्ण होऊन पडली, त्या जाग्यावर आह्मी नवीन पक्या ईटांची गढी बांधली आहे, तिचे बंदिस्तीस खर्च लागला तो आह्मीच लाविला, ते जागा गढीसुद्धां आह्मांस बक्षीस दिली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणतां हरदू सरकारें येथील वतन करून तीर्थरूप कैलासवासी नानासाहेबीं तुह्मांस दिलें तें तुह्मांकडे चालत आहे, तेथें राहण्यास जागा मजबूद गढीची असावी याकरतां, व तुह्मीं एकनिष्ठपणें सेवा करीत आलेत, हें जाणोन, तुह्मांवर कृपाळु होऊन कसबे टेंभुर्णी येथें तुह्मीं गढी बांधली आहे, तिचे बंदिस्तीस खर्च लागला तो तुह्मींच लाविला, ते जागा गढीसुद्धां तुह्मांस बक्षीस दिल्ही असे, तरी तेथें शिबंदी वगैरे खर्च लागेल तो आपला लाऊन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें गढींत सुखरूप राहणें ह्मणोन. सनद १.

सीत सबैन मया व अलफ जिल्काद २२

येविशीं भोगवटियास. सनदा २.

( 810 ) The watans of Deshmukh & Deshkulkarṇi of Parganá Chimalge were attached. The result was that cultivation decreased and the Berads commenced their depredations in the country. No revenue was realized. The attachment was therefore ordered to be removed.

A. D. 1775-76.

( 811 ) Krishṇarao Rámchandra and Náro Ballál Bhuskute built at their own cost a fortified building for their residence at Tembhurṇi in Sarkar Hándiyá, as they held the watan of Sar Kángo and Sar Manḍaloi of the province. The building with the site on which it was built was granted to the family.

A. D. 1775-76.

१ कमाविसदार वर्तमान, भावी परगणे टेंभुर्णी यांस.

१ मोकदम कसबे टेंभुर्णी, परगणे मजकूर यांस.

२ ३

तीन सनदा. रसानगी यादी.

८१२–( २७५ ) अंताजी कृष्ण कमाविसदार, परगणे सिन्नर, यांस सनद कीं, परगणे मजकूरचे लावणी उगवणीस तुह्मी जमीदार जामीन घेत नाहीं, याजमुळें गांवगन्नाचे पाटील गैरहजीर होऊन बखेडा करून सरकार नुकसानी होत आहे हें ठीक नसे, तरी जमीदारांचा जिमा करून लावणी-उगवणी करणें; तें करीत नसल्यास हरदू वतनें सरकारांत जप्त करणें ह्मणोन. सनद १.

सीत सबैन मया व अलफ मोहरम १२

परवानगी रूबरू.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

८१३–( २९४ ) हिरोजी बिन तुकोजी हांडे देशमुख, सरकार जुन्नर यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं हुजूर येऊन अर्ज केला कीं, सरकार मजकूर येथील देशमुखीचें वतन संमंधें शिका व दस्कत आपले बाप तुकोजी हांडे यांचे नांवें चालत आहे. त्यास ते मृत्यु पावले. सबब आपले नांवें शिका व दस्कत चालतें केलें पाहिजे ह्मणोन; त्याजवरून तुमचे बाप तुकोजी हांडे यांचे नांवें देशमुखीचें वतन संबंधें शिका व दस्कत चालत आहे. त्यास ते मृत्यु पावले, सबब देशमुखीसंबंधें शिका व दस्कत तुमचे नांवें करार केलें असे, तरी मुदामतप्रमाणें सरकार मशारनिल्हेचे देशमुखीचे वतन संमंधें शिका व दस्कत करीत जाणें: मदरहू संमंधें तुह्मांकडे नजरेचे रुपये ५०० पांचशें रुपये करार केले असत. त्याचा भरणा सरकारांत करून जाब घेणें ह्मणोन छ. १५ रबिलाखर. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रबिलाखर १५

रसानगी यादी.

---

( 812 ) Antáji Krishna Kamávisdár of Pargaņá Sinner was informed that owing to his refusal to accept the Jamidárs as sureties for the cultivation of land and payment of revenue, the Páṭils of villages absented themselves from their villages, and loss of revenue had resulted thereby. He was therefore directed to ask them to stand security and to attach their watans if they declined to do so.

A. D. 1775-76.

## FROM JANÁRDAN APPÁJIS DIARY.

( 813 ) Tukoji Háṇḍe Deshmukh of Junner having died, his son Hiroji was permitted to use a seal bearing his name, and orders were issued accordingly to the village-officers.

A. D. 1775-76.

४ कारकून दिंमत मुसा जारज.

२ बापूजी बाबूराव.

२ खंडेराव यादव.

———

४

१० नारायणराव यादव भागवत.
५ मोरो राम दाभोळकर.
५ गोपाळ महादेव कारकून, निसबत दफ्तर.
४ केशवराव महादेव, माधवराव सदाशिव यांचे पुत्र.
५ दादो हरि मराठे.
५ भिकाजी विश्वनाथ, जकात प्रांत पुणें व जुन्नर.
५ चिंतामणराव सदाशिव, दिंमत गोविंदराव सदाशिव पागा.
२ जगन्नाथ रघुनाथ, निसबत कुरणें.
५ भिवराव भगवंत, दिंमत पीलखाना.
४ कृष्णाजी देवजी वकील, दिंमत नवाब.
९ हैबतराव गोपाळ वकील, दिंमत नवाब.
१ येशवंतराव मोरे माजी रायगडकरी, निसबत हुजूर हशम.
५ महादाजी बल्लाळ कारकून, निसबत दफ्तर.
१ नारायणजी गावडे शिलेदार.
९ गोविंद गणेश बिवलकर.
२ नारो बाबाजी फडके कारकून शिलेदार.
५ शिदोबा नाईक थत्ते.
५ नारो कृष्ण बरवे.
५ बाबूराव विश्वनाथ वैद्य.
५ रघुनाथ बाजी पागा.
५ सदाशिव भगवंत, दिंमत उष्ट्रखाना.
१ त्रिंबक मोरेश्वर, निसबत हुजूर हशम.
५ कृष्णाजी महादेव, नारो शिवदेव भाव्ये यांचे पुतणे.
५ नारो अनंत परचुरे कारकून, निसबत दफ्तर.
५ जनार्दन आपाजी.
५ सदाशिव मल्हार बावळे फडणीस, दिंमत तोफखाना.

५ मल्हारजी जगथाप सरनौबत, निसबत पागा, दिंमत बाबूराव निकम.

२ गोपाळराव जयवंत पानसी.

१५ निंबाजी महादेव काणे, दिंमत रघोजी भोसले सेनासाहेब सुभा.

३ बच्याजी विश्वनाथ खांडेकर शिलेदार.

३ खंडोजी जगथाप पागा.

४ नांवें लागलीं नाहींत.

---

२९१

तपशील.

६३ पोतेचाळ.

११८ दौलताबाद.

५४ चांदवड.

३३ मलकापुरी, दर रुपयास एक आणा बट्टाप्रमाणें.

१९ देडगांवी व करमले, दर रुपयास चव्वल बट्टाप्रमाणें.

४ बिणाचे.

---

२९१

---

१०३१

११४९ ( ९०६ )—शिमगा खर्च दशावतारी यांजकडून सरकारचे वाड्यांत शिमग्याचा खेळ सालगुदस्तां करविला, सबब बिदाई रसानगी यादी छ. २ माहे जिल्काद. आंख.

सीत समानीन मया व अलफ मोहरम १०

३० बाललिंग नाईक यास सन इसन्ने समानीनाप्रमाणें साल मजकुरीं. आंख ३०. बाळाजी अनंत केळकर कारकून शिलेदार गजनी सनंग ·।॰ एकूण.

३० लक्ष्मण गुरव सुपेकर यास एकसालां कापड. आंख ३०. बाळाजी अनंत केळकर कारकून शिलेदार सनगें एकूण. आंख.

---

( 1149 ) Rewards were paid to actors who acted the Ten Avatàrs in the Royal palace during the Shimgà festival.

A. D. 1785-86.

८॥ तिवट १
२१॥ गजनी ·।·
___ ___
३० १।

___ ___
६० १॥ॅ

११५० ( ९६६ ) कमावीसभेट राजश्री राव यांस, विजयादशमीस छ. ८ मोहरमीं सीमा उलंघन करून स्वारी वाड्यांत आलियावर सदरेस लोकांनीं नजरा केल्या ते जमा. रुपये.

समान समानीन मया व अलफ रबिलावल २९

६२३॥ मोहरा नाणे.

२ बाळाजी जनार्दन फडणीस.
१ बाजीराव गोविंद बर्वे.
१ त्रिंबकराव अमृतेश्वर पेठ्ये.
१ नारो निळकंठ मजमदार.
१ माधवराव मोरेश्वर पेठ्ये.
१ सर्वोत्तम शंकर हशमनीस.
१ नारायणराव यादव भागवत.
१ त्रिंबक महिपतराव चिटणीस.
१ वासुदेव रामकृष्ण.
१ मुसा जारज गाडदी.
५ भवानी शिवराम, तालुके अमदाबाद.
२ रघुनाथराव नारायण राजेबहाद्दर.
१ कृष्णराव हरि सुपेकर.
२ महिपतराव विश्वनाथ बिनीवाले.
१ रामराव नारायण देशमूख.
१ बाळकृष्ण केशव, तालुके पटा.
१ गोपाळ बल्लाळ केतकर, तालुके कावनई.
१ रामचंद्र शिवाजी पागा.
१ खंडेराव बल्लाळ, दिंमत शिवाजी शिवराम.

---

( 1150 ) This gives a list of the Sardárs who presented *Nazars* to the Peshwá on the Dasarā festival.
A. D. 1787-88.

१ गणपतराव जिवाजी सरसुभा, प्रांत कोंकण.
१ कृष्णराव नारायण जोशी सातारकर.
१ माधवराव रामचंद्र.
१ कृष्णराव बळवंत.
१ गोविंदराव बाजी जोशी.
१ निळकंठराव गोविंद लिमये.
१ माधवराव त्रिंबक दीक्षित पटवर्धन.
१ हरी बल्लाळ.
१ खंडेराव त्रिंबक ओढेकर.
१ राघो विश्वनाथ गोडबोले.
१ विठ्ठलराव नारायण अभ्यंकर नगरकर.
१ रामराव त्रिंबक, प्रांत जुन्नर.
१ शिवराम रघुनाथ, निसबत खासगी.
१ आनंदराव भिकाजी फडके.
१ कृष्णाजी बहिरव थत्ते.
१ रंगराव महादेव मेढेकर.
२ येशवंतराव गंगाधर.
१ रामराव अनंत बिवलकर.
२ नांवें लागलीं नाहीं ते असामी २.

४८

१८९ प्रत नाणें.

१० शेटशाई.
१ हल्ली शिका.
१ हैदराबादी.
२ आर्काटच्या.

१४

दर १३॥ प्रमाणें. रुपये.

१६८ प्रत पंचमेळ नाणें १२ एकूण दर १४ प्रमाणें रुपये.

७२ प्रत नाणें.

२ औरंगाबादी.
४ गैरसाळ.

---

६

दर १२ प्रमाणें. — रुपये.

३३ कित्ता नाणें.

१ नरहरची.
१ दिल्लीची गैरसाळ.
१ अमदाबादी गैरसाळ.

---

३

दर ११ प्रमाणें. — रुपये.

४० प्रत नाणें.

१ करोली.
१ सीली शिक्का अलीगौर गैरसाळ.
२ अजमेर गैरसाळ.

---

४

दर १० प्रमाणें. — रुपये.

१२१॥ प्रत जयनगर कोटे नाणें ९ दर १३॥ प्रमाणें. — रुपये.

---

६२३॥ — ४८

२२४॥।॑ पुतळ्या. — तोटें.

१ वासुदेव व्यंकटेश कारकून, निसबत पोतनीस.
१ सखाराम येशवंत पानसी.
२ गोविंद आनंदराव सुपेकर.
१ भास्कर महादेव कानिटकर.
१ सदाशिव शामराज आसवलीकर.
१ आनंदराव धुलप.
१ गुलजारखान टोके.
१ हरबाराव धुलप.
२ रामचंद्र नारायण, प्रांत पुणें.
१ जिवाजी बल्लाळ कारकून, निसबत चिटणीस.

१ हैबतराव पलांडे पागा.
१ विठ्ठल रामचंद्र आंबीकर.
१ अमृतराव विठ्ठल गोळे.
१ नारायण रघुनाथ पागा.
१ पांडुरंग नारायण पागा.
१ जयराम त्रिंबक सोमण.
१ मल्हारराव नरसी मांडवगणे.
१ गणपत आनंदराव.
१ भिकाजी नारायण पाळंदे.
१ महादाजी विठ्ठल शिंत्रे, प्रांत राजपुरी.
१ शिवाजी बाबाजी म्हसकर यांचे पुत्र.
१ गणपतराव चिंतामण ओंकार.
१ भगवंतराव बापूजी.
१ चिमाजी माणकर.
१ विसाजी नारायण वाडदेकर.
१ मळोजी पवार पागा.
१ बहिरजी मुळ्ये पागा.
१ निळकंठराव रामचंद्र.
१ व्यंकटराव भास्कर भाख्ये.
१ विसाजी गणेश वाघमारे पागा.
१ लक्ष्मणराव कोलटकर.
१ शिवराम लक्ष्मण कोटकर.
१ गोविंद राम आपटे,
१ नारो महादेव गद्रे यांचे पुत्र.
१ बळवंतराव महादेव भानू.
२ बाळाजी केशव थत्ते.
१ अमृतराव केशव थत्ते.
१ रघुनाथ केशव थत्ते.
१ शिदोबा नाईक थत्ते.
१ बळवंतराव नागनाथ पागा इंदापूरकर.
१ नारायणराव विश्वनाथ, दिंमत सरलष्कर.
१ जयवंतराव येशवंत पानसी.

१ भास्कर जगन्नाथ.
२ नांवें लागत नाहींत.

४९

४९ ताटें एकूणपन्नास वजन तोळे १३॥१॥ दर १६॥ प्रमाणें.
रुपये.

१२ होन नाणें.

१ राघो केशव नेने.
१ माधवराव त्रिंबक धायगुडे.
१ नांव लागत नाहीं.
० लंग.

३ रुपये.

८ एलोरी नाणें २ दर ४
४ हैदरी नाणें १ एकूण.

१२

३८२ नक्त रुपये.

५ भाईदास दिंमत राजे मांडवीकर.
३ रंगो कोन्हेर एकबोटे.
१ बापूजी आनंदराव मोकाशी.
५ विश्वासराव रघुनाथ, राघो बापूजी यांचे पुत्र.
५ विश्वासराव चिंतामण पागा.
२ केशव जयवंत पानसी.
५ बळवंतराव शंकर खांडेकर पागा.
५ खंडेराव दौलत.
२ बळवंतराव हरि डिंगणकर.
२ बळवंतराव नारायण केसकर.
५ केसो कृष्ण, दिंमत बाळाजी गोविंद बुंदेले.
१ मुसा आरज, गाडदी.
१ बाबूराव केशव ठाकूर.
१ त्रिंबक हरि वर्तक यांचे पुत्र.

५ दोयरीलो जोरज मुसा जारज यांचे लेक.
२ मुसा जारज यांचा छोटा लेक.
५ सर्वोत्तम शंकर यांचे पुत्र.
५ मीर मुस्तफाखान.
५ बळवंतराव, दिंमत भोंसले.
५ दाजी गोपाळ जोशी, गोपाळ महादेव यांचे पुत्र.
५ व्यंकटराव राम दाभोळकर.
५ लक्ष्मण बल्लाळ आठवले.
२ बापूशेट भालवणीकर.
५ काशीकर राजे यांजकडील वकील.
१ मल्हार अनंत माळी पुणेकर.
५ गोविंद भगवंत पिंगळे.
९ दिंमत नवाब निजामअल्लीखान रुपये.
    ५ रघोत्तम हैबतराव.
    ४ कृष्णराव देवाजी.
    ———
    ९

५ सदाशिव राम गुणे.
५ माधवराव कृष्ण गुणे.
२ जगन्नाथ धोंडदेव गुणे.
५ राघो निळकंठ पानसी.
५ विठ्ठल नारायण जोगळेकर.
५ येशवंतराव नरसी पागा.
५ विसाजी राम जोशी.
५ राघो हरि ओक.
५ नरसिंगराव भाट्ये.
२ देवबा नाईक रास्ते.
५ नारो कृष्ण यांचे पुत्र.
१ येशवंतराव मोरे हवालदार रायगडकर.
५ बाळाजी धोडपकर ५
५ गोपाळराव राम सातारकर.
१ लक्ष्मण शिवराम बागलाणकर.

५ खंडेराव शंकर भागवत.
५ खंडो अनंत वर्तक.
८ बहिरो अनंत कामरगांवकर.
२ महमद तकी पारसनीस.
५ गणेश हरि पेठ्ये.
५ गोविंदराव सदाशिव पागा.
८ जमीदार गुतीकर.
४ रामराव.
४ अहोबलराव.
——
८
२ निळकंठराव रामचंद्र पागा यांचे पुत्र.
४ गणपतराव माधव, माधवराव सदाशिव यांचे पुत्र.
५ गणपतराव व्यंकटेश कानिटकर.
१ गोविंदराव अच्युत.
५ भगवंतराव नारायण पारसनीस.
४ गोपाळराव भगवंत, निसबत पारसनीस.
५ जनार्दन आपाजी.
५ बाळाजी कृष्ण ठोसर.
२ नारो बाबाजी फडके.
५ त्रिंबकराव नारायण परचुरे.
५ विष्णुमहादेव, महादाजी बल्लाळ कारकून यांचे पुः
५ बाळाजी मोरेश्वर, निसबत जकात प्रांत पुणें.
५ दादो हरि मराठे.
५ कमळाकर, दिंमत बळवंतराव धोंडदेव.
५ वामनाजी हरि मराठे.
२ नारायण गाड्या.
५ जनार्दन गोपाळ खांडेकर.
४ राघो विश्वनाथ आठवले.
२९ ( नांवें लागलीं नाहींत. )
——
३१६

६६ भेट पैकीं नाणें तसलमातीस घेऊन नजर केली त्याचे नक्त रुपये आणून दिल्हे. रुपये.

५६ मोहोरांचे ऐवजीं नक्त रुपये.

१४ काशी बल्लाळ रानड्ये.

१४ खंडेराव नरहर कमावीसदार, परगणे शेवगांव.

१४ सदाशिव रघुनाथ गद्रे.

१४ महादाजी अनंत बेहेरे.

५६

१० पुतळ्यांचे ऐवजीं नक्त रुपये.

५ मोरो रामचंद्र परांजपे.

५ सोनो गणेश फडणीस, तालुके अमदाबाद.

१०

६६

३८२ रुपये.

७५ पोते चाल.

२२५ चांदवड.

६५ नाशीक मोल्हेर.

१५ दौलताबाद.

२ तांब्याचे.

३८२

१२४२।-

११५१ ( ११११ )—श्रीगणपति उत्साहखर्च भाद्रपद शुद्ध चतुर्थीचा, उत्साह प्रतिपदेपासून दशमीपर्यंत दहा दिवस जाला त्याची बिदाई देणें गोसावी व गवई व कळवंतिणी वगैरे गुणीजंन यांस, बाबत वांटणी. रसानगी यास ( द ? ) रुपये.

खमस तिसेन मया व अलफ जमादिलाखर २३

( 1151 ) The details of expenses incurred on account of the Ganapati festival celebrated from the 1st to the 10th of Bhádrapad Shudha are given. The chief items are:—

A. D.

२१५५ गोसावी हरदास.

१९५८ बरहुकूम गुदस्त असामीस १४५ रुपये.
१९७ जदीद सालमजकुरीं ३६ नवे आले त्यांस रुपये.

२१५५ १८१

३२९ गवई. रुपये.

३०१ बरहुकूम गुदस्त असामीस ३० रुपये.
२८ जदीद सालमजकुरीं नवे ९

३२९ ३९

१०२६ कळवंतिणी ताफे यांस रुपये.

८८६ बरहुकूम गुदस्त ताफे ३५ यांस रुपये.
१४० जाजती ताफे ८ आले त्यांस.

१०२६ ४३

१४८ गुरव पखवाजी यांस रुपये.

१२१ बरहुकूम गुदस्त २५ असामीस. रुपये.
२७ जदीद ८ आसामीस. रुपये.

१४८ ३३

३० ब्राह्मण चोपदार सोंगें घेऊन मखरापुढें उभे राहतात असामी २ बरहुकूम गुदस्त. रुपये.

३४ शागिर्दे गोसावी वगैरे यांस आमंत्रण करितात व लबा करितात सबब बरहुकूम गुदस्त ४ रुपये.

२४० वाजंत्री ताफे बरहुकूम गुदस्त वगैरे २५ रुपये.

३२ कर्णेकरी बरहुकूम गुदस्तं १९ यांस. रुपये.

| | Who appeared last year. | Amount paid. | Who appeared for the first time this year. | Amount paid. |
|---|---|---|---|---|
| Gosàvi preachers | 145 | 1958 | 36 | 197 |
| Singers, men | 30 | 301 | 9 | 28 |
| Singers women | 35 | 886 | 8 | 140 |
| Musicians | 25 | 121 | 8 | 27 |

The total cash expenditure was Rs. 4,175. In addition to this sum, clothes were presented to these persons.

१५५ किरकोळ असामीस.

८५ बरहुकूम गुदस्त ४ असामी.
७० जदीद सालमजकुरीं २ आले त्यांस

१५५ ६

२६ मिठाई शागिर्द पेशा वगैरे यांस. रुपये.

४१७५

११५२ ( ११२० )–विजयादशमीचे पोशाख सनगें, एकूण. आंख.

खमस तिसैन मया व अलफ जमादिलाखर २३

दिंमत हुजरात सनगें एकूण आंख.

२७३८३॥ श्रीमंत महाराज श्रीछत्रपती स्वामी यांस रवाना सातारा तसलमात महादजी जाधव व सटवाजी पिंजण खिजमतगार सनगें, एकूण.

९७६२ श्रीमंत महाराज राजश्री छत्रपती स्वामी यांस सनगें एकूण. आंख.
३२२४ मातुश्री आईसाहेब यांस सनगें एकूण. आंख.
१२३२८॥ सौभाग्यवती बाईसाहेब यांसी सनगें एकूण.. आंख.
५०९ महाराज यांचे पुत्र, वय वर्षे पावणेदोन यांस सनगें. आंख.
१२९३। कन्या महाराज यांच्या सनगें एकूण. आंख.
२३९। सौभाग्यवती जिजाबाई संतूबाई महाडीक यांची सून सनगें एकूण. आंख.

२७३५६ ४१॥≡

२७॥ बासनांस सनगें एकूण १॥- आंख.

२७३८३॥ ४३।′

७६०॥ रवाना सातारा तसलमात महादाजी जाधव, व सटवाजी पिंजण खिजमतगार सनगें एकूण. आंख.

---

( 1152 ) The details of clothes of honour presented to the Sátárá Rájá, the Sirdárs, Commandants and Agents of foreign powers on the Dasará festival are given. The total expenditure is Rs. 2,20,144. Clothes worth Rs, 31,267 were sent to the Sátárá Rájá for himself, his family and the people at his court.

A. D. 1794-95.

४०५॥ दिंमत नारायण दीक्षित ठकार सनगें एकूण. आंख ७

॥ बासनास खादी पासोडी सनंग ८२

४०५॥ ७८२

२५२॥। निळकंठ बाबूराव आमात्य सनगें एकूण. आंख.

१०२। रामचंद्र रघुनाथ पंडितराव सनगें एकूण. आंख.

७६०॥ १२॥।

६०७॥। दिंमत मंत्री तसलमात हैबती उगला खिजमतगार सनगें एकूण. आंख.

३०३॥। भास्करराव त्रिंबक रवाना इसलामपूर सनगें एकूण. आंख.

३०४ जयवंतराव रघुनाथ रवाना भिलवडी सनगें एकूण. आंख.

६०७॥। ७।

१२८३। दिंमत परशराम श्रीनिवास प्रतिनिधी सनगें एकूण. आंख.

११३१॥ रवाना कऱ्हाड तसलमात जोती जाधव, व खिजमतगार सनगें एकूण. आंख.

१५१॥। आनंदराव कृष्ण बापट, तर्फे कृष्णाजी उगला खिजमतगार सनंग एकूण. आंख.

१२८३। ९।~

The following are some of the details:—

Clothes worth Rs. To

9,762—the Rájá of Sátárá himself.
3,264—Ái sáheb.
12,328-8—the Báisáhebs.
509—Rájá's son.
1293-4—Ràjá's daughters 3.
239-4—Jijábái Mahádik.
405-8—Náráyan Dixit Takár.
252-12—Nilkanth Báburáo Amátya.
102-4—Rámchandra Raghunáth Panditrao.
303-12—Bháskarrao Trimbak Mantri.

६०३॥ दिंमत शंकरराव रघुनाथ सचिव, तर्फे खंडोजी भोंसला खिजमतगार सनगें एकूण. रवाना जेजुरी. आंख.

४४८ खासा सनगें एकूण. आंख.

१५३ राघो वेंकटेश फडणीस सनगें एकूण. आंख.

२॥ बासनास सनगें एकूण. आंख.

---

६०३॥ ५॥≈

१५१। भवानीशंकर हैबतराव राजाज्ञा, रखमाबाई तर्फे केदारजी ससाणा खिजमतगार सनगें एकूण. आंख.

२२५॥ जीवनराव विठ्ठल सुमंत, तर्फे भवानजी भोंसला खिजमतगार सनगें एकूण. आंख.

२५२॥ मल्हारराव राम चिटणीस, तसलमात दादजी मांजरा खिजमतगार, सनगें एकूण. आंख.

---

३१२६७॥। ८५॥।≈

---

304—Jayawantrao Raghunáth Mantri.
852—Parashrám Shriniváś Pratinidhi.
279-8—Antáji Wásudeo Mutálik.
151-12—Anandrao Krishṇa Bápaṭ.
603-8—Shankarrao Raghunáth Sachiv.
151-4—Bhuwáni Shankar. Haibatrao Rájádnyá.
225-8—Jiwanrao Viṭhal Sumant.
252-8—Malhárrao Ràm Chiṭṇis.

---

Rs. 31,267-12 Total.
Rs. 34,033-4—Cavalry officers.
79,703=8—Silledárs.
6,440——-Bhosle of Nágpur.
5,88812—Nawáb Nizám Alikhán.
249-8—Yeshwantrao Dábhaḍe.
2,470—Báḷáji Janàrdan Faḍnis.
697-4—Agent of Bundhlle.
255—Musá Jaraj.
202—Viṭhal Goraksh, Agent of the Portuguese of Goá.

पागानिहाय सनगें एकूण. आंख.
३४०३३। ३११-
किल्लेदार सनगें एकूण. आंख.
७९७०३॥ १२०५८-
किरकोळ सनगें एकूण. आंख.
४८११८॥। ३११॥=
रवाना आनंदवली, तर्फे विठोजी गवारी, व माणकोजी नवला खिजमतगार, सनगें एकूण. आंख.
१९६० राजश्री बाजीराव यांसी सनगें एकूण. ४॥ आंख.
१८२० राजश्री चिमणाजी आपा यांस सनगें एकूण. ३॥ आंख.
१२६३ राजश्री अमृतराव यांस सनगें एकूण. आंख.
८९२ खासा सनगें एकूण. ४॥ आंख.
३७१ विनायकराव पुत्र सनगें एकूण. ६॥। आंख.

१२६३
३४० सौभाग्यवती सत्यभामाबाई, अमृतराव यांची स्त्री, सनगें एकूण. २ आंख.
३९६॥ नाटकशाळा सनगें एकूण. आंख.
७० हेमंत सनगें एकूण. २ आंख.
६९॥ रूपकुवर सनगें एकूण. २ आंख.
६३ चंपक सनगें एकूण. २ आंख.
६७ मैना सनगें एकूण. २ आंख.
६४ बसंत सनगें एकूण. २ आंख.

600-12—Mr. Malet, agent of the English colony of Calcuttá.
249-8—Nurdi Husenkhán, in the service of the English of Calcuttá.
1,036-12—Artillery.
1,960— Bájiráo.
1,820— Chimnáji Appá.
1,263— Amrutrao.
340— Satyabhámábái.
396-8— Six dancing girls ( by name )

६३ उमेदा सनगें एकूण. २ आंख.

३९६॥ १२

१७७९॥ २८॥।

१०॥ बासनास सनगें एकूण. आंख.

५७९० २९।=

८३६ सौभाग्यवती भागिर्थीबाई पुणियांत आहेत त्यांस, तर्फे केदारजी येवला खिजमतगार सनगें एकूण. २ आंख.

६६२६ ३१।=

सनगें. गज.

२२०१४४।- २६४३८- १०।१

११५३—रोजकीर्द राजमंडळ स्वारी राजश्री पंतप्रधान सुरसन खमस तिसैन मया व अलफ छ. २३ जमादिलाखर यांत विजयादशमीचे पोशाख सनगें खर्च आहेत तीं.–

( अनुक्रमनंबर ११५२ चे लेखांकाचा हा कच्चा तपशील आहे. दोन्ही लेखांक एकच आहेत. )

३१२६७॥। दिंमत हुजुरांत सनगें एकूण. आंख.

९७६२ श्रीमंत महाराज राजश्री छत्रपती स्वामी.

३२२४ मातोश्री आईसाहेब.

१२३२८॥ सौभाग्यवती बाईसाहेब.

६९७२॥ वाडा पहिला.

५३५६ वाडा दुसरा.

१२३२८॥

५०९ महाराजांचे पुत्र, वय वर्षे १॥।.

१२९३। कन्या महाराजांच्या.

५६९॥। थोरलीस.

५९१॥ दुसरीस.

836— Lady Bhágirthibái.

Rs. 2,20,144 Total.

१३२ तिसरीस.

१२९३।

२३९। सौभाग्यवती जिजाबाई, संतूबाई महाडीक यांची सून.

२७॥ बासनास सनगें.

४०९॥ नारायण दीक्षित ठकार.

२०९ खासा. १९६ यज्ञेश्वर दीक्षित.

॥ बासनास.

२५२॥। निळकंठ बाबुराव आमात्य.

१०२। रामचंद्र रघुनाथ पंडितराव.

३०३॥। भास्करराव त्रिंबक मंत्री.

३०४ जयवंतराव रघुनाथ मंत्री.

८५२ परशराम श्रीनिवास प्रतिनिधी.

२७९॥ अंताजी वासुदेव मुतालीक, २७५॥ बासनास कापड, ४

१५१॥। आनंदराव कृष्ण बापट.

६०३॥ शंकरराव रघुनाथ सचिव.

४४८ खासा. १५३ राघो व्यंकटेश फडणीस.

२॥ बासनास.

४५०॥ १५३

१५१। भवानीशंकर हैबतराव राजाज्ञा.

२२५॥ जीवनराव विठ्ठल सुमंत.

२५२॥ मल्हारराव राम चिटणीस.

३१२६७॥।

३४०३३। पागानिहाय.

२०५ केसो महादेव.

२९८ पर्वतराव भापकर.

१२३। यादो शामराज.

१४५॥ मोरो विश्वनाथ.

३४७ राजजी फडतरे.

१४५॥ विश्वासराव चिंतामण.

४००॥ मुर्तजा माहात.

१२३ माणकोजी गावडे.
७५ सुभानराव गावडे.
२००। सखाजी काटे.
२४१ येशवंतराव देवकोत.
१४८।।। सग्याबा निंबाळकर.
१४७।।। गंगाधर गणेश.
२४९। लक्ष्मणसिंग.
१५१।। बाबुराव अनंत.
१२७। गंगाधर गोविंद.
२०० बळवंतराव नागनाथ वामोरीकर.
१००।। आनंदराव आईतोले.
१०१।।। जानराव आईतोले.
१०० रामचंद्र आईतोले.
२००।। गमाजी निंबाळकर.
१४६।। बिरोजी देवकोत.
१५१। तुकोजी आनंदराव.
१९९ चिमाजी जगताप.
२०२ धोंडो बल्लाळ गोखले.
७९ नागोजी वल्ये.
७७ देवीसिंग.
९८।।। हिरोजी शेळके.
९६ येशवंतराव येगील.
७३।। राघो बल्लाळ.
७७ रामराव भगवंत.
२४३।। दि।। सखाराम रामचंद्र, रामराव रघुनाथ यांचे पुत्र.

| | |
|---|---|
| ९८।। खासा. | ७२ खंडोजी पवार. |
| ७३ येशवंतराव शिंदे. | |
| १७१।। | ७२ |

२४३।।

७५॥ गोविंदराव कोकरे.
९६॥। भुजंगराव सावंत.
७५॥ आनंदराव घोरपडे.
७५॥ म्हसाजी शेडगे.
७४॥ गंगाजी येगील.
७४॥ भगवंतराव कृष्ण.
७४॥ केदारजी झांबर.
७६॥। बहिरजी सलगर.
७६॥। राणोजी रणनवरे.
७६। भिवजी काळे.
१०१॥ बहिरजी शितोळे.
७५। मल्हारजी लवटे.
७६॥ आबाजी लवटे.
७५॥ धुळाजी शेडगे.
१०२॥। काशीराव कोकरे.
१०२॥। जानराव खराडे.
१०४ मानाजी जगदळे.
१४८। विसाजी गणेश वागमारे.
३५०॥ निळकंठराव रामचंद्र.
२०३ अमृतराव गावडे.
२००॥। भुजंगराव गावडे.
२०० साबाजी निंबाळकर.
१९८ गोविंदराव सदाशिव.
१४७॥। जगन्नाथ रघुनाथ.
१५१॥ गोपाळराव बापूजी.
१००॥ राजाराम रघुनाथ.
२९५। हैबतसिंग.
२९२ कृष्णसिंग.
१५३॥ कान्हाजी खडक.
२९५। महिपतराव भवानी.
९८॥। खंडेराव बल्लाळ.
९९। आपाजी मल्हार, दिंमत रामचंद्र शिवाजी.

२९६। गणपतराव विष्णु.
१४९॥। मानसिंगराव जगताप.
१४९ परशराम महादेव कुंटे.
१९६। बळवंतराव मुंढे.
१४९। भिकाजी जनार्दन.
२०३ रामचंद्र इच्छाराम.
३६१॥ लक्ष्मण गंगाधर.
१९६ भैराळजी पायगुडे.
१९८॥ भास्कर जगन्नाथ.
२५२ सिद्धेश्वर महिपतराव.
३९४॥। दादू माहात.
१९९ गिरजाजी बर्गे.
१००॥ बापूजी बल्लाळ भावे.
१०१ सुभानजी चाबुकस्वार.
१०२ गोदाजी चाबुकस्वार.
३०३ जयेसिंगराव निकम सरनोबत.
१०२ चिमाजी पवार.
१०२ सखाराम चाबुकस्वार.
१२४। मिरजा कासब बेग सांडणी.
४८॥ मिया वल्लद माणीक मातदार.
११२९७॥। दिंमत दौलतराव शिंदे.
४१२८ खासा.
१८२३॥ मातोश्रीस.
४२४॥ बहिण.
४५९१॥ स्त्री सौ.
४२५॥ आबाजी रघुनाथ चिटणीस.
४०१ सदाशिव मल्हार.
२५२ बाळाजी लक्ष्मण.
३९२ बाळाजी अनंत.
२४८ सदाशिव बापूजी.
२४९ नारायणराव जिवाजी.
२५१। मोरो बल्लाळ.

३००॥ कृष्णाजी रघुनाथ.
२४८॥ हरि अबाजी चिटणीस.
१५०॥। माधवराव बाजी.
३०२॥। रामजी पाटील.
३००। रायाजी पाटील.
३०० कल्याणराव कवडे.
३०१ लाडोजी शितोळे.
२४९। हसनभाई.
९८॥ सखाराम.

११२९७॥।

३७२॥ मीरा महात.
१०१ घोडीं निसबत निळकंठराव जगताप.
१५०॥ घोडीं निसबत येशवंतराव त्रिंबक.
१४८॥ हैबतराव पलांडे.
१९७॥। विठ्ठलराव मल्हार, धोंडो मल्हार यांचे बंधु.
२९९॥। बाजीराव गोविंद बर्वे.
७७ घोडीं निसबत मलोजी पवार.
२०१५ दिंमत अली बहादर.

८११ समशेरबहादर.
७०४ मातोश्रीस.
४०० दोघी स्त्रियांस.
१०० कन्या.

२०१५

३४७॥ आबाजी गणेश.

१५२ खासा.
१९५। महादजी अनंत.
।। बासनास.

३४७॥

१७० बहिरजी मुळे.

३४०॥। दिंमत आनंदराव बाबर.

१९५ खासा. १४५॥ जैतोजी बंबर.

।।बासनांस.

---

१९५। १४५॥

---

३४०॥।

१४९ विठ्ठलराव निकम.

१५१ माधवराव मोईटे.

१४८ राजजी दिघे.

१४९॥। गणेश हरि, येसाजी हरि यांचे बंधु.

१२३४॥ निसबत चिंतामणराव पांडुरंग.

५९९ खासा.

१४७॥ गणेश बाजीराव.

२३९॥ जनार्दन अनंत.

१५० नारायण भिकाजी.

९८॥ मोघम पागा.

---

१२३४॥

१०८९॥ दिंमत परशराम रामचंद्र.

७८७॥ खासा.

३०२ हरि परशराम, पुत्र.

---

१०८९॥

५२० पांडुरंग कृष्ण गोडबोले.

१०० सटवोजी मांजरे.

१५० बळवंत सुभराव.

१९७॥। बळवंतराव नागनाथ कुगांवकर.

१५० अवधूतराव येशवंत.

१५४ हैबतराव शंकर.

७६० येशवंतराव तापकीर.

---

३४०३३।

७९७०३॥ शिलेदार सनगें. आंख.

५०४। दिंमत शिवराव पवार.

२५२॥ खासा.

२५१। धिरोजी पवार.

·॥· बासनास.

---

५०४।

२५० शेखमिरा वांईकर.

११०४॥ दिंमत पांडुरंग बाबूराव जोशी.

५०२ खासा.

३२० मातोश्री कमळजा बाई.

२७९ स्त्री सौ.

३॥ बासनांस.

---

११०४॥

७८९॥ तुकोजी पवार.

४०२ खासा.

२६२॥ मातोश्री गंगाबाई.

१२५ बाजी खंडेराव कारकून.

---

७८९॥

७४॥ संताजी यादव.

१२५॥ तुळसाजी पवार.

१०३ बळवंतराव चोपडे.

७७॥ नरसिंगराव रणदिवे, शंकराजी रणदिवे यांचे बंधु.

३०३ निळकंठ आबूराव जोशी.

३६०। मातुश्री लक्ष्मीबाई, बाबूराव सदाशिव जोशी यांची स्त्री.

८३०॥ दिंमत सदाशिव पवार.

४०७ खासा.

२९५॥ हैबतराव पवार.

१२८ रामकृष्ण विश्वनाथ, रावजी गंगाधर यांचे पुतणे.

---

८३०॥

१६१॥ दिंमत शेट्याजी पवार.
१०१। खासा.
६०। खंडोजी नलवडे.

४४३॥। दिंमत सुभानराव नाइक निंबाळकर.
२९४॥। खासा.
४८॥ जिवाजी गोविंद कारकून.
१००॥ बापूजी शंकर कारकून.

---

४४३॥।

४५५। कोकर मंडळी.
५१ बीवजी कोकर.
५०॥ गंगाजी पर्वतराव.
५० संताजी कोकर.
५०॥ कनकोजी कोकर.
५०॥। रामराव बिन सोनजी कोकर.
५०॥ मानाजी देवकोत.
५१ बाबाजी कोकरे.
५० म्हाळाजी भिसे.
५१। कृष्णाजी भिसे.

---

४५५।

३५१॥। दिंमत मानसिंग नाइक.
३०३। खासा.
४८॥ निंबाजी गोविंद कारकून.

---

३५१॥।

२७५६ दिंमत खंडेराव विठ्ठल.
७९९ खासा.
१७५५ नरसी खंडेराव पुत्र यास.
२०२ चिमणाजी खंडेराव.

---

२७५६

१७४ जगताप पणदरेकर.

९७॥ अभिमन्यराव जगताप.
७६॥ देवजी जगताप.

———

१७४

३४२॥। दिंमत खंडेराव जाधव भुईजकर.
२४४ खासा.
९८॥। सदाशिव भालचंद्र कारकून.

———

३४२॥।

३३९८ निसबत कृष्णराव बळवंत.
१२९६ खासा.
१०० नारो भिकाजी.
७५ काशिनाथ लक्ष्मण.
७५ विठ्ठल माणकेश्वर.
७३ रामचंद्र माणकेश्वर.
९८॥ हणमंतराव जाधव.
१२५। हैबतराव जाधव.
७६। मावजी जगताप.
७३। तायाजी सोळसकर.
७५। संभाजी घोलप.
१००॥ काशीबा घोलप.
१०१। लक्ष्मण भगवंत.
७६ पिराजी जगताप.
५२॥। शिवाजी गावडे.

———

२३९८

५२९॥। शिराळकर मंडळी.
७२। मल्हारराव.
७५। गोविंदराव शिराळकर.
४९॥ राजाराम लक्ष्मण.
५२॥। माणको व्यंकटेश.
५०॥। चिमणाजी बाबूराव.
५२॥ गंजबाजी यादव.

५०॥ मिताजी मद्ले.
४९॥ सठवाजी यादव.
७६॥। त्रिंबक महादेव शिराळकर.

५२९॥।

४४८॥ जाधव मीरवाडीकर.

१००॥ आनंदराव जाधव.
९९ रायाजी जाधव.
९९ जोत्याजी जाधव.
१५० जाधव मीरवाडीकर मोघम.

४४८॥

२०१ लुकमाजी यादव.
२९४॥। येशवंतराव यादव.
२००॥ महिपतराव थोरात.
५० गोविंदराव साळोखे.
१५१॥ आपाजी वर्गे.
१००॥। बाळाराम बेणीदास.
१०१॥। दुर्गोजी शिंदे.
१०० राजजी लभे.
७५॥। फतेखान जुन्नरकर.
१००॥ कृष्णाजी जाधव.
२५२ दिंमत रघुनाथ घाटगे.

२०१ खासा.
५१ आनंदराव जनार्दन कारकून.

२५२

१४४॥ परकाळे मंडळी.

७१॥ नरसिंगराव कृष्ण वाडदेकर.
७३ रखमाजी परकाळे.

१४४॥

२९९ गुचीकर.

१४८ रामराव नरसी.

१४७ नरसिंगराव आहोबळ यांस.

---

२९५

६९७॥। जाधव वाघोलीकर.

१९८॥। मळोजी जाधवराव.

२४९॥ जोत्याजी जाधवराव.

२४९॥ संभाजी जाधवराव.

---

६९७॥।

१०० भगवंतराव धुमाळ.

१००॥ नाइकजी धुमाळ.

११२६ रंगराव त्रिंबक राजेबहाद्दर.

३९८ खासा.

२२० चिराजरी निशाणास.

२५४। गोपाळराव त्रिंबक, बंधु.

२९३॥। माधवराव त्रिंबक, बंधु.

---

११२६

१७६॥ बढे मंडळी.

१०१ माणकोजी बढे.

७५॥ भगवंतराव बढे.

---

१७६॥

२७५ लेले मंडळी.

९९॥ बाबूराव अनंत.

१००॥ गणपतराव राम.

७५ नरसिंगराव शंकर.

---

२७५

१९९॥ शितोळे न्हावीकर.

१५० बनाजी शितोळे.

४९॥ मंबाजी शितोळे.

---

१९९॥

२५१। तुकोजी रविराव.

१०१ खासा.

७५ सखाराम रविराव, जानराव यांचे पुत्र.

७५। मानाजी रविराव.

———

२५१।

५४७॥। बारावकर मंडळी.

७४॥। महिपतराव.

७४॥। सर्जेराव.

१०० हणमंतराव.

७५। दौलतराव.

७२॥ आनंदराव.

७५। खंडेराव.

७५। विठ्ठलराव बारवकर, संताजी बारावकर यांचे पुत्र.

———

५४७॥।

५६२। शितोळे कुसेगांवकर.

१५०। हैबतराव शितोळे.

७५। अनसोजी शितोळे.

७५ अमृतराव शितोळे.

१००॥ दादजी शितोळे.

५० रघुनाथ शितोळे.

५१। गोविंदराव शितोळे.

६० यमाजी शितोळे.

———

५६२।

२९७ मीरखान टोके.

१४९ रणमस्तखान.

१४८ दावेदारखान.

———

२९७

२०३५। कारकून शिलेदार वाड्यांतील.

५०॥। गणेश सदाशिव.

१२५ रामचंद्र अनंत आवळसकर.
१५० सखो विश्वनाथ साने.
७६ भिकाजी महादेव जोशी.
५१ नारो कान्हो ठोसर.
२०३ मोरो विश्वनाथ माळ्ये.
५२ सदाशिव गणेश फाटक.
१०० कृष्णाजी नारायण लिमये.
७५ वामनाजी बल्लाळ दामले.
१०० विसाजी लक्ष्मण आपटे.
१०० भास्कर काशी जोशी.
१०० महादाजी धोंडदेव साठे.
५० बाळाजी कृष्ण बेहरे.
१०० भिकाजी कृष्ण आगाशे.
५२ रामचंद्र विश्वनाथ गोखले.
५२ शिवराम सदाशिव परांजपे.
९८ दिनकर बल्लाळ भडभडे.
३०० आबाजी बल्लाळ ठोसर.
१०४ गोविंद हरी बर्वे.
६२० विठ्ठलराम, निसबत वाकनीस.
७५॥ बाळाजी अनंत केळकर.
१२५ विसाजी राम बर्वे.
७५ बाजी बल्लाळ बेहरे.
२०१ रामचंद्र नारायण गोरे.

३०३५।

१५३॥ शितोळे अवसरीकर.
७६ बाबाजी शितोळे.
७७॥ लाडाजी शितोळे.

१५३॥

४९॥ बहिणाजी हेला.

५८२॥ निगडे मंडळी.
९१। खंडेराव निगडे.

९७॥ येशवंतराव निगडे.
९८। आनंदराव निगडे.
९५ परशराम महादेव कारकून.
२००॥ निगडे मंडळी मोघम.

५८२॥

१२८ हैबतराव गावडे.
३०२ राघोजीराव निंबाळकर.
१५८५। घोरपडे मंडळी.

७६॥ फत्तेसिंग घोरपडे.
९७। विठोजी घोरपडे.
१०२॥। शाहाजी घोरपडे.
१४६। बाळाजी घोरपडे.
७६। जोत्याजी घोरपडे.
७५। जनकोजी घोरपडे.
१०११ निसबत मालोजी घोरपडे.

६६६॥ खासा.
३४४॥ नारायणराव घोरपडे.

१०११

१५८५।

२९७। येळकर मंडळी.

९८॥ कुसाजी येळकर.
९८। निळकंठराव.
१००॥ खराजी येळकर.

२९७।

१७२९ दरेकर मंडळी.

८२७॥ हणमंतराव दरेकर.
३०४ जयसिंगराव.
३०१॥ सुमानराव.
२९६ रामराव दरेकर.

१७२९

५०० दोर्गे मंडळी मोघम.

२७६ निसबत पुरंधर.

१०१ निळकंठ बळवंत, कृष्णराव हरी यांचे पुतणे.

१७५ गोविंद आनंदराव सुपेकर.

———

२७६

१९५। सुपेकर.

९७॥ भगवंत खंडेराव

९७॥। आनंदराव गिरराव.

———

१९५।

१५२ भोंसले रांजणीकर.

१००। नरसिंगराव भोंसले.

५१॥। जोत्याजी भोंसले.

———

१५२

३४४॥। मोहिते सनगें.

१९५। हंबीरराव.

१४९॥ अवधूतराव.

———

३४४॥।

२५०॥ विश्वासराव लक्ष्मण.

२५४ आपाजी मोरे.

२०२ त्रिंबकजी भोंसले.

१५०॥ भाईदास दिंमत गुमानसिंग राजे मांडवीकर.

२९९ संभाजी राऊत.

१२३। बहिरराव जगताप.

२९४ जानराव नाइक निंबाळकर.

९६॥ दावलजी शितोळे

३००। बाजीराव पाटणकर.

२०३। तीर्थोजी जाधव, कुंभारगांवकर.

१२५॥। येशवंतराव निकम.

९८ रजबखान.

१२६ संताजी मोहिते.
३०० आनंदराव नाइक निंबाळकर.
१९५॥ गुलजारखान ठोके.
२७३॥ भगवंतसिंग बैस.
१४७॥ गणोजी शिर्के.
१५० नरसिंगराव गोविंद.
९७॥ बाबूराव दाभाडे.
२४९ जनाजी घाटगे.
१०१॥ अमरसिंग रजपूत.
३०३॥ जयरामराव पाटणकर.
१०१॥ रघुनाथ थोरात.
५२ विठ्ठलराव भंगे, चिंचोलीकर.
४०३ अमरसिंग जाधवराव.
१५१॥ सिदराम शिंदे.
१५२ मुकुंदराव पाटणकर.
३०४। महिपतराव घोरपडे.
३०३॥ बाळकृष्णराजे भोंसले.
२५३ शिवाजीराजे भोसले.
२९९॥ भगवंतराव कदम.
३०१॥। धारराव कदम.
१४५॥ मनाजी भापकर.
१७५ जानाजी ढमढेरे.
६५०। मानाजी शिंदे.
१५२ निळकंठराव मोहिते.
३९७ आबाजी बाजी घाटगे.
१४९॥। दत्तात्रय विठ्ठल रास्ते.
२४४ राघोजीराव पाटणकर.
३००॥ रघुनाथराव मोहिते.
२९५॥ नारायणराव पाटणकर.
९८। अमृतराव पासलकर.
२४५॥ आबाजी जाधव, अलशिवकर.
१४८ शिदोजी घोरपडे.

१०२ हकीमखान ठोके.
१९७॥ माधवराव भापकर.
३०४॥ आणगोजी नाइक निंबाळकर.
९६।।। बिंबाजी कामथे.
३०५॥ काशीराव रास्ते.
५५०॥ हिरोजीराव पाटणकर.
७५ आनंदराव मान्ये.
१९९ शाहामीरखान रोहिले.
१४८ दिनकर मल्हार कानिटकर.
१९८।।। जनकोजी माहाडीक.
५५१ दारकाजीराव पाटणकर.
३२७ कृष्णाजी नारायण जोशी.
१९२॥ लक्ष्मण नागनाथ.
२०१ श्रीनिवास नारायण कानिटकर.
१९९ गोविंदराव येशवंत कानिटकर.
१०१। येशवंतराव बारावकर.
४९८ रामचंद्रराव घोरपडे.
१५२ शेख शिराजुदीन.
१५३॥ गोपाळ धोंडदेव जळेगांवकर.
१५२।।। बाबुराव हरी.
१४५॥ व्यासराव अनंत, अंताजी माणकेश्वर यांचे पुत्र.
२००॥ नाइकजी राजे भोंसले.
१५० देवजी शिर्के.
१२६॥ नरसो तुकदेव.
१५३ मानाजी सलगर.
१००। माणिकराव धायगुडे.
१००॥ बहिरो मुकुंद.
१५०। दावलजी निंबाळकर.
९७॥ बहिरजी बोधे.
५० आनंदराव बेर्गे.
५२॥ घनःशाम थोरात.
१४९ बलवंतराव कदम.

१५१ केसो कृष्ण दातार.
३९९ साबाजी नाइक निंबाळकर.
२०३ अमृतराव भोंसले.
५०||| हरजी ढमढेरे.
९७ येशवंतराव भिकाजी सुळ.
१०२| माधवराव मुळे.
५० मिताजी सरकस.
९७ वैजोजी जगताप.
१०१|| पिलाजी ताकपीर.
१००|| तानाजी तापकीर.
७६| आनंदराव जगताप, मोरगांवकर.
१५२ राघो विश्वनाथ गोडबोले.
४८||| हैबतराव मोहिते.
१०१ हैबतराव खताल.
७३| खंडेराव गौळी.
७८|| पिलाजी कदम, गिरवीकर.
७७ गोविंदराव मोरे.
९५||| शहाजी खलाटे.
९७||| संताजी रणदिवे.
७३||| मकाजी काकडे.
७६ आनंदराव निकम.
२९४|| चंदरराव पवार.
२९८||| मल्हारराव पवार.
४०३ खंडेराव त्रिंबकराव वाडेकर.
७६ बाजी जगथाप.
१०२ माणकोजी साठे.
९८| महमद सुलतान मावळे, जुन्नरकर.
१०१|| रामचंद्र गाईकवाड.
४८ सयाजी बेर्गे.
१९७||| मेघःशामराव नागनाथ.
१००|| विठ्ठलराव नागनाथ.
७५||| गोपाळसिंग गौतम.

९९ रघुनाथ जाधव.
२४५॥ नरसिंगराव शिंदे.
२५०॥। सटवाजी शितोळे.
९५। येशवंतराव बारावकर.
१४६। दाजी भोइटे.
७४। जानराव घाटगे.
२४४। भिवराव जाधव.
७५ मल्हारराव निगडे.
१९९। येशवंतराव शिंदे.
२०१। हटेसिंग हौस.
२५१ गोविंदराव काकडे.
१००॥ हणमंतराव घोरपडे.
१००॥ हैबतराव लेभे.
१२९ अमृतराव काकडे.
७६॥। सुभानराव माने.
१५०॥ राघोजी कदम.
१००॥ सदाशिव जाधव.
७५। हैबतराव जाधव.
७५॥। अमोजी चव्हाण.
१०३॥। रघुनाथराव शिंदे.
१०१॥ वेंकटराव चव्हाण.
७५। आनंदराव शिंदे.
१०१ सटवाजी घोरपडे.
७५॥। भिवराव ताळे.
९८। महमदअली कडपेकर.
१०० सैद हैदर.
१०२॥। मिर्जा मोगलबेग.
१०१ गंगाजी बाबर.
१००॥। आनंदराव सखाराम.
१०१। दौलतराव सोमवंशी.
१०१। मल्हारराव सोमवंशी.
७४। खान महमद नगरकर.

९९॥। येशवंतराव मसाले.
९८। सुभानराव निंबाळकर.
७५। गंगाजी नलगे.
७३॥। मुलतानजी निंबाळकर.
१०१ दारकोजी निंबाळकर.
७४॥। वेंकटराव थोरात.
१०४ महिपतराव मालसीकारे.
१००॥। बहिरजी नलगे.
९९ सदाशिव येशवंत खंडाळकर.
५९॥ पर्वतराव मान्ये.
७४॥। कादरदादखान, निसबत फाजल अलिबेग.
९८। कृष्णाजी तांटे.
७४॥। धोंडजी शिंदे.
७६॥ लक्ष्मणराव येशवंत.
९५। हणमंतराव निंबाळकर.
१२५ रस्तुमराव जाधव, सिंदखेडकर.
७५ खंडेराव गाडे.
१०१ बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे.
१५२ चिंतो रामचंद्र लिमये.
७६॥ सर्जेराव खलाटे.
७५ गोविंदराव सूर्यवंशी.
९६ नारायणराव गोविंद.
७३॥ कृष्णराव जाधव, शिंदखेडकर.
९६॥ होनाजी चवाण, आटपाडीकर.
९८ मुरारराव चवाण.
३०८ गणपतराव कान्हेरे, कुरुंदवाडकर.
६९५। दिंमत रघुनाथराव निळकंठ.

५९७ खासा.

९८। विसाजी नारायण वाडवेकर.

---

६९५।

१४८। विठ्ठलराव पुरुषोत्तम मंगळवेढेकर.

१५०॥ विष्णु लक्ष्मण मंगळवेढेकर.
१५१॥। मोरो श्रीपत, श्रीपतराव मोरेश्वर यांचे पुत्र.
३००। माधवराव गंगाधर, गंगाधर गोविंद यांचे पुत्र.
२०० काशीराव खंडागळे.
७५ विठूजी भालेराव.
७४॥। दाजी रामचंद्र.
१५२ खंडेराव दौलत.
७३॥ सामाजी गायकवाड.
७२। सुभानराव शेळके.
१४९ बळवंतराव आंबीकर.
९९॥। खंडेराव रणसिंग.
१०१। विष्णु धोंडदेव गुण्ये.
२५० विठ्ठल धोंडदेव.
१७७॥ दुर्गोजी शिंदे.
१००॥। जोत्याजी फडतरे.
१२४ बहिरजी शिरके.
४१८। विठोजी चव्हाण हिंमतबहादर.

२९७॥ खासा.
१२०॥। जानराव चव्हाण, पुत्र.

४१८।

४५६॥ दौलतराव घारगे. कितुरकर.

२०३॥ खासा.
१२७. विश्वासराव घार्गे.
१२६ पिराजी घार्गे.

४५६॥

१२६ येशवंतराव परळीकर.
१४५। रामजी भोईटे, आरडगांवकर.
१७१ पिराजी सर्जेराव घाटगे, कागलकर.
२९४॥। निळकंठराव शिंदे, मनोळीकर.
८५७ थोरात गोठखडीकर.

२०५॥ कृष्णाजी थोरात.
२०० परशराम थोरात.
१५१॥ खंडेराव थोरात.
७५ केदारराव थोरात.
१२४॥ मुराररराव थोरात.
१००॥ बापूजी थोरात.

८५७

६०१ पाटणकर.

२०० बहिरराव पाटणकर.
२०० जोत्याजीराव पाटणकर.
२०१ मानसिंगराव पाटणकर.

६०१

१०० व्यंकटराव भापकर.
२०२ येशवंतराव बिन कृष्णाजी थोरात.
२०२ बहिरराव भापकर.
२७८॥ जबरखान सावनूरकर.
९७। हरबाजी नरसी घायगुडे.
५९२॥ निंबाळकर आकलुंजकर.

२९१॥ गिरजोजी नाइक.
३०१ मालोजी नाइक.

५९२॥

७५॥ हणमंतराव मोरे कापळेकर.
१२२ वेंकटराव चव्हाण, विठोजी चव्हाण हिंमतबहाद्दर यांचे पुत्र.
९०४॥ दौलतराव हिंदुराव घोरपडे.

६०४ खासा.
३००॥ संभाजी, हिंदुराव पुत्र.

९०४॥

२९५॥ शिदोजी हिंदुराव, दौलतराव यांचे पुतणे.
४०३ घोरपडे कापशीकर.
२०१ मानसिंगराव.
२०२ जीवनराव.

---

४०३

३३०। जीवनराव निंबाळकर.
२४४॥ त्रिंबकराव गंगाधर रेटरेकर.
१४८ रामचंद्र माधव, माधवराव गंगाधर रेटरेकर यांचे पुत्र.
९९। हैबतराव गावडे.
४८॥। बाबूराव बर्गे.
५०॥ बहिणाजी झरेकर.
२४२॥। रुस्तुमराव पांडरे शरफजमुलुक, दिंमत फत्तेसिंग भोंसले
३५१ गणपतराव आनंदराव मेहेंदळे.
१२४॥ त्रिंबकराव बांडे.
१४५ येशवंतराव बांडे.
३०५ जोगोजी घाटगे.
२४४॥ शंभूसिंग जाधवराव.
९४॥ साबाजी जानकर.
१२३ महमदसाहेब जुदीन.
३०२ महादजी शितोळे मांजरीकर.
७३॥ सर्ज्येराव जगताप.
७५ जानराव जगताप.
७३॥। हैबतराव साजप.
९८॥। त्रिंबकराव ढगे.
७६ उदाजी भोंसले.
७४ निंबाजी जगताप.
१५१ मानसिंग मान्ये, म्हसवडकर.
९८॥। गोपाळ शिवराव कडेकर.
७८ विठोजी खळदकर.
९९ संताजी साळोंखे.
५० नरसिंगराव ताळो.

७४॥ रामचंद्र गोपाळ.
७५। दर्याजी काळे कोल्हारकर.
४८॥। सुभानराव सुल, मलोजी सुल यांचे पुत्र.
९६ चंद्रराव रणसिंग.
५१॥ कृष्णाजी हरफळे, चिमाजी हरफळे यांचे पुत्र.
७३॥ जानराव लांबखंडे.
७५। माधवराव काळे, घोडेगांवकर.
१००। संताजी तांटे.
७५ येसाजी बाबूराव.
१५१ मिर्जा मानुकबेग.
७४॥ आत्माजीराव सर्वे.
७६॥ बगाजी चिंतामण बेहरे.
२५५ चवाण निंबगांवकर.
५१॥। लक्ष्मणराव चवाण, माधवराव यांचे पुत्र.
१०२। कृष्णाजी चवाण, रघुनाथ चवाण यांचे पुत्र.
१०१ आबाजी चवाण.

---

२५५

९९ संताजी बीन सखोजी निंबाळकर.
१५१। परशराम घाटगे.
७५ नारायणराव सावंत, दानवाडकर.
१०१॥ अनसाजी रणदिवे.
७६॥ आनंदराव नारायण उखाडेकर.
१०१। मुकुंदराव चवाण.
१०१॥ आपाजी चवाण.
९९ आबाजी जाधव वाडीकर.
७९ रामचंद्र विश्वनाथ, विसाजी बल्लाळ कारकून निसबत वाडीकर यांचे पुत्र.
७५ चापाजी गाईकवाड.
४७॥। अमृतराव कदम.
७५ भिवाजी काळे.
७७ मानाजी काळे.

१०१॥। शिदोजी बाबर.
७३ जीवनराव नरसी चिकोडीकर.
१०३॥ खत्रोजी वाग, विरजी वाग यांचे पुत्र.
९४ बाळाजी नाइक सायना.
७७ हैबतराव झरेकर.
७४॥। गोपाळराव रामचंद्र घोरपडे.
७३॥। महिपतराव चवाण.
७५॥। जनार्दन गोविंद कारकून शिलेदार.
१०२॥ वेंकटराव काळे.
९६ सटवाजी धायभर.
१५०॥ बाळाजी काशी कात्रे.
२९६॥। माधवराव रामचंद्र.
७३॥। सुभानजी रायनांदे.
७८ रामराव गोपाळ.
१०० खंडेराव निळकंठ रास्ते.
२९८ रघुनाथराव निळकंठ, धोंडो दत्तात्रय यांचे नातू.
१९८॥ सखाजी शिर्के.
१०१। विठोजी सुर्वे.
१०२ तुकाजी कदम, नागोजी कदम यांचे पुत्र.
६९८॥ गंगाधरराव भिकाजी रास्ते, दिंमत आनंदाराव भिकाजी रास्ते.
    ३९५॥ खासा.
    ३०३ व्यंकटराव गंगाधर, पुत्र.
    ———
    ६९८॥
९५॥ कृष्णाजी अनंत कारकून, दिंमत आनंदराव भिकाजी रास्ते.
९८॥। लक्ष्मणराव डफळे.
७५ कृष्णराव पाटणकर.
७२ नागोजी इदलकर.
७७॥ बळवंतराव होगळे, बाजीराव होगळे यांचे पुत्र.
१४९॥ लक्ष्मणराव ढमढेरे.
७१॥ त्रिंबकराव सानप.

१२५ जगन्नाथ लक्ष्मण मेहेंदळे.
१००॥ त्रिंबक सोनदेव.
५०० गेये, लवये, जलगे वगैरे गायकवाड मंडळी.
७८ वाघोजी शिर्के.
१००॥ लक्ष्मण गिधड, गिधडमंडळी.
१५० मोठे मर्दनें पंचभाई.
१५२ मिर्जा अस्कर अलीबेग.
६० जानराव होगले.
५०। निंबाजी भोइटे.
५०। नरसिंगराव भोइटे.
६० हणमंतराव अदमणे.
६१। पुरुषोत्तमराव सदाशिव.
१९४। बळवंतराव काशी, काशी बल्लाळ यांचे पुत्र.
१९१ विष्णु रघुनाथ पानसी.
५९॥। मेघःशाम आनंदराव परींचकर.
१०० गणपतराव बर्गे.
१५० मनोहर भगवंत.
७६॥। कृष्णाजी जनार्दन, जानो बाबूराव यांचे पुत्र.
७५ मालजी पवार.
७२॥ रत्नोजी नाग टिळक.
७६। सुलतानजी मान्ये.
७५ हैबतराव भापकर.
७५। फिरंगोजी कदम.
२९३। येशवंतराव गंगाधर.
९९ भास्करराव गणेश.
१५० लक्ष्मण रामचंद्र पुरंदरे.
१५० भिवराव खंडेराव.
२०५ मीर सफीउलाखान त्रिंबककर.
१०० आनंदराव लक्ष्मण पुरंदरे.
१२७ महादाजी विठ्ठल, दिंमत त्रिंबकराव अमृतेश्वर.
१००॥ दत्ताजी भोपते.
१५० गंगाधर शंकर पुरंदरे.

१२६ मोरो सदाशिव साठे.
९९॥। बहिरजी काळे.
२००॥ येशवंतराव काळे.
५१ दिंमत बहिरजी काळे--( नांव दाखल नाहीं )
६०॥ निंबाजी शिराळे.
९७ बळवंतराव काळे.
१०० माल शिकारे कुवेगांवकर.
१२३ विश्वासराव नारायण भावे.
२७५ शेखअबदुल कडपेकर.
१०१॥ पांडुरंग गिरमाजी.
२५३। खंडेराव घोरपडे.
२४९॥। राघोजी लांबहाते.
१२१॥। मायाजी शिळिमकर यांचे पुत्र.

———

७९७०३॥

किरकोळ सनगें.

६४४० दिंमत भोंसले, रवाना नागपूर.

१६६० रघोजी भोंसले खासा.
२५०३ परसोजी भोंसले.
३५२ भवानी काळे.
९ बासनांस कापड.
१९१६ व्यंकाजी भोंसले.

१५६४ खासा.
३४६॥ श्रीधर लक्ष्मण.
५॥ बासनांस कापड.

———

१९१६

———

६४४०

१२६॥। बाबूराव कृष्ण किल्ले सातारा.
२०२॥। कृष्णाजी अनंत.
१५६। बाबूराव विश्वनाथ वैद्य रवाना नागपूर.

५८८८॥। दिंमत नवाब निजामअल्लीखान.

११२७॥ मौजुद्दौले रवाना भागानगर.

१०१ कृष्णाजी देवजी.

२१२१॥ रेणोराव धोंडाजी रायराया.

१०६७ खासा.

१०५४॥ पुत्र.

---

२१२१॥

२०३४॥ मीर अलम.

११२६ खासा.

९०८॥ पुत्र.

---

२०३४॥

२४९॥ रघोत्तम हैबतराव.

२५४॥। बाबूराव वकील.

---

५८८८॥।

५०। विठ्ठल हरी.

३८१८॥ मिरजा मुजफरबख्त शाहाजादे.

८३५ नबाब अकबर अल्लीखान.

२४९॥ येशवंतराव दाभाडे.

१३७८ इतमातदौले, गाजद्दीनखान यांचे पुत्र.

१२०८ उमदाबेगम.

८०९॥ दिंमत भोंसले.

४०१॥ कृष्णराव माधव.

१४५ रामचंद्र दादो.

१०२ बाळाजी शिवदेव.

१०३॥ अमृतराव.

५७॥ उदाजी नाइक.

---

८०९॥

४४० बापूजी आबाजी वासरे.

२४७० बाळाजी जनार्दन फडणीस.
१९८॥ गोविंद बाजी जोशी.
२४८॥ गोपाळराव राम.
१५२ त्रिंबक जयराम, जयराम कृष्ण बापट यांचे पुत्र.
७६। महादशेट वीरकर.
२८६। काशी बल्लाळ, निसबत गाडदी.
१८९ खासा.
९७। सेख सुलतान सेख लाल गाडदी.

---

२८६।

११२० चिंतामण हरी फडके.
७५॥। अंताजी बापूजी.
७६॥। रामशेट बिन हरशेट वीरकर.
६९७। वकील निसबत बुंदेले.
२९६॥ पृथ्वीसिंग.
२४८। भवानीसिंग, पृथ्वीसिंग यांचे पुत्र.
१५२॥ मानसिंग.

---

६९७।

१०० जनार्दन गोविंद खिजमतराव.
११५३॥ महाराव जसवंत निंबाळकर.
२४४॥। रामचंद्र आबाजी वानवळे.
२५५ मुसानारज.
९०० मुलें वाड्यांतील.
१९९॥। गोविंदसिंग.
३०२। त्रिंबकसिंग.
१९७ बहिरसिंग.
२०१ महिपतसिंग.

---

९००

१०१॥ रामचंद्र कृष्ण रिसबूड, आदवानीकर.
२४८॥। येशवंतराव महादेव नगरकर.

१४८ नारो बाबूराव वैद्य.
१५० गोविंदा जेठी.
१४७ मिना जेठी.
९९। तिमा जेठी.
१५१॥ गोविंदराव माणकर.
१२६॥। येशवंतराव नरगुंदकर.
२०२ विठ्ठल गोरक्ष वकील गोवेकर.
६००॥। मिस्तर मालीट वकील, निसबत इंग्रज कलकत्तेकर.
२४९॥ नुरदी हुसेनखान, निसबत इंग्रज कलकत्तेकर.
७४॥। वकील दिंमत जाबितजंग.
१०० गिरमाजी विठ्ठल, निसबत खंदारकर.
२२०॥। वकील निसबत जमातदार.

१४६ गंगाधर नरहर.
७४॥। बाळाजी व्यंकटेश.

२२०॥।

१९५ सदाशिव नाइक वानवळे.
१०३६॥। दिंमत तोफखाना.

१९५ माधवराव कृष्ण.
२९७॥। सखाराम येशवंत.
२०२ भिवराव जयवंत.
३४२ सैदहुसेन गोलंदाज.

१०३६॥।

२४६॥ सुभानराव वकील सुरापूर.
१५३ नावाजी गौळी, निसबत गोविंदराव गाईकवाड.
१७७ वकील अलफसदन कर्नाळेकर.

९९। रामचंद्र दादो.
७७॥। कृष्णराव सुंदर.

१७७

६४८। महात दिंमत पीलखाना.

१०० गुजर वल्लद दलेल.

७५॥। लालण वल्लद शेख महंमद.

२५०॥ बाळा वल्लद छट्टु.

१२२ मिया वल्लद मदार.

१०० हुसेन वल्लद इभ्राम.

---

६४८।

७५॥। शेषो मेलगीर वकील संस्थान गदवाळ.

९९ हणमंतराव सभापत.

१००। विनायक नारायण परांजपे.

३७० मनाजी सिंदो.

७०४। दिंमत पीलखाना, निसबत अली महात.

५०१॥। खासा.

२०२॥ मिया वल्लद मुर्तुजा.

---

७०४।

१०१॥ दीनानाथजी काशीकर.

६० सौभाग्यवती उमाबाई जोशीण.

९८। बाळकृष्ण लक्ष्मण वैद्य निसबत मानाजी आंग्रे.

७५॥। सिनापा तोडमरीकर.

१५०॥। सदाशिव अनंत बेहेरे कारकून निसबत दप्तर.

२०२ सैद महंमद गाडदी.

७६॥। भवानी लक्ष्मण निसबत चंदरराव.

६७॥। लाला सीताराम ईभ्राम वकील कर्नाळेकर.

७१॥ आपाजी जाखदेव निसबत तुकोजी होळकर.

१५१॥ भालदार.

७६॥ मदन वल्लद रस्तुम.

७५ हसन वल्लद भीकन.

---

१५१॥

१७२ परशराम सिंपी.

१६० सखाजी घोडका.

२५० पीर महंमद.

५२० अबदुल रहिमान वल्लद शेख अहंमद कारीगार औरंगाबादकर.

६९२५ खिजमतगार.

| | |
|---|---|
| २६२ भवानजी नाईक. | १५१ केदारजी येवला. |
| ६६० जानोजी जाबक. | १९८ जानोजी चवाण. |
| ३०० खंडोजी पणदरा. | ८१६ हणमंता टिळेकर. |
| २६२ बाबाजी पडवळ. | २०० येसाजी जाधव. |
| २६२ येसाजी शेटगा. | २०० जिवाजी काटकर. |
| २२३ भवानजी मेमाणा. | ४५० रायाजी वाघमारा. |
| २६० पिलाजी पानसरा. | ६९५ लक्ष्मण मान्या. |
| २४० संभाजी सिंदा. | २८० कृष्णाजी उगला. |
| १८८ तानाजी पडवळ. | २६८ बाळोजी वळसा. |
| २८२ जोगोजी जगदळा. | २२६ दत्ताजी आढाव. |
| २६२ रामजी बेकराळ. | २४० हैबती जरंडा. |

६९२५

२५३६ चोपदार.

५२० भवानी वल्लद नंदराम.

५०८ तुकाराम वल्लद नंदराम.

२८२ घासी वा॥ बुद्दु.

३०२ महासिंग वल्लद मदनसिंग.

२६६॥ मखु वल्लद शेख फरीद.

६५७॥ जगंनाथ वल्लद मदन.

२५३६

७७ परशराम पवारसिंग पोर्गा.

३३९ निसबत खासजी लिंब.

१८५ संभाजी धायरीकर.

१५४ तुकाजी साळोखा.

३३९

४८११८॥

रवाना आनंदवलीस.

१९६० राजश्री बाजीराव.

१८२० राजश्री चिमाजी आपा.

१२६३ राजश्री अमृतराव.

३४० सौभाग्यवती सत्यभामाबाई.

३९६॥ नाटकशाळा.

| | |
|---|---|
| ७० हेमंत. | ६७ मैना. |
| ६९॥ रूपकुवर. | ६४ बसवंत. |
| ६३ चंपक. | ६३ उमेदा. |

३९६॥

१०॥ बासनास सनगें.

८३६ सौभाग्यवती भागिर्थीबाई.

६६२६

२२०१४४।-

## २२ शहर पुणें, व पेठा.

११५४ ( ४ )—पेठ सदाशिव कसबे पुणें तुम्हांकडे होती त्यास नारायण पेठेंत वस्तीस दाटी जहाली, सबब पेठ बचो विश्वनाथ यांजकडे देविली असे तरी मशारनिल्हेचे हवालीं करणें म्हणोन, बाळाजी कृष्ण यांसी.

अर्बा सबैन मया व अलफ रजब ६

सनद १.

रसानगी यादी.

११५५ ( ५ )—पेठ रविवार कसबे पुणें प्रांत मजकूर येथील कमावीस पेशजींचे कमावीसदारांकडन दूर करून सालमजकुरापासून तागाईत सन समान सबैन पांच साला मामलत तुम्हांकडे मक्तियानें सांगितली, तरी इमानें इतबारें वर्तोन अंमल चवकशीनें करणें, मक्ता दरसाल रुपये.

अर्बा सबैन मया व अलफ रजब ९

---

XXII Poona and its suburbs.

( 1154 ) There is an allusion in this sanad to Náráyaṇ Peṭh of Poona being overcrowded.
A. D. 1773-74.

( 1155 ) The kamâvis of Peṭh Raviwár of Poona was farmed out to Anandráo Káshi for Rs. 11,800 annually, from which Rs. 888-8-0 was to be deducted on account of establishment expenses.
A. D. 1773-74.

९७९८८८- बरहुकुम गुदस्त सन सलास सबैन आकार रुपये.

५१३०॥ पेठ.

४६६७॥- शिवाय जमा.

---

९७९८८-

२००१॥।= जास्ती चढ

---

११८००

एकूण अकरा हजार आठशें रुपये दरसाल जमा मक्ता. पैकीं वजा महाल मजकूर वगैरे नेमणूक. रुपये.

६३५ महाल मजकूर पेशजींप्रमाणें.

२०० कमावीसदार.

१०० परशराम शेटचा.

१०० कुळकर्णी.

२३५ शिबंदी प्यादे असामी ८ दरमहा रुपये २५ प्रमाणें अकरमाही.

---

६३५

५३॥ माफ साऱ्याबद्दल सालगुदस्तप्रमाणें रुपये.

४७॥ फकीरचंद सराफ दिंमत त्रिंबक सदाशिव पुरंदरे यांचे घराबद्दल.

६ विसोबा नाईक दुकानाबद्दल.

---

५३॥

२०० गैर सनदी माजी कमावीसदारास सन सबैनांत मजुरा दिल्हे आहेत त्याप्रमाणें.

---

८८८॥

एकूण आठशें साडेअठ्यायाशीं रुपये दरसालची नेमणूक वजा होऊन बाकी १०९११॥ रुपये.

यास हप्तेबंदी सुद्धां १

| | | | |
|---|---|---|---|
| १००० | आषाढ. | ९०० | अश्विन. |
| १००० | श्रावण. | ९०० | कार्तिक. |
| ९०० | भाद्रपद. | ९०० | मार्गशीर्ष. |

| | | | |
|---|---|---|---|
| ९०० | पौष. | ९०० | चैत्र. |
| ९०० | माघ. | ९०० | वैशाख. |
| ९०० | फाल्गुन. | ८११॥ | जेष्ठ. |

१०९११॥

एकूण दहा हजार नऊशें साडेअकरा रुपये सदरहू हप्तेबंदीप्रमाणें साल बसाल सरकारांत भरणा करून पावल्याचा जाब घेत जाणें. रयतीवर जाजती जलेल करूं नये. माजी कमावीसदारांचे रीतीप्रमाणें अमल करणें ह्मणोन, आनंदराव काशी यांचे नांवें.

सनद १.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

११५६ ( १०२ )—भोज्या शिंदा यांचें घर पेठ शुक्रवार, शहर पुणें येथें आहे, तेथील मोरी कोतवालीकडून बांधली त्याचा आकार रुपये ७ सात रुपये शिंदा मजकूर यास माफ केले असेत, तरी कोतवाली शहर पुणें येथील हिशेबीं खर्च लिहिणें ह्मणोन, धोंडो बाबाजी कोतवाल शहर पुणें यांचे नांवें. छ. २२ रजब.

खमस सबैन मया व अलफ. रमजान २९

सनद.

रसानगी यादी.

११५७ ( ६१२ )—३ छ. ३० सफर पदाजी माळी पांढरा वस्ती कसबे पुणें यास सरकारची धर्म पवई ( पोई ) शूद्र लोकांस पाणी पाजावयास पेठ सोमवार कसबे पुणें येथें नागझरीवर घातली आहे, तेथें पाणी पाजावयास ठेविला, त्यास दरमाहा अकरमाही शिरस्ता छ. १ रबिलोवलपासून रुपये ३ तीनप्रमाणें करार करून तूर्त एक माही रोजमरा रसानगी यादी.

तिस सबैन मया व अलफ जमादिलावल १८

रुपये.

११५८ ( ७३९ )—शहर पुणें येथील कोतवालीची कमावीस आनंदराव काशी यांजकडे होती, ते त्यांजकडून दूर करून हलीं तुह्मांकडे कमावीस सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन अंमल चौकशीनें करणें. कोतवालीसबंधें—

इसन्ने समानीन मया व अलफ सफर ६

कलमें.

---

FROM NÁRO APÁJI'S DAIRY.

( 1156 ) A drain was constructed by the kotwál for a house in Shukrawárpeth belonging to Bhojyá Sindá. The cost of construction viz. Rs. 7 was remitted.

A. D. 1774-75.

( 1157 ) An establishment was kept by Government at Nágzari in Poona to give drinking water gratis to persons other than Brahmins.

A. D. 1778-79.

( 1158 ) The office of kotwál of Poona City was taken from

तुह्मांस तैनात सालीना पेशजीप्रमाणें.

रुपये.

५०० जातीस.

६६ अफ्तागीऱ्या.

५५ दिवट्या देखील तेल.

---

६२१

एकूण साहाशें एकवीस रुपये तैनात करार केली असे, तरी कोतवालीचे ऐवजीं घेणें, मजुरा पडतील. कलम १.

तुह्मांकडे पूर्वी कोतवाली होती, ते वेळेचें फाजील तुमचें देणें निघालें तें आनंदराव काशी याणीं तिहीं वर्षांत तिहीं हप्त्यांनीं द्यावयाचा पेशजीं करार केला असतां झाडून ऐवजाचा निकाल कराराप्रमाणें करून दिल्हा नाहीं. दहा हजार रुपये अजमासें देणें राहिलें, सबब तुह्मांकडे कोतवालीची कमावीस सांगोन रसदेचा ऐवज सरकारांत द्यावयाचा रुपये ५००० पांच हजार रुपये करार केले असेत, तरी छ. ९ मोहरमापासून एका महिन्यानें सदरील ऐवज सरकारांत पावता करून पावलियाचा जाब घेणें. कलम १.

अनंदराव काशी यांचे फाजील सरकारांत हिशेब होऊन ठरले त्याची निशा पेस्तर सालापासून तिहीं हप्त्यांनीं तिहीं सालांत झाडा तुह्मीं करून द्यावा याप्रमाणें निशा दणे. कलम १.

अनंदराव काशी यांचे फाजिलाचा ऐवज देविला आहे, हा व तुमचे फाजील आनंदराव काशीकडून गैरअदा होऊन देणें राहिले आहे तो ऐवज व हल्लीं रसदेचे पांच हजार रुपये द्यावयाचे केले आहेत, एकूण एकंदर ऐवज कोतवालीवर तुमचा फिटेतों कोतवालीची घालमेल तुमची होणार नाहीं. कदाचित् घालमेल करणें जाहल्यास तुमचा ऐवज देणें त्यांत उत्पन्न मिना होऊन बाकीची निशा नव्याकडून घेतल्याखेरीज होणार नाहीं.

कलम १.

पांडुरंग कृष्ण यांस सरकारांतून सरअमीनीं सांगितली असे, तरी कोतवालीसंबंधें कुल कारभार मशारनिल्हे यांचे इतल्याखेरीज करूं नये. ज कर्तव्य तें तुह्मी व सरअमीन उभयतां एकविचारें करीत जाणें. कलम १.

---

A. D. 1781-82. Anandrao Kàshi and given to Ghâshirâm Sáwaldás. His salary was fixed at Rs. 500 besides Rs. 66 for an attendant to hold an *aftàgir* and Rs. 55 for a torchbearer. The following instructions were issued to him:—

( 1 ) the clerks and peons employed at the kotwal's office should not be removed without the consent of Pándurang Krishṇa, the Sar Amin who was appointed by Government;

( 2 ) two new police posts should be built in Náráyanpeṭh and, Shanwàrpeṭh, as owing to the want of enough police posts, offences in those parts were not detected;

कोतवालीच्या चावड्यांचे वगैरे कोतवाली सबंधें ठेवणुकी कारकून व प्यादे यांची तहगीरी व बाहाली करणें ते पांडुरंग कृष्ण सरअमीन यांचे इतल्याशिवाय न करणें; मशारनिल्हे व तुह्मीं मिळोन करीत जाणें. कलम १.

दरकदाराचे हातें दरकाचें कामकाज घेत जाणें. कलम १.

कोतवालीचा अंमल सुदामत चालीप्रमाणें करणें. इमानें इतबारें वर्तत जाऊन रयत आबाद राखत जाणें गैर वाजबी परिछिन्न न करणें. कलम १.

पेठ नारायण, व पेठ शनवार या दोहों पेठांत कोतवालीची चावडी नाहीं, याजमुळें फंद फितुरी व हाली हरामी समजण्यांत येत नाहीं, याजकरितां दोहों पेठांत दोन चावड्या घालावयाचा करार केला असे, तरी निवारसी जागा पाहून दोन चावड्या घालणें, आणि हाली हरामीची पैदास्त होईल त्यापैकीं चावड्यांच्या खर्चाची नेमणूक होईल त्याप्रमाणें खर्च जाऊन बाकी रद्द कर्जी घेत जाणें. फंद फितुरी याची बातमी यथास्थित राखून सरकारांत समजावीत जाणें. कलम १.

कमाविसीचे कलम पांच हजार रुपये पावेतों होईल तें कोतवालीचे हिशेबीं जमेस धरून रद्द कर्जी घेणें. पाच हजारांवर जाहल्यास सरकारांत पोता भरणा करणें. कलम १.

महाल मजकूर शिबंदी प्यादे, बाजेंलोकसुद्धां असामी ७८ अठ्याहत्तर यांस तैनात दरमहा रुपये ३१० तीनशें दहा रुपये अकरमाही पेशजींचे नेमणुकेबद्दल शिरस्तेप्रमाणें ठेवणें, व कारकून व खेरीज मुशाहिरा मागील त्रिंबक हरी याची व हल्लींची वाहिवाट मजुरा पडत आली तें मनास आणून नेमणूक करून दिल्ही जाईल, त्याप्रमाणें खर्च करीत जाणें. जाजती करूं नये. कलम १.

शहरांतील रस्ते चांगले राखावे, पडवी, वोटे पुणें जळाल्यावर नवे परवानगीशिवाय जाले असतील ते मोडून टाकणे पुढें होऊं देऊं नये. कलम १.

कोतवालीचा मागील वहिवाटीचा हिशेब पाहून, व नव्या दोन चावड्या हल्लीं करावयाच्या सांगितल्या आहेत त्यासुद्धां सरकारांतून बेहडा करून देऊं, त्याप्रमाणें चालावें. कलम १.

---

(3) the duties of the office should be carried on honestly and in conformity with established practice: the rayats should be kept happy: improper conduct would not be tolerated;

(4) the roads should be kept in good order: no new verandas or sheds should be allowed: all verandas and sheds unauthorizedly constructed after the great fire at Poona city should be pulled down;

(5) information should be regularly collected in each peth regarding conspirators coming into the city, and should be communicated to Government from time to time;

शहरांत फंद फितुरी वगैरे येऊन राहतात, त्यांची चवकशी पेठां पेठांतून कोतवालीचे कारकून वगैरे आहेत त्यांजकडून बारकाईनें बातमी राखीत जाऊन वरचेवर सरकारांत कळवीत जाणें.

कलम १.

पेठकरी अमलास खलेल करतील, त्यास सरकारांतून ताकीद केली जाईल.

कलम १.

शहरांत रात्रीची गस्त कोतवालीकडील फिरत्ये त्याजबराबर कारकून व प्यादे चौकस देत जाऊन रात्रीच्या गस्ती नेहमीं फिरऊन बंदोबस्त राखीत जाणें, व बारकाईनें चोरांचा पत्ता लाऊन चोर धरून आणून सरकारांत देत जाणें.

कलम १.

प्यादे बाजेलोकसुद्धां अठ्याहत्तर असामी नेमणुकी आहेत, त्यांजपासून चाकरी तुम्हीं व पांडुरंग कृष्ण सरअमीन उभयतां घेत जाणें. दरकदाराकडे निसबत माणूस एकंदर न देणें. कलम १.

कोतवालीचा हिशेब महिनेमहाल सरकारांत महिना गुदरताच पडलें पान तफावत न करितां देत जाणें. कलम १.

रसदेस व्याज एकोत्रा शिरस्तेप्रमाणें व फाजिलास सरकाराचे शिरस्तेप्रमाणें व्याज कोतवालीचे ऐवजीं मजुरा पडेल. कलम १.

गरती बायकांस शिनळकीची परवानगी देऊं नये. कलम १.

एकूण वीस कलमें करार करून कोतवालीचा अंमल छ. ९ मोहरमापासून सांगितला असे तरी सदरील लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, घाशीराम सावळदास यांस.

सनद १.

रसानगी यादी.

११५९ ( ७५५ )—सरकारांत नहराचें काम लाविलें आहे, त्याची पट्टी सर्वांप्रमाणें तुम्हांकडे पांच हजार रुपयांची करून सरकार खिजमतगार बसुलास पाठविले होते; त्याजवरून तुम्हीं सदाशिव नीळकंठ भावे यांजवर पुणियाची हुंडी पाठविली, ते रुपये ४००० चार हजार रुपये हुंडीप्रमाणें पेतेचाल सरकारांत जवाहीरखान्याकडे जमा झाले असेत म्हणोन, रघुनाथ हरि यांचे नांवें.

इसन्ने समानीन मया व अलफ जमादिलाखर ९

जाब १.

परवानगीरूबरू.

( 6 ) efficient kárkuns and peons should be sent on patrol every night and thieves should be arrested and sent to Government;

( 7 ) married women should not be given permission to become prostitutes;

( 8 ) 78 peons at monthly cost of Rs. 310 were attached to the office.

( 1159 ) Contributions were levied from the people for the con-

११६० ( ८१६ )—मौजे कात्रज, तर्फ हवेली, प्रांत पुणें येथील जमीन सरकारचे

अर्बा समानीन मया व अलफ साबान २९

नळाचे कारखान्याखालीं, व तळ्याखालीं, व नहराखालीं पडली आहे. त्याचा आकार खेरीज गल्ला, व कडबा, व तूप वगैरे करून गांवचे चालीप्रमाणें मजुरा द्यावा म्हणोन, मौजे मजकूरचे गांवकरी यांणीं अर्ज केला; त्याजवरून गोपाळ वैजनाथ कारकून व रघोजी सोरटे नाईकवाडी दिंमत सुभा प्रांत मजकूर यास जमीनीचे चौकशीस पाठविले, त्यांणीं अडोसीपडोसीं शेतें होतीं त्यांचे रुक्याची चाल पाहून जमीन पडली ते. रुके.

·।।· थळ कचालमळ्याचे रुके.

८४।। गोडवीर थळपैकीं रुके. ३ व अवळीथळपैकीं रुके ८१।। एकूण रुके.

---

·।।४।।

एकूण साडेअठ्ठावीस रुके जमीन नळाचे कारखान्याखालीं, व तळ्याखालीं, व नहराखालीं पडली आहे, त्याचा आकार खेरीज गल्ला, व कडबा, व तूप वगैरे करून दर सजगाणीस नक्त रुपये ४० प्रमाणें रुपये १९० एकशें नव्वद जहाले, ते गांवास सन इसन्ने समानीनापासून मजुरा द्यावयाचे करार करून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें एकशें नव्वद रुपये नहराकडे खर्च लिहून गांवास दरसाल मजुरा देत जाणें म्हणोन, नारो महादेव किल्ले सिंहगड यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

११६१ ( ९१० )—बापूजी आनंदराव कमावीसदार कसबे पुणें यांचे नांवें सनद कीं,

सीत समानीन मया व अलफ सफर ४

राजश्री आनंदराव भिकाजी रास्ते यांणीं नवी पेठ वसवावयाकरितां जागा देविली पाहिजे ह्मणून विनंति केली; त्याजवरून मशारनिल्हे यांस पेठ वसवावयास जमीन. बिघे.

८७।।१ मोरो बल्लाळ जोशी यांजकडे दहा बिघे जमीन चालत होती ते हल्लीं मोजणीमुळें भरली ते.

८२।। कबीर फकीर यांजकडे जमीन आहे त्यापैकीं.

---

construction of an aqueduct at Poona: the sum to be paid by Sadáshiv Nilkanth Bháve was Rs. 5,000.

A. D. 1781-82.

( 1160 ) Land measuring 28½ *rukas* at Kátraj having been taken up for the tank, pipes, and the works connected therewith, its assessment viz. Rs. 190 was ordered to be remitted.

A. D. 1783-84.

( 1161 ) Land measuring 24¾ bighás and 1 pand was given to Anandrao Bhikáji Ráste to found a *peth*.

A. D. 1785-86.

८१०॥ त्रिंबक महिपतराव चिटणीस यांजकडे सोळा बिघे जमीन चालत होती ते हाली मोजणीमुळें भरली ते.

८४ सटवाजी पारखी याचे थळपैकीं.

---

८२४॥१

एकूण पावणे पंचवीस बिघे एक पांड जमीन नेमून देविली असे, तरी सदरहूप्रमाणें जागा मशारनिल्हेचे हवालीं करणें ह्मणून. सनद १.

११६२ ( ९१६ )–जीवनराम घाशीराम यांचे नांवें सनद कीं, शहर पुणें येथें भवानी पेठेचे पूर्वेस नवापुरा पेठ वसवावयाची आज्ञा जाल्यास वसाहत करीन ह्मणोन तुह्मी विनंति केली; त्याजवरून सदरहू जाग्यावर पेठ वसवावयाची आज्ञा तुह्मांस केली असे येविशींचीं. कलमें.

सीत समानीन मया व अलफ रविलोवल २२

नवीं कुळें पेठ मजकुरीं येऊन राहतील, त्यांस सालमजकुरापासून सात साला मोहोतर्फा, व वेठ बेगार माफ केली असे, वस्ती करणें. कौल भरल्यावर मोहोतर्फा व वेठ बेगार वगैरे घेतली जाईल. कलम १.

कोतवालीकडील व बट छपाईचा उपद्रव कुळांस कौल भरेतोपर्यंत लागणार नाहीं. कलम १.

सरकारची खरीदी व मातबर लोकांची खरेदी कौल भरेतोंपर्यंत पेठ मजकुरीं होऊं नये येणेंप्रमाणें. कलम १.

पेठ मजकुरीं कुळें येऊन वसाहत करितील, त्यांस मागील देणेंदारांचा उपद्रव लागला तर देणें घेणें मनास आणून जीवन पाहून पैका घ्यावा. कलम १.

शिबंदी, प्यादे, व कारकून पेठ संबंध व चावडी बांधावयास वगैरे लागवड लागेल त्याचा चौकशीनें खर्च करून हिशेब सरकारांत समजावणें. कौल भरल्यावर पेठेचे ऐवजीं देविला जाईल. कलम १.

एकुण पांच कलमें करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें; आणि पेठेची वसाहत करणें म्हणोन. सनद १.

येविशीं सनद, व कौल मिळोन २.

१ बापूजी आनंदराव कमाविसदार कसबे पुणें यांस कीं, रस्त्याचे उत्तरेस सरकारचीं झाडें आहेत, त्याचे लगते बाग, व मळे असतील त्यांपैकीं दुकानापुरती जागा साठ हात लांबीची, जीं दुकानें होतील त्यांस देविली असे, तरी बागमळ्यापैकीं सदरहूप्रमाणें दर दुकानास साठ हात लांबीची जागा देऊन बाकी बाग, व मळे राखणें ह्मणोन. सनद.

---

( 1162 ) Jiwanrám Ghásirám was permitted to found a new suburb called Nawápurá, to the east of Bhawánipeṭh at Poona.
A. D. 1785-86.

